रघुनाथ पंडित कृत

# नल-दमयंती-स्वयंवराख्यान.

लेखक,
**सिताराम विष्णु सरवटे, इंदूर.**

प्रकाशक,
श्री स्टॅन्डर्ड पब्लिशिंग कंपनी,
गिरगांव-मुंबई.



सन १९१९.

किंमत १। रुपाया.

रघुनाथ पंडित कृत.

# नल-दमयंती-स्वयंवराख्यान.

हा ग्रंथ

**सीताराम विष्णु सरवटे, इंदूर.**

यांनीं

अन्वय, शब्दार्थ, समास, विग्रह, भावार्थ, इत्यादि संबंधीं
टीपा देऊन व अलंकार, वृत्तें, काव्यांतील
गुणदोष, कविचरित्र व कवीचीं इतर
उपलब्ध काव्यें इ० चीं परिशिष्टें
जोडून तयार केला.




तो


**स्टँडर्ड पब्लिशिंग कंपनीनें छापून
प्रसिद्ध केला.**

सन १८१९.

**किंमत १। रुपया.**

मुद्रक,

रा. चिंतामण सखाराम देवळे, मुंबई वैभव प्रेस,
सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटीज् होम्,
सँढर्स्ट रोड, गिरगांव–मुंबई.

---

प्रकाशक,

रा. विष्णु पांडुरंग तेंडुलकर प्रोप्रायटर,
स्टँडर्ड पब्लिशिंग कंपनी
गिरगांवपोष्टाच्या मागें, मुंबई नं. ४.

## या पुस्तकांत योजिलेले संक्षेप.

क.—कर्मधारय समास.

ष. त.—षष्ठी तत्पुरुष समास.

ब.—बहुव्रीहि समास.

ह्म.—ह्मणजे.

तृ.—तृतीया.

प्र.—प्रथमा.

ए. व.—एकवचन.

दा. व्या.—दामल्यांचें व्याकरण.

अ. व.—अनेकवचन.

उपप.—उपपद समास.

पौरा.—पौराणिक.

तृ. पु. अ. व. कर्म. प्रयो.—तृतीय पुरुषीं अनेकवचनीं कर्मणी प्रयोग.



# रघुनाथपंडितांचें चरित्र

## व

# काव्यगुणदोष.

ह्या कवीनें केलेला असा एकच ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्याचें नांव नल–दमयंती–स्वयंवराख्यान. ह्याच कवीचें आणखी एक काव्य " गजेंद्र–मोक्ष " नांवाचें अलीकडे सांपडलें असल्याचें प्रसिद्ध झालें आहे. पण तें इतकें प्रसिद्ध नाहीं. नल–दमयंती–स्वयंवराख्य काव्य आपण संस्कृत भाषेंतील नैषध काव्याच्या आधारानें केलेलें असल्याचें कवींनीं स्वतःच काव्यसमाप्तीच्या श्लोकांत सांगितलें आहे. परंतु हा श्लोक नवनीताचे नवीन आवृत्तींत गाळला आहे. हा ग्रंथ फार सुरस असून ह्यांत यमकादि शब्दालंकार व उपमादि अर्थालंकार चांगले साधलेले आहेत. इतकेंच तर काय परंतु काव्यकलेचा उत्कर्ष दाखविण्या करितांच काव्य लिहावयाचें अशा बुद्धीनें मराठी भाषेंतील जुन्या कवीनें लिहिलेलें असें हें एकच काव्य मराठी भाषेंत आहे. व ह्मणून संस्कृत भाषेंत जीं पंच महाकाव्यें प्रसिद्ध आहेत, त्यांत जशीं हृदयाला हलवून सोडणारीं चटकदार वर्णनें आहेत, खुबीदार रचना, श्लेष अनुप्रास यमकादि शब्दालंकार व उपमा, रूपक वगैरे अनेक अर्थालंकार आहेत तसे सर्व प्रकार आपल्या या लहानशा काव्यांत येऊन तें संस्कृत महाकाव्याच्या तोडीचें व्हावें असा प्रयत्न कवीनें या काव्यांत केलेला आहे. इतर कवींच्या काव्यांतून हे सर्व प्रकार थोड्या फार प्रमाणानें प्रसंगोपात्त आलेले आहेत परंतु त्या सर्वांचीं काव्यें विशेषें करून भक्तिरसप्रधान आहेत. काव्यकले करितांच काव्य लिहिण्याचा त्यांचा उद्देश नव्हता. तसें या काव्याचें नाहीं. हें काव्य केवळ काव्यकले करितांच लिहिलेलें असल्यानें काव्यकलेंतील सर्व हृदयंगम प्रकार थोड्या फार प्रमाणानें या काव्यांत आलेले आहेत. काव्यांत वृत्तेंही नानाप्रकारचीं कवीनें योजिलीं आहेत. त्यामुळें वाचतांना आनंद होतो. व वाचकाच्या रसिकतेप्रमाणें निरनिराळ्या रागदारींत तालसुरावर पद्यें गातां येतात. या सर्व कारणानें हें काव्य अगदीं लहानसें आहे तरी तें आपणांस काव्य ह्मणवून घेण्यासच तर काय परंतु मराठी भाषेंत

काव्याच्या दृष्टीनें प्रथम पद पटकविण्यासही सर्वथा योग्य आहे. ह्या काव्याची स्वतंत्र एखादी प्रत हस्तलिखित किंवा छापील मला मिळाली नाहीं. शोधाअंतीं हस्तलिखित प्रत कदाचित् मिळूं शकली असती परंतु हें काव्य म्याट्रिकच्या परीक्षेस अलाहाबाद युनिव्हरसिटीनें नेमलें असल्यानें सदरच्या टीकेसह तें स्वतंत्र छापून लौकर प्रसिद्ध केल्यास विद्यार्थ्यांना जास्त सोईस्कर होईल असें वाटल्यावरून त्या घाईमुळें हस्तलिखित प्रतीचा शोध करण्यास तितका अवसर मिळाला नाहीं. ह्मणून हल्लीं प्रचलित असलेल्या नवनीतावरच काम भागवावें लागलें. परंतु त्यांतल्या त्यांत नवनीताच्या ज़्या अनेक आवृत्त्या निघाल्या आहेत त्या मात्र ह्या काव्यापुरत्या वारंवार ताडून पाहिल्या आहेत. त्यावरून नव्या आवृत्तींत एकंदर पद्यें २१८ असून सन १८७३ सालीं छापलेल्या नवनीताच्या आठव्या आवृत्तींत एकंदर पद्यें २४२ आहेत. यावरून नवीन आवृत्तींत २४ पद्यें गाळलीं आहेत. हीं पद्यें जरा शृंगारिक असून तीं विद्यार्थ्यांच्या विद्यार्थीदशेंत नजरे समोर येणें बरें न वाटल्यावरून कदाचित् गाळलीं असतील. पण हें पुस्तक केवळ विद्यार्थ्यां करितांच नसून सर्व महाराष्ट्रभाषाभिज्ञ रसिका प्रीत्यर्थ असल्यानें हीं जास्त असलेलीं २४ पद्यें निराळ्या परिशिष्टानें सदर पुस्तकास जोडलीं आहेत. तरी पाहिजे असल्यास व विद्यार्थ्यांच्या बाबतींत तितकें सोंवळें बाळगण्याची आवश्यकताच वाटत असल्यास तें परिशिष्ट वगळून बाकीचा भाग शिकविला जावा.

अनेक आवृत्त्या तपासून पाहतां सदरच्या सन १८७३ च्या आवृत्तींतील पद्यांत व नवीन आवृत्तींतील पद्यांत बराच फेरफार करून पाठांतरें घालून वापरलीं आहेत परंतु अशीं पाठांतरें कां व कशावरून केलीं, त्यांस आधार काय वगैरेचा खुलासा प्रस्तावनेंत किंवा त्या त्या पद्यावर टीपा देऊन केलेला नाहीं. तो सर्व विचार या पुस्तकांत करणें अवश्य होता परंतु तितका अवकाश नसून पुस्तक छापून बाहेर काढण्याची घाई झाल्यानें तो विचार सोडून द्यावा लागला, तरी पण जर ह्या पुस्तकाची दुसरी आवृत्ती काढण्याचें भाग्य लाधेल तर त्यासंबंधीं जरूर विचार करतां येईल.

---

श्री

## रघुनाथ पंडित कृत

# नलदमयंती स्वयंवर आख्यान.



श्लोक–शा. वि.

**पुण्यश्लोकनृपावळींत पहिला होवोनि जो राहिला।**
**जो राजा असतां समस्त महिला विश्रांति शेषाहिला॥**
**व्यासोक्तें अवगाहिला बुधजनीं नानागुणीं गाइला।**
**जो नामें नल तत्कथौघ लिहिला तो पाहिजे पाहिला॥१॥**

जो पुण्यश्लोकनृपावळींत पहिला होवोनि राहिला, जो राजा असतां समस्त महिला (व) शेषाहिला विश्रांति (मिळत गेली), (जो) व्यासोक्तें अवगाहिला, जो बुधजनीं नानागुणीं गाइला, (व जो) नामें नल (आहे), तत्कथौघ लिहिला (आहे), तो (आपण श्रोत्यांनीं) पाहिला पाहिजे.

जो—'राहिला' चा कर्ता. पुण्यश्लोक नृपावळींत—पुण्यश्लोक असे पवित्र जे नृप ह्म० राजे त्यांच्या आवलींत ह्म० ओळींत (ष. त), 'पुण्यश्लोको नलो राजा पुण्यश्लोको युधिष्ठिरः पुण्यश्लोकाच वैदेही पुण्यश्लोको जनार्दनः।' या श्लोकांत पुण्यश्लोकांची गणना केली आहे. त्यांत नलाचें नांव त्याच्या सचारित्र्यामुळें पहिलें आहे त्यास अनुसरून हें वर्णन आहे. समस्त—सगळी. महिला—पृथ्वीला. शेषाहिला—शेष ह्म० शेष नांवाचा अहि ह्म० सर्प त्याला (क.) शेष आपल्या मस्तकावर पृथ्वी धारण करितो अशी समज आहे. व्यासोक्तें—व्यासाचें उक्त ह्म० वचन त्यानें (ष. त.). अवगाहिला—स्नान घातला, वर्णिला. बुधजनीं—शहाण्या अशा जनांनीं (क). नानागुणीं—नाना ह्म० अनेक असे जे गुण त्यांनीं (क.)

अनेक गुणांमुळें ( साधनी तृ. ). तत्कथौघ—त्याच्या कथेचा ओघ तो ( ष. त. ) लिहिला—वर्णन केला आहे. नलराजा पुण्यवान् असल्यानें त्यानें प्रजेंत पाप होऊं दिलें नाहीं यामुळें पृथ्वीला पापी लोकांचा भार होतो तो न होऊन तिला विश्रांति मिळाली. आणि अशाप्रकारें ती हलकी झाल्यानें तिला धारण करणाऱ्या शेषालाही विश्रांति मिळाली. उ० खायला काळ भुईला भार.

**गीति—इंद्रादिक वर असतां कशी नलसती च होय दमयंती ।**
**सुंदर सकल वधूंतें कशी न लसती च होय दमयंती ॥ २ ॥**

इंद्रादिक वर असतां दमयंती नलसती च कशी होय ? ( जी ) सकल सुंदर वधूंतें दमयंती, ( ती ) लसती च कशी न होय ?

इंद्रादिक-इंद्र आहे आदि ह्म० पहिला ज्यांत ते ( ब. ) इंद्र आदि करून देव. दमयंतीच्या स्वयंवराला इंद्र, अग्नि, यम व वरुण असे चार देव आले होते. देवांचें वैभव मनुष्यांपेक्षां अधिक असतें. तेव्हां अशा देवांना सोडून दमयंतीनें मनुष्य अशा नलालाच कसें वरलें हा भावार्थ. ह्या प्रश्नाचें उत्तर ह्मणजेच प्रस्तुत काव्य होय. वर—वरला जाऊं शकतो, ज्याच्याशीं लग्न लाविलें जाऊं शकतें, असा पुरुष. दमयंती—भीमक राजाची दमयंती नांवाची मुलगी. नलसती—नलाची ( नलराजाची ) सती ह्म० बायको ( ष. त. ) वधूंतें—बायकांना. दमयंती-दमन करणारी, जिंकणारी ( अर्थात् आपल्या रूपानें ). लसती—प्रकाशणारी ( लस्— प्रकाशणें ) त्यावरून लक्षणेनें रूपवती. सगळ्या सुंदर स्त्रियांना आपल्या सौंदर्यानें जिंकणारी ही दमयंती सौंदर्यवती कशी नसेल ? अर्थात् ती तशी असलीच पाहिजे.

अलंकार—दुसऱ्या अर्धांत प्रश्नालंकार.

**दिंडीः—कथा बोलूं हे मधुर सुधाधारा**
**होय शृंगारा करुणरसा धारा**
**निषधराजा नळनामधेय होता**
**वीरसेनाचा तनय महाहोता ॥ ३ ॥**

हे मधुर कथा सुधाधारा ( आहे, म्हणून ) बोलूं. ( हे ) शृंगार ( रसा ) करुण रसा थारा होय. नळनामधेय निषधराजा वीरसेनाचा तनय महाहोता होता.

मधुर–ऐकण्यास गोड. सुधाधारा—सुधेची धारा ( ष. त. ) किंवा सुधेच्या धारेसारखी धारा आहे जीची ती ( ब. ); सुधा—अमृत. धारा—ओघ, प्रवाह. हे—दर्शक सर्वनाम स्त्रीलिंग प्र. चे. ए. व. ही मधुर कथा अमृताच्या प्रवाहासारखी मनोहर आहे म्हणून बोलूं ह्म० सांगूं, वर्णन करूं. ही शृंगाररसाला व करुणरसाला थारा म्ह० आश्रयस्थान आहे ( आहे ). ह्या गोष्टींत मुख्यत्वें शृंगार व करुणरसात्मक वर्णन असल्यानें त्या रसांनां येथें स्थान मिळालें आहे. नळनामधेय—नळ हें नामधेय नांव ज्याचें तो ( ब. ). निषधराजा—निषध देशाचा राजा ( ष. त. ). महाहोता—महान् असा होता ह्म० यज्ञ करणार ( क. ) तनय—मुलगा. नळनाम० नळ नांवाचा जो निषध देशाचा राजा तो मोठा यज्ञ करणारा असून वीरसेनाचा मुलगा होता.

**दिंडी:—चौगुणीनें जरि पूर्ण शीतभानू**
**नळा ऐसा तरि कलानिधी वानू**
**प्रतापाचा जो न मावळे भानू**
**तया सारीखा कोण दुजा मानू ॥ ४ ॥**

जरि कलानिधी शीतभानू चौगुणीनें ( आणि ) पूर्ण ( असता ) तरि ( तो ) नळा ऐसा वानू. भानु मावळे, जो प्रतापाचा ( भानू तो ) न ( मावळे ) तया सारीखा दुजा कोण मानू ?

जरी—जर ( कवितेंतील रूप ). कलानिधी—कलांचा निधी ह्म० खजीना तो ( ष. त. ) ह्म० चंद्र. शीतभानू—शीत ह्म० थंड असे भानू ह्म० किरण आहेत ज्याचे तो ( ब. ) ह्म० चंद्र. चौगुणीनें—चौपटीनें. नळा ऐसा—नळासारखा. वानू—वाखाणू, वाखाणिला असता. प्रतापाचा—पराक्रमाचा. प्रतापाचा भानू—प्रतापरूप भानू किंवा प्रताप हाच कोणी भानू ( षष्ठीचा अर्थ अभेद किंवा

प्रकारविशेष—दा. व्या. पान २७७ ) प्रखरपणामुळें प्रतापाला भानूची उपमा. मावळे—अस्त पावतो. सूर्य मावळतो परंतु नळाचा प्रताप ( रूप सूर्य ) मावळता नाहीं ह्मणून नळाला सूर्याची उपमा देतां येत नाहीं. तसेंच चंद्र कलांचा निधी असूनही त्याला फक्त १६ कळा आहेत, परंतु नळाला ६४ कला येत होत्या ह्मणून चंद्राला हल्लींच्या चौपट कला असत्या व तो रोज पौर्णिमे प्रमाणें पूर्ण उगवता तर त्याला नळासारखा असें ह्मणतां आलें असतें. हल्लींच्या स्थितींत त्याला नळासारखा असें ह्मणतां येत नाहीं ह्मणून. तया......मानू—त्याचा ( नळा ) सारखा दुसरा कोण आहे ह्मणून ह्मणावें अर्थात् कोणी नाहीं. अलंकार—पहिल्या तीन चरणांत व्यतिरेक अलंकार; ४ थ्या चरणांत प्रश्नालंकार.

श्लोक–व. ति. **चंद्रासि लागति कळा उपराग येतो**
**गंगेसि भंग बहु पाणउतार होतो**
**जें चूर्ण होय तरि मौक्तिक तें कशाला**
**नाहीं समान नळराजमहायशाला ॥ ५ ॥**

चंद्रासि कळा लागति, उपराग येतो. गंगेसि भंग बहु ( आहे, तसेंच तिला बहु ) पाणउतार होतो. जें मौक्तिक चूर्ण होय, तरि तें कशाला ? ( ह्मणून ) नळराजमहायशाला समान नाहीं.

आणखी कांहीं उपमा चिंतून त्यांचें व्यर्थत्व दाखविण्याच्या उद्देशानें कवि ह्मणतात.

चंद्रासि—चंद्राला. कळा—खंड, तुकडा. कळा लागणें—चढउतार होणें. ( पक्षीं ) वेदना होणें. उपराग—ग्रहण(चंद्र कधीं कमी कधीं अधिक होतो व त्याला ग्रहण लागतें यावरुन त्याचें वैभव व श्री स्थिर नाहीं हें सूचित होतें. ह्मणून त्याला नळासारखा ह्मणतां येत नाहीं ). भंग—तरंग, लाटा. ( पक्षीं ) तोडमोड. पाणउतार—पाण्याचा उतार ( ओहोटी ) पक्षीं अत्यंत अपमान. गंगेच्या पाण्यांत लहरी उठतात व तिला ओहोटी येते पक्षीं गंगा ही अभंग ह्मणजे स्थिर नाहीं, ती भंग पावते व तिचा

अत्यंत अपमानही होतो ह्मणून तीही नळासारखी ह्मणण्यास योग्य नाहीं. 'बहु' हें 'भंग' व 'पाणउतार' ह्या दोहोंचेंही विशेषण. मौक्तिक—मोती, चूर्ण होतें—( कुटलें असतां ) भुगा होतें, ते कशाला—तें तुलना करावयास कशाला घ्यावें अर्थात् घेतां येत नाहीं. नळराजमहायशाला—नळराजाचें महान् असें जें यश तें त्याला ( ष. त. ). समान—तुल्य तुलना करण्यास योग्य अशी वस्तु.

अलंकार—श्लेष चरण १।२.

व्यतिरेक चरण १।२।३.

श्लोक–शा. वि.

**वाजीचें मन जाणता, सकलही राजी शिपाई जया ।**
**याजी होउनियां द्विजासि ह्मणतो या जी धनें घ्यावया ॥**
**त्याजी जो धनदापरी, सुकृत जें त्या जीव ऐसें गणी ।**
**गाजी तो नळभूप हूप धरुनी गा जी गुणींच्या गणीं ॥ ६ ॥**

( जो ) वाजीचें मन जाणता ( आहे ), जया सकलही शिपाई राजी ( आहेत ), ( जो ) याजी होउनियां "जी धनें घ्यावया या" ( असें ) द्विजासि ह्मणतो, जो धनदा परी त्याजी ( आहे ), ( जो ) जें सुकृत त्या जीव ऐसें गणी, तो नळभूप गाजी ( आहे ). जी, त्या गुणींच्या गणीं हूप धरूनी गा.

वाजीचें–घोड्याचें. जाणता–जाणणारा. वाजीचें मन जाणता–( लक्षणेनें ) अश्वविद्येंत निपुण. याजी–( यज्–यज्ञ करणें ) यज्ञ करणारा. जी–अजी, अहो. धनें–( अ. व. ) दक्षणेचें द्रव्य. धनदा परी–धन देणारा तो धनद ह्म. कुबेर ( उपप. ) त्यासारखा. त्याजी–( त्यज्–त्याग करणें ) त्याग करणारा, दान करणारा, दाता. सुकृत—( सु. ह्म. चांगलें असें जें कृत–केलेलें कर्म तें ) पुण्य, पुण्यकारक कृत्य. जें सुकृत इ.—जो पुण्यकृत्याला प्राणाप्रमाणें प्रिय मानतो, ज्याप्रमाणें प्राणाकरितां त्याप्रमाणें सुकृत करण्याकरितां झटतो. तो–वर सांगितला असा नळभूप—नळ नांवाचा राजा. ( भू–भूमि तिचा प–पालन करणारा तो–उपप. )

गाजी-शूर वीर. त्या—नळराजाला. गुणींच्या गणीं—गुणवान् पुरुषांच्या समूहांत. हूप—उत्कंठा, प्रबळ इच्छा. गा—प्रशंसा करा, वर्णन करा.

कवीनें या वृत्तांत अनुप्रासाची मोठी बहार केली आहे.

दिंडी—**लोक-बंधू जो होय रवी ऐसा**
**कुवलयाला जो सुखद चंद्र जैसा**
**सांग नोहे तो कुसुमचाप तैसा**
**निषधरायाशीं तुल्यरूप कैसा ॥ ७ ॥**

जो रवी ऐसा लोकबंधू होय, जैसा चंद्र (तैसा) जो कुवलयाला सुखद (होय), सांग नोहे तैसा तो कुसुमचाप (सांग अशा) निषधरायाशीं तुल्यरूप कैसा (होय)?

जो—जो नळराजा. रवी ऐसा—रवीसारखा. लोकबंधू—लोकांचा बंधू तो (ष. त.) जगाला अर्थात् जगांतील मनुष्यांना भावाप्रमाणें सुख देणारा. सूर्य आपल्या प्रकाशानें सर्व लोकांस आपापलीं कार्यें करण्यास सुलभ करून देऊन सुख देतो म्हणून त्यास लोकबंधू म्हणतात. त्याप्रमाणें नळराजाही सर्व प्रजाजनांना सुख देत असे म्हणून नळही लोकबंधूच होय. कुवलयाला—कुवलय—चंद्रविकाशी कमल त्याला; पक्षीं—कु पृथ्वी तिचें वलय त्याला (ष. त.) चंद्र उगवला असतां कुवलयें विकास पावतात त्यावरून चंद्र त्यांना सुख देतो अशी कल्पना केली आहे. ज्याप्रमाणें चंद्र कुवलयांचा विकास करून त्यांना सुख देतो त्याप्रमाणें नळराजा पृथ्वीला सुख देत असे. सांग—अंगा सहित तो (तृ. त.) पक्षीं पूर्ण. नोहे-नाहीं. कुसुमचाप—कुसुम-पुष्प हेंच आहे चाप—धनुष्य ज्याचें तो (ब.) मदन. (मदनाला शंकरानें रागावून जाळिलें त्यानंतर रतीच्या प्रार्थनेवरून शंकरानीं तीस वर दिला कीं तो पुनः जिवंत होईल पण त्यास शरीर असणार नाहीं. म्हणून मदनाला अनंग असेंही नांव आहे) तैसा—तसा असतां, अंगारहित असल्या स्थितींत. निषधारायाशीं—निषध देशाचा राय म्ह. राजा त्याशीं. तुल्यरूप—तुल्य-सारखें आहे रूप ज्याचें तो (ब.) कैसा—कसा! (हें रूप बहुधा कवितेंत येतें)

अर्थात् तुल्यरूप होऊं शकत नाहीं कारण मदन पक्षीं अपूर्ण शरीररहित असा आहे आणि नळराजा सदेह पक्षीं पूर्ण अर्थात् सर्व गुणांनीं युक्त असा आहे.

अलंकार—व्यतिरेक चरण ३

श्लेष चरण १।२ उपमा चरण १।२ प्रश्न चरण ४

गीति—**नाडीज्ञान जयाचे, सरोगबंधू चतुष्पद गणावे**
**सुत तेजीतुरगींचे; नळसम सुंदर कदापि न ह्मणावे** ॥ ८ ॥

जयाचे नाडीज्ञान ( इतकें होतें कीं त्यापुढें ) सरोगबंधू ( व ) तेजीतुरगींचे सुत ( हे ) चतुष्पद गणावे; ( तेजीतुरगींचे सुत ) नळसम सुंदर कदापि न म्हणावे.

जयाचे—ज्या नळराजाचें. नाडीज्ञान ( ष. त. ) नाडीपरीक्षा लक्षणेनें वैद्यशास्त्राचें ज्ञान. सरोगबंधू—रोगासहित तो सरोग रोगी मनुष्य, त्याचा बंधू ह्म. भाऊ भावाप्रमाणें हित करणारा तो ( ष. त. ) धन्वंतरी; पक्षीं सरोग ह्म. रोगी असा अर्थात् चंद्र ( चंद्र रोज कमी अधिक होत असल्यानें त्यास क्षयरोग झाला आहे अशी पौराणिक कल्पना ) त्याचा बंधु भाऊ धन्वंतरी. ( चंद्र आणि धन्वंतरी हे उभयतांही समुद्रमंथनसमयीं एकाच क्षीरसागरापासून उत्पन्न झाले म्हणून धन्वंतरीला चंद्राचा भाऊ मानतात. ) तेजीतुरगींचे—तेजी ह्म. घोडा आणि तुरगी ह्म. घोडी ते ( द्वंद्व ) त्यांचे सुत—मुलगे अश्विनीकुमार. त्वष्ट्याची कन्या संज्ञा नांवाची सूर्याची भार्या होती. तिला सूर्याचें तेज सहन होईना म्हणून ती घोड्याचें रूप घेऊन राहिली. तिच्याशीं घोड्याचें रूप घेऊन सूर्य रत झाला, तेव्हां तिला दोन पुत्र झाले त्यांस अश्विनीकुमार ह्मणतात. अश्विनीकुमार व धन्वंतरी हे देवांचे वैद्य आहेत (पौ. कथा.) चतुष्पद—चतुः—चार पद—पाय आहेत ज्यांना ते चतुष्पद ( ब. ) पशु. लक्षणेनें मूर्ख अज्ञानी. नळाचें वैद्यशास्त्राचें ज्ञान इतकें अगाध होतें कीं त्याच्या समोर प्रत्यक्ष देवाचे वैद्य जे धन्वंतरी व अश्विनीकुमार ते अत्यंत ज्ञानी असूनही पशुप्रमाणें मूर्ख ठरले असते. गणावे—मानावे. नळसम—नळराजासारखे. सुंदर कदापि न म्हणावें—कधींही सुंदर ह्मणूं नयेत. अश्विनीकुमार अत्यंत सुंदर आहेत अशी त्याची प्रसिद्धी आहे ( पौ. कथा. ) तरीही ते नळासारखे सुंदर नाहींत.

अलंकार—व्यतिरेक चरण १।२

श्लोक–शिख.–कदा नेणों वोढी शरधिंतुनि काढी शर कदा
कदा धन्वीं जोडी वरिवरिहि सोडी तरि कदा
विपक्षाच्या वक्षावरि विवरलक्षास्तव रणीं
कळे राजेंद्राची त्वरित शरसंधानकरणी ॥ ९ ॥

कदा ( मौर्वी ) ओढी, शराधिंतुनि शर कदा काढी, ( तो ) धन्वीं कदा जोडी ( व ) वरिवरिहि सोडी तरी कदा ( हें आह्मी ) नेणों ( परंतु ) रणीं विपक्षाच्या वक्षावरि विवरलक्षास्तव राजेंद्राची त्वरित शरसंधानकरणी कळे.

कदा—केव्हां. वोढि—ओढी, ओढतो, खेंचतो. या क्रियेचें कर्म ' धनुष्याची दोरी ' अध्याहृत. शरधिंतुनि—भात्यांतून. शर—बाण. धन्वीं—धनुष्याला. वरि......कदा—वरचे वर ( वारंवार ) सोडतो तरि केव्हां. नेणो—जाणत नाहीं. रणीं—समरांगणांत. विपक्षाच्या—शत्रूच्या. वक्षावरि—वक्षस्थलावर, छातीवर, विवरलक्षास्तव—विवर भोंक हेंच कोणी लक्ष. त्यावरून त्याच्या योगानें ( क. ) राजेंद्राची—राजाचा जो इंद्र त्याची ( ष. त. ) नळराजाची. त्वरित—लवकर. शरसंधानकरणी—शराचें जें संधान नेम त्याची करणी कृत्य ती. (ष.त.)कळते—समजते. रणीं...कळे—समरांगणांत शत्रूंच्या वक्षस्थलावर नळराजाचे बाण लागून जीं मोठीं भोकें पडलेलीं दिसत असत त्यांवरून त्या राजाची शीघ्र अशी शरसंधानकरणी कळत असे परंतु धनुष्य केव्हां ओढी बाण केव्हां काढी केव्हां जोडी वगैरे वगैरे कांहीं कळत नसे असा अर्थ.

श्लोक–धाले धनी पुढिल याचक या नळाचे
येतां फिरोनि समुदाय पथीं तयांचे
मागावयास जन मागिल देखियेले
त्यांहींच ते सकलपूरितकाम केले ॥ १० ॥

या नळाचे पुढील याचक धनी ( होउन ) धाले तयांचे समुदाय

फिरोनि येतां पथीं मागिल जन मागावयास येतां देखियले ते त्यांहींच सकलपूरितकाम केले.

या—वर वर्णन केलेल्या, नळाचे. पुढील—प्रथम मागावयास आलेले. याचक—भिक्षा मागणारे, याचना करणारे. समुदाय—झुंड, टोळी. धाले—समाधान पावलेले, इच्छा पूर्ण झालेले. धनी—धनवान्, श्रीमंत. फिरोनि—परतून. येतां—येत असतां (अर्थात् घरीं जाण्याकरितां). पथीं—मार्गांत. मागिल—त्या धनी झालेल्या याचक जना मागून येणारे. जन—लोक. मागावयास...देखियेले—नळराजाकडे याचना करण्यास जात असलेले देखियेले ह्म० पाहिले. ते—मागून येणारे याचकजन. त्यांहींच-पूर्वींच्या धनी अशा याचक जनांनीं. सकल सर्व पूरित ह्म० पूर्ण झाले आहेत काम ह्म० इष्ट हेतु ज्यांचे ते सकलपूरितकाम (ब).

या नळराजाकडे जे याचक धन मागावयास येत असत त्यांस त्यानें इतकें धन द्यावें कीं त्या योगानें ते स्वतः श्रीमंत होऊन परत घरीं जातांना जे कोणी दुसरे मागाहून येणारे याचक त्यांस वाटेंत भेटत त्यांस त्यांनीं आपल्या जवळचें धन देऊन त्यांचे इष्ट हेतु पूर्ण करावे.

**दिंडी.—अशी अगणित गुणकीर्ति नैषधाची ।**
**फिरे भुवनत्रयिं जान्हवीच साची**
**असें असतां द्विज पांच सात याची ।**
**भेटि घेती वैदर्भ राजयाची ॥ ११ ॥**

नैषधाची अशी अगणित गुणकीर्ति (जणुं) साची जान्हवीच भुवनत्रयिं फिरे. असें असतां पांच सात याची द्विज वैदर्भराजयाची भेटि घेती.

नैषधाची—निषध देशाचा राजा जो नळ त्याची. अशी—अशाप्रकारची. अ ह्म० नाहीं गणित ह्म० मोजमाप जिचें असी (नञ्तत्पु०). गुणाची कीर्ति ती गुणकीर्ति (ष. त.). साची—खरोखर. जान्हवीच—गंगानदीच कीं काय अशी. तीन भुवनांचा समाहार तें भुवनत्रय (द्विगु). त्याठायीं ह्म० तिन्ही

लोकांत ( स्वर्ग मृत्यु पाताळ या तिन्ही लोकांत. गंगेचाही प्रवाह तीन्ही लोकांत आहे, गंगा नळयशाप्रमाणें पांढरी व पवित्र आहे, ह्मणून तिची उपमा ) फिरे—पसरे. असें असतां—अशी गोष्ट, स्थिति असतां. पांच सात—अनिश्चित संख्यावाचक विशेषण. अमुकच एक संख्या असेल असें सांगतां येत नाहीं. कदाचित् पांच असतील किंवा सात असतील. याची—याचना करणारे, भिक्षा मागणारे. द्विज—ब्राह्मण, द्वि ह्म० दोनवेळ ज ह्म० जन्म आहे ज्यांचा असे ते ( बहुव्री. ) ( आईच्या पोटांतून उत्पन्न होतात तो पहिला व मौंजीबंधन होतें त्यावेळचा दुसरा असे दोन जन्म ब्राह्मणाला असतात ) वैदर्भराजयाची—विदर्भदेशाच्या राजाची ( ' राजाची ' याचे कवितेंतील रूप ' राजयाची ' ). भेटि घेती—भेट घेते झाले.

दिंडी.—**बहू आशीर्वादांसि तिहीं केलें ।**
**भीम-भूपें मग तयां बोलिजेलें**
**तुह्मी आला कोठून अशा बोलें ।**
**द्विजीं निषधा पासाव ह्मणीजेलें ॥ १२ ॥**

तिहीं बहू आशीर्वादांसि केलें. मग तयां भीमभूपें ' तुह्मी कोठून आलां ' अशा बोलें बोलिजेलें. द्विजीं ' निषधा पासाव ' ह्मणीजेलें ॥

तिहीं—त्या द्विजांनीं, त्या ब्राह्मणांनीं ( तृ. अ. व. केलें या क्रियेचा कर्ता ). बहू आशीर्वादासि केलें—पुष्कळ आशीर्वाद दिले. मग—त्यानंतर. तया—त्या ब्राह्मणांस. भीमभूपें—भीम नांवाच्या विदर्भ देशाच्या राजानें ( तृ. चें ए. व. कर्ता. बोलिजेलें या क्रियेचा. कर्मणी प्रयोग ) ' तुम्ही कोठून आलां ' अशा बोलें—असा प्रश्न करून. बोलिजेलें—विचारिलें ( बोल धातूचें तृ. पु. ए. व. कर्मणीप्रयोगाचें रूप ). द्विजीं-ब्राह्मणांनीं. निषधा पासाव—निषधराजापासून ( पासाव हें पासून याचें एक रूप आहे. याचा प्रयोग कवितेंत किंवा बायकांच्या बोलण्यांत होतो. ) ह्मणीजेलें—उत्तर दिलें ( ह्मण धातूचें तृ. पु. ए. व. कर्मणी. प्रयोगाचें रूप ).

---

१ अशा—पा.

दिंडी—**भीमराजा मग गिरा वदे ऐसी ।**
**निषधदेशीं नळराजरीति कैसी ॥**
**असें ऐकोनि वदति विप्र त्यासी ।**
**विप्रयासीं वक्तृत्व ये जयांसी ॥ १३ ॥**

मग भीमराजा ' निषधदेशीं नळराजरीति कैसी ' ऐसी गिरा वदे. असें ऐकोनी जयासी वक्तृत्व विप्रयासीं ये ( असे ) विप्र त्यासी वदति.

मग—त्यानंतर. वर सांगितलेलें बोलणें झाल्यावर. निषधदेशीं—निषध देशांत. नळ नांवाचा राजा तो नळराज ( क. ) त्याची नीति ती नळराजनीति ( ष. त. ) कैसी—कशी, कशाप्रकारची ( आहे ती सांगा अध्याहृत ) ऐसी—अशी, गिरा—भाषण. वदे—बोलला. असें ऐकोनी—हें भीमराजाचें भाषण ऐकून, जयासी—ज्या ब्राह्मणांस ( च. चे अ. व ) वक्तृत्व—संभाषण करण्याची कला. विप्रयासीं विशेष संकटांत ( वि+प्र+आयास=वि=विशेष+प्र=प्रकर्षानें+आयास=संकट, श्रम ह्मणून विप्रयासीं=विशेष, अत्यंत संकटांत, अतिशय कष्टांत ). ये—पडे. जया...... ये—वर्णन करण्यास ज्या ब्राह्मणाची मति कुंठित झाली. ( कारण नळराजाची नीति इतकी चांगली होती कीं तिचें कितीही वर्णन केलें तरी तें यथार्थ न होतां कमीच पडलें असतें ). विप्र—ब्राह्मण. त्यासी—भीमराजास. वदति—बोलते झाले.

श्लोक—व. ति.—**हे वामनैकपद भूमि नसोन जंघी ।**
**एके दिशींच दिनराज नभास लंघी ।**
**वारांशि वानरविलंघित होय तो कीं ।**
**लोकीं नसे नलयशस्तुलना विलोकीं ॥ १४ ॥**

हे भूमि वामनैकपद (आहे ), जंघी नसोन दिनराज नभास एके दिशींच लंघी, कीं तो वारांशि वानरविलंघित होय ( ह्मणून ) नलयशस्तुलना लोकीं नसे ( हें ) विलोकीं.

भीमराजाच्या प्रश्नाचे उत्तरांत ब्राह्मण नळराजाच्या यशाचें वर्णन करण्याच्या हेतूनें ह्मणतात.

हे–दर्शकसर्वनाम स्त्रीलिंग, भूमि-पृथ्वी. वामनाचें एक पद ह्म. पाऊल तें वामनकैपद. ( वामन अवतारांत विष्णूनें बलीचें सत्व घेण्या करितां एका पावलांत सर्व पृथ्वी ओलांडिली अशी कथा आहे. ) जंघी–मोठा. नसोनि–नसतां. दिनराज–सूर्य. दिनाचा ह्म. दिवसाचा राजा तो. ( ष. त. ) एके दिशींच–एका दिवसांतच. लंघी–उल्लंघन करतो, ओलांडून जातो. नभास–आकाशास. कीं–किंवा. तो–प्रसिद्ध असा. वार्राशि–समुद्र, वार्–पाणी त्याचा राशि ह्म. समुदाय आहे ज्यांत तो ( ब. ) किंवा वार् जें त्याचा राशि तो वार्राशि ( ष–त. ). वानरविलंघित–वानरानें विलंघित तो ( सीताशुद्धी करितां मारुति जो जातीचा वानर होता त्यानें समुद्र ओलांडला अशी रामायणांत कथा आहे ) नलाचें जें यशस् त्याची किंवा त्याला तुलना ती नल यश स्तुलना. लोकीं–ह्या जगांत. नसे–नाहीं विलोकीं–पहा. त्याप्रमाणें पृथ्वी, आकाश व समुद्र संकुचित असल्यानें त्यांची उपमा विस्तीर्ण नलराजयशाला देतां येत नाहीं.

अलंकार—परिकर चरण २.

व्यतिरेक चरण १।२।३।४ मिळून.

श्लोक. शा. वि.

**जो पाहे सदसद्विचार हृदयीं, जोपा जनाची करी**
**जो पावे समयीं, विशेष गणिला जो पावनां भीतरी**
**सोपा जो सकळा द्विजां, सुमतिचा सोपा, सदा लाभतो**
**कोपातें न धरीच तो नळ मही-गोपायिता शोभतो ॥ १५ ॥**

जो हृदयीं सदसद्विचार पाहे, ( जो ) जनाची जोपा करी, ( जो ) समयीं पावे, जो पावनां भीतरी विशेष गणिला, जो सकळां द्विजां सोपा ( आहे ), जो सुमतिचा सोपा ( आहे ), ( जो ) सदा लाभतो, ( जो ) कोपातें न धरीच तो नळ महीगोपायिता शोभतो.

हृदयीं–चित्तांत, अंतःकरणांत. सत् ह्म. चांगलें आणि असत् ह्म. वाईट, चांगलें नाहीं तें, ( द्वंद्व ) त्यांचा जो विचार तो सदसद्विचार ( ष. त. ).—

चांगलें काय व वाईट काय याचा विचार. पाहे–करतो. जनाची–लोकांची, येथें आपल्या प्रजेची. जोपा–संरक्षण. जो समयीं पावे– प्रसंगीं उपयोगी पडतो. पावनां भीतरी–पवित्र करणाऱ्यांत. गणिला–मानिला आहे. सोपा–सहज भेट घेतां येण्या सारखा. सुमतिचा–सद्बुद्धीचा. सोपा–घर. लाभतो—लाभदायक होतो, ज्यापासून लाभ होतो. कोपातें धरीच ना–जो कधींही रागावत नाहीं, संतापत नाहीं, तो–वर ज्याचें वर्णन केलें असा तो नळ, महीचा पृथ्वीचा गोपायिता —पालन करणारा. ( ष. त. ) शोभतो–योग्य होतो.

अलंकार—अनुप्रास चरण १।२।३।४

श्लोक–शा. वि.

**जो धैर्यें धरसा, सहस्त्रकरसा तेजें तमा दूरसा ।**
**जो रत्नाकरसा गभीर, शिरसा भूपां यशोहारसा ॥**
**ज्ञाता जो सरसावला, नवरसांमाझारि शृंगारसा ।**
**शोभे तामरसाक्ष तो, नळ रसानाथ स्तवूं फारसा ॥ १६ ॥**

जो धैर्यें धरसा ( आहे ), तेजें सहस्त्रकरसा ( आहे ), तमा दूरसा ( आहे ), जो रत्नाकरसा गभीर ( आहे ), भूपां शिरसा ( आहे ) ( जो ) यशोहारसा ( आहे ), जो ज्ञाता नवरसामाझारि शृंगारसा सरसावला, जो तामरसाक्ष शोभे, तो रसानाथ नळ फारसा स्तवूं.

जो—( नळराजा ), धैर्यें–धैर्यानें. धरसा—पर्वतासारखा. धैर्यें धरसा—पर्वतासारखा कधीं न डगमगणारा. तेजें—तेजानें. सहस्त्रकरसा—सहस्त्र आहेत कर ह्म० किरण ज्याचे तो सूर्य ( ब. ०) त्यासारखा. जो सूर्याप्रमाणें अत्यंत तेजस्वी आहे. तमा दूरसा—अज्ञाना दूर, अज्ञानरहित. रत्नाकरसा—रत्नांचा

आकर म्ह० खाण तो ( ष. तत्पु. ) म्ह० समुद्र त्यासारखा गभीर—खोल, शांत. भूपां शिरसा—राजांना डोक्याप्रमाणें श्रेष्ठ. जसें अवयवांत डोकें श्रेष्ठ त्याप्रमाणें राजांना श्रेष्ठ. यशोहारसा—यश म्ह० कीर्ति हाच आहे हार ज्याचे त्यासारखा ( बहुव्री. ) म्ह० ज्याला यशाशिवाय दुसऱ्या भूषणाची जरूरी नाहीं असा. नवरसामाझारीं—नवरसांत, शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स, अद्भुत आणि शांत असे नऊ रस साहित्यशास्त्रांत सांगितले आहेत, त्यांत जसा शृंगार पहिला आहे तसा. सरसावला—पुढें आला, पहिली पदवी पावला. ( अर्थात् शहाणे लोकांत. ) तामरसाक्ष—तामरस म्ह० कमल त्या प्रमाणें आहेत अक्षि ज्याचे तो, सुंदर डोळे असलेला. रसानाथ—रसा म्ह० पृथ्वी तिचा नाथ म्ह० पति तो रसानाथ म्ह० पृथ्वीपति ( ष. त. ) फारसा—पुष्कळ. स्तवूं वर्णन करूं. यश गाऊं.

अलंकार—पूर्णोपमा चरण १।२।३।४

**दिंडी—अशी होतां नळ—चरित—कथा कांहीं।**
**भीमनामा भूपाळ परिसतांही॥**
**जवळि होती लडिवाळ जे सदाही।**
**सुता दमयंती नाम जीस पाहीं॥ १७॥**

अशी कांहीं नळचरितकथा होतां ( व ) भीमनामा भूपाळ ही परिसतां, जे सुता सदाही लडिवाळ ( आणि ) जीस दमयंती नाम ती जवळि होती.

अशी—अशा प्रकारें, कांहीं—थोडीबहुत. नळचरितकथा—नळाच्या चरिताची चरित्राची कथा गोष्ट, वृत्तांत ती. होतां—होत असतां, सांगत असतां, भूपाळ—राजा. भू—पृथ्वी, भूमी तिला पाळणारा तो भूपाळ. ( उ. ) परिसतां—ऐकत असतां. जे सुता—जी मुलगी. सदाही—सदोदित, नेहमीं, लडिवाळ—आवडती प्रियकर.

मालि०—**निषध-पति-कथा हे जे सुधेते जयंती ।**
**परिसुनि दमयंती रंजली रंजयंती ॥**
**नवल मज न भासे चंद्रवंशैकशाली ।**
**नल तरि वनमाळी भीमकी हेचि झाली ॥ १८ ॥**

जे सुधेते जयंती ( ते ) हे निषध-पति-कथा परिसुनि रंजयंती दमयंती रंजली. ( यांत ) मज नवल न भासे. ( कारण ) चंद्रवंशैकशाली नल ( जर ) वनमाळी तरि हेचि भीमकी झाली.

जे–जी. सुधेते–अमृताला. जयंती–जिंकणारी जे...जयंती–जी कथा अमृतापेक्षांही अत्यंत सुरस अशी. निषधपतिकथा–निषधाचा पति इ० स्वामी त्याची कथा ती इ० नल राजाची हकीकत ( ष. त. पु. ) परिसुनि–ऐकून. रंजयंती–रंजविणारी. अत्यंत मनोहर. ( हें विशेषण दमयंतीलाही लावतां येतें किंवा कथेलाही लावितां येईल. ) रंजली–मोहित झाली. आनंद पावली. यांत. मज...भासे—मला कांहीं आश्चर्य वाटत नाहीं. चंद्रवंशैकशाली–चंद्राचा जो वंश तो चंद्रवंश त्यांतील जो विशेषेंकरून एकटाच तो चंद्रवंशैकशाली चंद्रवंशात जे राजे होऊन गेले त्यां सर्वांत अत्यंत थोर असा. ' शाली ' हा प्रत्यय आहे. हा नामाला लागून नामानें दाखविलेला धर्म किंवा वस्तु ज्या जवळ प्रकर्षानें आहे तो अशा अर्थाचें विशेषण केलें जातें. ( दा. व्या. पा. ५०० ) जसें भाग्यशाली ऐश्वर्यशाली इ०. वनमाळी–वनमाळा ज्याला आहे तो कृष्ण. चंद्र...माळी. नळाला जर आपण कृष्ण असें मानिलें तर. हेचि–दमयंती. भीमकी–भीमकराजाची कन्या रुक्मिणी. जर नळ–राजाला कृष्णाची उपमा दिली तर दमयंतीला रुक्मिणीचीच उपमा शोभेल ( असा भावार्थ ). कृष्ण हा चंद्रवंशी असून अत्यंत ऐश्वर्यशाली होता त्यावरून नळाशीं त्याचें साम्य तसेंच रुक्मिणीच्या बापाचे नांवांत व दमयंतीच्या बापाच्या नांवांतही साम्य आहे. ह्या गोष्टीकडेसही कवीचें लक्ष गेलें असावें असें दिसतें.

अलंकार—उपमा चरण ३।४

मात्स्य. भारा.—**नळराजकथा सुधाचि साजे ।**
**दमयंती वरवर्णिनी विराजे ॥**

**मिळणी उभयांशि होय जेथें ।**
**अधिकारी अधिकानुराग तेथें ॥ १९ ॥**

नळराजकथा सुधाचि साजे. दमयंती वरवर्णिनी विराजे ( या ) उभयांशि जेथें मिळणी होय तेथें अधिकानुराग अधिकारी ( आहे ).

नळराजाची कथा ती नळराजकथा. सुधाचि-अमृतच. ( पक्षीं, चुना ) साजे-शोभे. वरवर्णिनी-वर ह्म. श्रेष्ठ. त्यांचें वर्णन करणारी गुण घेणारी ती वरवर्णिनी ( उपप. ) अथवा वर ह्म० श्रेष्ठ असा आहे वर्ण ह्म. रंग जीचा ती वरवर्णिनी ( बहुव्री. ) उत्कृष्ट स्त्री. पक्षीं हळद उभयांशि-उभयतांस, दोघांची. मिळणी-एकत्र होणें. अधिकानुराग अधिक ह्म. जास्त पुष्कळ, अनुराग ह्म. प्रीति. (क. धा. ) अधिकारी-हक्कदार. ' ह्या श्लोकाचें तात्पर्य-अमृत हा उत्तम पदार्थ आणि दमयंती ही उत्तम पदार्थांचें वर्णन करणारी ह्म. गुण घेणारी ( चहा करणारी ) ह्मणून ह्या दोघांचा मिलाफ झाल्यावर अधिक अनुराग ह्म. प्रीतिच हक्कदार हक्काची आहे खचीत होणारी आहे. गुणी आणि गुणज्ञ ह्यांची गांठ पडल्यावर गुणवानाविषयीं गुणज्ञाचे चित्तांत प्रीति उत्पन्न होते तद्वत्. एथें श्लेषानेंही एक दृष्टांत सुचविला आहे; तो असा-सुधा ह्म. चुना आणि वरवर्णिनी ह्म. हळद हीं एकत्र मिळाली असतां अधिकच अनुराग ह्मणजे रक्तिमा येतो तद्वत्-' ( नवनीत पान ३८५ टीप )

अलंकार—श्लेष चरण १।२।४.

दिंडी—**कथा तेथिल ही होय असो ऐसी[1] ।**
**हेर आला तो वदे नैषधासी[2]**
**तुझ्या कथनीं वैदर्भ[3]-राजयासी ।**
**प्रीति होती तनयाहि तयापासी ॥ २० ॥**

असो. तेथिल ऐसी ही कथा होय. हेर आला. तो ' वैदर्भराजयासी तुझ्या कथनीं प्रीति होती; तनया ही तयापासी ( होती. असें ) नैषधासी वदे.

---

१ कथा तेथील होय असो ऐसी. पा.

२ अले जासूद वदति नैषधासी. पा.

३ विदर्भ-पा.

वैदर्भ देशाच्या राजाची गोष्ट पुरी करून श्रोत्यांचें लक्ष दुसरीकडे वळविण्याच्या हेतूनें कवि ह्मणतात. असो–तें राहूं द्या. तेथिल–वैदर्भदेशाच्या राजाचे सभेंतील. ऐसी–असली, असी. कथा-हकीकत. होय–झाली. ( त्यानंतर ) हेर बातमीदार. आला–नळराजाकडेस येता झाला. वदे–सांगितलें. वैदर्भराजयासी...इत्यादि त्यानें सांगितलें. वैदर्भदेशाचा राजा त्यास वैदर्भराजयास. तुझ्या कथनीं—तुझी हकीकत ऐकण्यांत. प्रीति होती—आवड होती. तनया–मुलगी. तयापासी—त्याजवळ. नैषधासी—निषधदेशाचा राजा-नळ त्याला.

शा. वि.–**बापाच्या उजवेकडेसि बसली म्यां पाहिली नोवरी**
**व्यापारांतर टाकुनी तव कथालापासि जे आदरी**
**तापातें हरिते करोनि मधुरालापासि जे सुंदरी**
**ज्या पावे जगदीश, सांग-सुमनश्चापा नृपा त्या वरी ॥२१॥**

जे व्यापारांतर टाकुनी तव कथालापासि आदरी, जे सुंदरी मधुरालापासि करोनि तापातें हरिते, ( जी ) बापाच्या उजवेकडेसि बसली, ( ती ) नोवरी म्यां पाहिली: ज्या जगदीश पावे त्या सांग–सुमनश्चापा नृपा ( ती ) वरी.

जे–जी. व्यापारांतर–अन्य व्यापार ते. टाकुनी—सोडून देऊन. तव—तुझे कथालापास–कथेचे आलाप ह्म० बोलणें तें त्यांस ( ष. तत्पु. ). आदरी—चित्त देऊन ऐके. जे सुंदरी–जी सुंदर तरुणी. मधुरालापासि–मधुर असे जे आलाप ते ( कर्म. ) त्यास तापातें–परिश्रमातें. हरिते-नाहींसे करते. घालविते. उजवेकडेसि–उजव्या बाजूस ( उजव्या मांडीवर मुलीनें बसावें डाव्या मांडीवर बायकोनें बसावें अशी धर्माज्ञा आहे ) बसली–बसलेली होती. नोवरी–उपवर झालेली मुलगी. पाहिली–देखिली. जगदीश–जगताचा ईश ह्म. स्वामी तो ( ष. तत्पु. ) सांग सुमनश्चाप अंगासहित तो सांग; सुमन ह्म. पुष्प आहे चाप ह्म. धनुष्य ज्याचें तो सुमनश्चाप ह्म. मदन; सांग असा जो सुमनश्चाप तो सांग ह्म. सदेहमदन त्यास ( कर्म. ) देहधारी मदन ( पक्षीं ) मदनासारखा सुंदर देह धारण करणारा. वरी–माळ घालील.

अलंकार रूपक चरण ४

व. ति.—**जें अंतरंग पिंवळें सरसीरुहाचें ।**
**भासे मनांत मज अंग तसें तियेचें ॥**

**गोरोचनापरिस गौर असें गणावें ।**
**सोनेंच बावनकसी न कसें ह्मणावें ॥ २२ ॥**

मज मनांत भासे ( कीं ) जें सरसीरुहाचें पिवळें अंतरंग तसें तियेचें गोरोचना परिस गौर असें अंग गणावें. ( तया ) बावनकसी सोनेंच कसें न ह्मणावें ?

कवि दमयंतीच्या अंगाचें गोरेपण वर्णन करण्याच्या हेतूनें ह्मणतात कीं तिचें अंग ह्मणजे दमयंतीचें अंग इतकें पिवळें व गौरवर्ण होतें कीं सरसीरुहाचे ह्म. कमळाचे ( सरसी सरोवरांत रुह ह्म. रुजणारें तें सरसीरुह ( उपप ) त्याचें ) जें पिंवळें ह्म. पिवळ्या रंगाचें अंतरंग ह्म. आंतलें अंग ( अंतर ह्म. आंतील असें जें अंग तें अंतरंग ( कर्म. ) तसें ह्म. त्याप्रमाणें पिंवळें असून गोरोचना पेक्षांही जास्त गौरवर्ण असें होतें. गौर–गोरा रंग. दमयंतीचें अंग केवळ पांढरें फटफटीत नव्हतें तर पांढऱ्या रंगांत किंचित् पिंवळ्या रंगाची झांक असतां जसा रंग दिसला असतां तशा रंगाचें होतें. तोच भावार्थ दुसऱ्या उपमेनें दर्शवितात कीं त्या रंगाला बावनकशी ह्म. अगदीं निर्मळ असें सोनेंच कां न ह्मणावें ? अर्थात् सोनेंच ह्मणण्यास हरकत नाहीं. कारण निर्मळ सोन्याचा जसा रंग असतो तसाच तिचेही अंगाचा वर्ण होता.

उपमा—चरण १।२।३
अपन्हुति—चरण ४

दिंडी—**असें बोले तो चार समाचारा ॥**
**करी दमयंती नलमनीं विहारा ॥**
**नोवरी हे मज होय केवि दारा ॥**
**करूं लागे तैं[1] भूप या विचारा ॥ २३ ॥**

तो चार असें समाचारा बोले. दमयंती नलमनीं विहारा करी तैं हे नोवरी मज दारा केवि होय या विचारा भूप करूं लागे.

तो–विदर्भदेशाकडून आलेला. चार–जासूद, बातमीदार, असे–अशा वर सांगितल्या प्रकारच्या. समाचारा–हकीकत, ( द्वितीयेचे ए. व. ) बोले–सांगता झाला ( तेणें करून असें झालें कीं ) दमयंती. नलमनीं–नलाचें

---

१ लागला.

मन तें त्यांत ( ष० तत्पु० ) विहारा करी–विहार करूं लागली. तात्पर्य नलराजाचे मनास रात्रंदिवस दमयंतीचें चिंतन लागलें. तैं–तेव्हां, त्यास-मयीं. हे नोवरी–ही उपवर झालेली दमयंती मुलगी. मज...होय माझी बायको कसी, कोणत्या उपयानें होऊं शकेल.

दिंडी—**विभूतीनें झांकला अनळसा तो ॥**
**गुप्त दमयंती–विरह नृपा होतो**
**नित्य पोटीं वडवाग्नि पेट घेतो ॥**
**सागरानें तो काय सांगिजेतो ॥ २४ ॥**

विभूतीनें झांक ( ले ) ला तो अनल ( त ) सा नृपा दमयंतीविरह गुप्त-( पणें ) होतो. ( किंवा ) ( जो ) वडवाग्नि पोटीं नित्य पेट घेतो तो सागरानें काय सांगिजेतो.

विभूतीनें–राखेनें, पक्षीं ऐश्वर्यानें. झांकला–झांकलेला, आच्छादित केलेला. तो–प्रसिद्ध असा. अनल–अग्नि. सा–तसा, त्याप्रमाणें. नृपा–राजाला, नल-राजाला. दमयंतीचा विरह तो दमयंतीविरह. विरह–वियोग. गुप्त–गुप्तपणें, आंतल्या आंत. बाहेर न दिसण्या सारखा. ( किंवा जो ) वडवाग्नि–समुद्राच्या उदरांत जो पुराणप्रसिद्ध अग्नि आहे तो. नित्य–सतत. पेट घेतो–पेटतो, जळतो. तो सागरानें–समुद्रानें. काय–सांगिजेतो–सांगविला जाणार आहे. तो...जेतो. हें कर्मणीप्रयोगाचें उदाहरण आहे सागराच्या पोटांतील वडवाग्नि पेट घेतो, जळतो त्याची व्यथा जसी सागराला सांगतां येत नाहीं त्याप्रमाणें नळराजाला दमयंतीच्या विरहाची व्यथाही सांगतां न येण्यासारखी होती.

उपमा–चरण १।२

दृष्टांत–चरण ३।४

गीति—**रजनी दिवस गमेना नृपतिस संगीतही सुख गमेना ॥**
**मन कोठेंहि रमेना ह्मणोनि करि वनविहार सह सेना ॥ २५ ॥**

नृपतिस रजनी दिवस गमेना, संगीत ही सुख गमेना. कोठेंही मन रमेना, ह्मणोनि सेना सह वनविहार करी.

नृपातिस–नळराजाला. रजनीदिवस–रात्रिंदिन, अहोरात्र. (क्रियाविशेषण.) गमेना–करमेना. संगीत–गाणेंबजावणें. सुख–सुखकर. गमेना–वाटेना. कोठें. रमेना–मनाचे रंजन कोठेंच होईना. ह्मणोनि–म्हणून, यासाठीं. (उभयान्वयी अ०) सेनासह–बरोबर सेना घेऊन. वनांतील किंवा वनाचा (वन–अरण्य) विहार म्हणजे क्रीडा तो वनविहार. (ष. किंवा स तत्पु.) सेना... करी–क्रीडा करण्या-करितां अरण्यांत गेला.

व. ति.—गंगातरंग समजो निजदेहवर्णीं ॥
भृंगापरी रुचिर कांति जयाशि कर्णीं ॥
जंघाल जो पवनसंगतिची सवें घे ॥
शृंगारला हय तयावरि भूप वेंघे ॥ ३६ ॥

जो निजदेहवर्णीं गंगातरंग सम (आहे) जयाशिं कर्णीं भृंगापरी रुचिर कांति (आहे), जो जंघाल (असून) पवनसंगतीची सवे घे (असा जो) हय शृंगारिला (आहे) तयावरी भूप वेंघे.

जो (हय)—जो घोडा निजदेहवर्णीं निज–स्वतःचा देह शरीर तो निजदेहाचा वर्ण ह्म० रंग तो त्यांत (ष. तत्पु) त्यासंबंधांत त्याचा गंगातरंग–गंगेचा तरंग तो (ष. तत्पु.) त्यासम त्यासारखा ह्म० गंगेच्या लहरीसारखा अर्थात् पांढरा शुभ्र. जयाशि–ज्याला. कर्णीं–कानाचे ठिकाणीं भृंगापरी–भ्रमरा प्रमाणें (अर्थात्) काळी भोर. रुचिर–मनोहर. कांति-वर्ण, जंघाल–वेगवान, जलद चालणारा. पवनसंगतीची–पवनाची ह्म० वाऱ्याची संगति ह्म० सोबत ती तिची सवें–सवय. जो...घे–जो घोडा अत्यंत वेगवान असून वाऱ्याच्या सोबतीची सवय घेतो ह्म० वाऱ्याप्रमाणें शीघ्र धांवतो. हय–घोडा. शृंगारिला–अलंकार वगैरे घालून सुशोभित केला आहे. तयावरि–अशा वर वर्णन केलेल्या घोड्यावर. भूप–नळराजा. वेंघे–चढून बसे. आरोहण करी. वेंघणें–ओलकंबणें, लोंबणें, त्यावरून पर्यायानें आरोहण करणें.

उपमा—चरण १।२।३

व. ति.—जो अंबरीं उफळतां खुर लागला हे ॥
तो चंद्रमा निजतनूवरि डाग लाहे

**जो या यशास्तव कसें धवलत्व नेघे ॥**
**शृंगारिला हय तयावरि भूप वेंघे ॥ २७ ॥**

शृंगारिला हय अंबरीं उफळतां जो खुर लागला हे तो ( च जणु काय ) डाग चंद्रमा निजतनूवरि लाहे. जो शृंगारिला हय या यशास्तव धवलत्व कसें नेघे ? ( अर्थात् घे ) तयावरी भूप वेंघे.

अंबरीं—आकाशांत. उफळतां–उडता. ( अं...तां घोडा पळतांना जणु काय आकाशांतच उडतो आहे असें वाटत असे इतका तो वेगवान होता ) खुर–पायाचा खालचा जमीनीला टेकण्याचा टणक नखाचा भाग. डाग–चिन्ह, कलंक काळा वगैरे वाईट दिसण्यासारखा ठिपका निजतनूवरी–निज ह्म० स्वतःची जी तनु ह्म. देह शरीर ( क. ) तिजवर. लाहे–लाभला, मिळाला, या यशास्तव–या कीर्तिच्या कारणानें ( चंद्राला डाग लावला ह्या कीर्तिमुळें ). धवलत्व–पांढरेपणा शुभ्रता. कसें ने घे कसें घेणार नाहीं ( अर्थात् घेईलच. कीर्तिचा वर्ण पांढरा असल्याचें कवि वर्णन करितात, ह्मणून त्या कीर्तीमुळें घोडयाचा वर्ण पांढरा झाला पाहिजे असा अर्थ. )

अलंकार—संबंधातिशयोक्ति.

दिंडी—**सर्व सेना भूपाळ निघाला हे ।**
**शींव लंघी उद्यान एक पाहे ॥**
**रिघे तेथें मित सेवकांसि वाहे ।**
**फौज सारी बाहेर उभी राहे ॥ २८ ॥**

भूपाळ सेना सवें ( घेऊन ) निघाला हे. शींव लंघी. एक उद्यान पाहे. तेथें रिघे. मित सेवकांसि वाहे. सारी फौज बाहेर उभी राहे.

भूपाळ—नळराजा. भूतें ह्म. भूमीला, पृथ्वीला पाळी तो भूपाळ ह्म. राजा ( उप-प. ) सवें–सोबत, सह. निघालाहे–निघाला आहे. शींव–मर्यादा. गांवाची हद्द. लंघी–ओलांडून पलीकडे गेला. उद्यान–नजरबाग, उपवन. पाहे–पाहता झाला. तेथें–त्या उद्यानांत. रिघे–शिरला. मित–थोडें, मोजतां येतील असे ( मा–मोजणें ) सेवकांसि–नौकरमाणसांसि. मित...वाहे–उद्यानांत नळराजा आपले बरोबर थोडे नौकर घेऊन शिरला बाकीची सर्व फौज उद्यानाबाहेरच उभी राहिली.

दिंडी—**पनस जंबू जंबीर विविध निंबें ।**
**कुंद चंदन माकंद सुदाडिंबें ॥**
**तुंग नारिंगें विकसलीं कदंबें ।**
**वसति तेथें शुक-सारिका-कदंबें ॥ २९ ॥**

तेथें पनस, जंबू, जंबीर, विविध निंबें, कुंद, चंदन, माकंद, सुदाडिंबें, तुंग नारिंगें, कदंबें ( इत्यादि ) विकसली. ( तेथें ) शुकसारिकाकदंबें वसती.

तेथें—त्या बागेंत. पनस—फणस, जंबू—जांभळें. जंबीर—एकप्रकारचीं लिंबें. विविध—नानाप्रकारचीं. निंबें—लिंबें. कुंद—एक प्रकारची पांढऱ्या रंगाचीं सुवासिक पुष्पें आहेत त्यांचीं झाडें. चंदन—चंदनाचें झाड. सुदाडिंबें—दाळिंबाची सुंदर सुंदर झाडें. माकंद—आंब्याची झाडें. तुंग—उंच, मोठालीं. नारिंगें—साकर निंबें. विकसलीं ह्म. फुललीं. फुलांचा बहार आला. शुकसारिकाकदंबें—शुक ह्म. पोपट आणि सारिका ह्म. मैना यांचीं कदंबें ह्म. थवे, कळप, झुंडी इ० ते ( ष. त. )

वंशस्थ—**लते-तळीं रुंद निरुंद कालवे ॥**
**गळोनि तेथें मकरंद कालवे ॥**
**परागही सांद्र तयांत रंगती ॥**
**फुलांसवें भृंगतती तरंगती ॥ ३० ॥**

लते-तळीं रुंदनिरुंद कालवे तेथें मकरंद गळोनि कालवे. तयांत सांद्र परागही रंगती. भृंगतती फुलांसवें तरंगती.

लते-तळीं-लतेच्या वेलीच्या, तळीं-मुळांशीं. रुंद निरुंद—कांहीं लहान कांहीं याहूनही लहान. कालवे-पाण्याचे पाट पाणी वाहण्या करितां केलेले लहान लहान पन्हळ. तेथें—त्या पाण्याच्या पाटांत. मकरंद—फुलांतलि मध. गळोनि—झिरपून, थेंब-थेंब टपकून. कालवे ह्म० मिसळतो. मिश्रण पावतो. तयांत—त्या पाटांतील पाण्यांत. सांद्र—दाट. पराग—फुलांतील केसर. रंगती—रंगीत होतात. केशराचा रंग पाण्यांत उतरून तो रंग त्याच केशराला आणखी लागतो. भृंगतती—भृंगांच्या भ्रमरांच्या तती ह्म० झुंडी. ( ष. त. ) फुलांसवें—फुलाबरोबर. तरंगती—पोहतात. ह्म० फुलें पाटाच्या पाण्यांत गळून पडून वहात जातात त्याचा मध व सुवास घेण्यसाठीं बसलेले भ्रमरही पाण्यांत फुलाबरोबर वहात जातात.

अलंकारः–सहोक्ति.

गीति–**उपरि सकंटक सांचे परंतु सांचे जयांत सुरसाचे ॥**
**घोंस असे फणसाचे षण्मासांचे कितेक वरसाचे ॥ ३१ ॥**

( जे ) उपरि सकंटक साचे परंतु जयांत सुरसाचे सांचें ( आहेत ) असे कित्येक वरसाचे ( कितेक ) षण्मासाचे फणसाचे घोस ( तेथें असती )

उपरि–वरून, वरच्या बाजूनें, बाहेरच्या अंगानें. सकंटक–कांटे असलेले, कंटका सहित ह्म० कांट्यासहित ते सकंटक. साचे–खरे, खरोखर. जयांत–ज्यां फणसांत–ज्याच्या पोटांत. सुरसाचे–सु ह्म०चांगल्या रसाचे ते, रसदार. सांचे–ठसे, वरसाचे–वर्षाचे, ( वरीस हा 'वर्ष' या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश ) षण्मासाचे–सहामहिन्याचे. घोंस–घड, झुबके.

अलंकार—विरोधाभास चरण १।२

उपे—**तयावनीं एक तटाक तोयें ॥ तुडुंबलें; तामरसानपाये**
**निरंतरामंद मरंद वाहे ॥ तपांत ही यास्तव रिक्त नोहे ॥ ३२ ॥**

तया वनीं एक तटाक तोयें तुडुंबलें; ( तेथें ) तामरसानपायें अमंद मरंद निरंतर वाहे; यास्तव ( तें तटाक ) तपांतही रिक्त नोहे.

तया वनीं–त्या उपवनांत, त्या बागेंत. तटाक–लहानसा जलाशय, पल्वल, तोयें–पाण्यानें. तुडुंबलें–कांठोकांठ भरलें होतें. तामरसानपायें–नाहीं अपाय म्ह० नाश तो अनपाय. तामरसाचा ह्म. कमलाचा अनपाय तो त्यानें पार्थी ह्म. कमलांचा नाश होत नसल्यामुळें. हेत्वर्थें तृतीया निरंतरामंद–निरंतर व अमंद असा ( क. ) सतत व मंद नाहीं तो अमंद ह्म. हळुहळु नाहीं असा ह्म. पुष्कळ असा. मरंद–पुष्परस, मकरंद. वाहे–वहात असे. यास्तव–यामुळें, या कारणास्तव. तपांत–उन्हाळ्यांत देखील. रिक्त–रिकामें. नोहे–होत नसे. ( कारण मकरंदाची पाण्यांत भर पडत असे यामुळें असें तात्पर्य ).

अलंकार—संबंधातिशयोक्ति.

द्रुतविलंवित—**अमृतही पयही ह्मणवीतसे ।**
**उभय होय तसी रुचि वीतसे ॥**

**मधुर सारस तें जल गा तसें।**
**मधुर सारस यास्तव गातसे ॥ ३३ ॥**

गातें सारस जल तसें मधुर ( कीं ) अमृत ही पय ही ह्मणवीतसे; ( कारण ) उभय होय तसी रुचि वीतसे. यास्तव सारस मधुर गातसे.

गा—अगा, अहो. सारस—ह्या. सरोवरासंबंधी, तळ्यांतील. जल—पाणी. तसें—त्याप्रमाणें. मधुर—गोड, रुचकर, मिष्ट. ( कीं तें आपणाला ) अमृत—न मृत तें अमृत. देवां करितां समुद्रमंथनसमयीं दिव्य रस निघाला तें. पय—दूध. अमृत... ह्मणवीतसे—( पाण्याचीं अमृत आणि पय असी दोन नांवें आहेत त्यावर लक्ष देऊन कवि ह्मणतात ) पाण्याला अमृत किंवा पय असी दोन नांवें आहे तीं येथील पाण्याला सार्थ आहेत कारण या ठिकाणच्या पाण्याची रुचि अमृता सारखी आणि दुधासारखी ही आहे. उभय—दोनी—अमृत आणि पय. वीतसे—देते. यास्तव—ह्मणून सारस—सारस नांवाचे पक्षी. मधुर—कर्णमनोहर. गातसे—गायन करतात. यास्तव... गातसे—वर सांगितल्या कारणांमुळें त्याठिकाणीं रहाणारे सारस पक्षी कर्ण मनोहर असें गायन करितात; सारस पक्षी स्वभावतःच मधुर गातात, परंतु कवि ह्मणतात कीं त्यांच्या गोड गाण्याचें कारण त्यांना ईश्वरानें मधुर स्वर दिला हें असून ह्या तडागाचें गोड पाणी ते पितात ह्मणून ते गोड गातात. किंवा ( मधुर हें क्रिया-विशेषण न करितां पाण्याचें विशेषण केलें असतां ) त्या ठिकाणाचे सारस पक्षी तेथलें पाणी मधुर रुचकर आहे असें वर्णन करितात,

अलंकारः—संबंधातिशयोक्ती.

**पीतां मरंद उदरंभरबंभराचें ॥**
**जें होय मंदिरहि सुंदर इंदिरेचें ॥**
**जें पद्म तेथिल सहस्रदळां धरीतें ॥**
**प्रत्यक्ष सूर्यकिरणांस विसाववीतें ॥ ३४ ॥**

तेथिल जें पद्म इंदिरेचें सुंदर मंदिर होय. ( तें ) मरंद पीतां उदरंभरबंभराचें ही ( मंदिर होय ). जें ( तेथिल पद्म ) सहस्रदळां धरीतें ( तें ) प्रत्यक्ष सूर्य-किरणांस विसाववीतें.

तेथिल—त्या तळ्यांतील. जें पद्म—जें कमल. इंदिरेचें—लक्ष्मीचें. सुंदर—रमणीय,

चित्तास आल्हादकारक. मंदिर—रहाण्याचें घर ( लक्ष्मीचें नाव पद्मालया असें आहे; तेव्हां अर्थात पद्म लक्ष्मीचें रहाण्याचें घर होय ). होय—आहे. मरंद पीतां—पुष्परस ( मकरंद ) पीत असतां, पिण्याचे वेळेस. उदरंभर—उदराला ह्म० पोटाला, भरणारे ते उदरंभर ( उभयततु. ) उदरंभर असे जे बंभर ह्म० भ्रमर ते उदरंभर बंभर त्यांचें. ( क. ) ही—देखील. सहस्रदळां—एक हजार पाकळ्यांना. धरीते—धारण करते. प्रत्यक्ष—साक्षात्. सूर्यकिरणास—सूर्याचें जे किरण ते त्यांस विसावतें—विश्रांति देतें.

तात्पर्य—कमलांखालीं निबिड अंधार असे. इतकी मोठीं व दाट कमलाचीं फुलें तेथें होतीं. सूर्य सहस्रकर ह्म. हजार किरणांचा असून पद्महीं हजार पांकळ्याचें ह्मणून सूर्याच्या प्रत्येक किरणांस एक एक पांकळी विसावा देई; अर्थात् त्या त्या पांकळीखालीं अंधार होई.

अलकारः—संबंधातिशयोक्ति.

दिंडी—**तया कासारीं राजहंस पाहे ॥**
**राजहंसाचा कळप पोहता हे**
**तयासाठीं हे वापिकाच पोहे ॥**
**नळें केली हें कोण ह्मणे नोहे ॥ ३५ ॥**

तया कासारीं राजहंसाचा कळप पोहता हे ( असें ) राजहंस पाहे. नळें तयांसाठीं हे वापिकाच पोंहे केली हें नोहे कोण ह्मणे ?

तया—त्या. कासारीं—तळ्यांत. राज...पोहताहे—राजहंस नांवाचे पक्षी पोहत आहेत. राजहंस—राजामध्यें जो हंसा सारखा तो ( कर्मधा ) राजश्रेष्ठ नळराजा. ( जसा जलचर पक्षांत हंस श्रेष्ठ तसा सर्व राजांत नळ राजा श्रेष्ठ ह्मणून त्यास हें विशेषण. ) पाहे—पहाता झाला. नळें—नळराजानें. तयांसाठीं—त्या राजहंसाकरितां. हे—ही. वापिका—बावडी, तळें. पोहे—पाणपोई. केली—घातली आहे. हें—हें वाक्य ( नळें...केलीपर्यंत ) नोहे—नाहीं.

अलंकार—उत्प्रेक्षा व प्रश्न.

दिंडी—**तया हंसाचे देह कांचनाचे ।**
**पक्ष झळकती वीज जसी नाचे ॥**
**रंग माणिकसे चंचुचे पदाचे ।**
**जसे अधरींचे भीम-कन्यकेचे ॥ ३६ ॥**

तया हंसाचे देह कांचनाचे (असती.) जसी वीज नाचे तसे पक्ष झळकती. चंचुचे ( आणि ) पदांचे रंग जसे भीमकन्यकेचें अधरींचें ( तसे ) माणिकसे (असती ).

तया–त्या. हंसाचे–राजहंस पक्ष्यांचे. देह–शरीरें, अंगे ( देह पुलिंगी अ. व. ) जसी...नाचे–ज्याप्रमाणें वीज लकाकते त्याप्रमाणें. पक्ष–पंख. झळकती–झकाकतात चमकतात लक्क लक्क करितात. चंचुचे–चोंचीचे. पदांचे–पायांचे. रंग–वर्ण. भीम-कन्यकेचे–भीम राजाची कन्यका तिचे, दमयंतीच्या. 'भीमकन्यकेचे' हें 'भीम-कन्यका' या शब्दाच्या पृष्ठीचें सामान्यरूप आहे=भीमकन्यकेच्या. अधरींचे–खालच्या ओठाचे. माणिकसे–माणकाच्या रंगासारखे, माणिक लाल रंगाचें असतें त्या रंगासारखे ह्म. लालरंगाचे.

अलंकार—उपमा.

व ति.—**त्यांतील एक कलहंस तटीं निजेला ॥**
**जो भागला जलविहार विशेष केला.**
**पोटींच एक पद, लांबविला दुजा तो ॥**
**पक्षीं तनू लपवि भूप तया पाहतो ॥ ३७ ॥**

त्यांतील जो एक कलहंस, विशेष जलविहार केला ( ह्मणून ) भागला ( होता ) व तटीं निजेला ( होता व ) ( ज्यानें ) एक पद पोटींच ( घेऊन ) दुजा लांबविला ( होता ) तो ( निज ) तनू पक्षीं लपवि तया भूप पहातो.

त्यांतील–त्या तळ्यांत विहार करण्यास आलेल्या राजहंसापैकी. कलहंस—राजहंस. जलविहार–जलांतील विहार ह्म. क्रीडा, खेळ तो. भागला–थकला दमला. तटीं–किनाऱ्यावर, तीरावर. निजेला–निजलेला लवंडलेला. पद–पाय. दुजा–दुसरा. लांबविला–लांब केलेला. तनू–आपलें शरीर. पक्षीं–पंखांत. लपवि–झांकून घेतलें. तया–त्या ( राजहंसाला ) भूप–भू ह्म. पृथ्वी तिला पालन करणारा तो भूप नळराजा. पहातो–देखता झाला.

अलंकारः–स्वभावोक्ति.

व० ति०–**टाकी उपानह पदें अतिमंद ठेवी ॥**
**केली विजार वरि डौराहि मौन सेवी**

**हस्तीं करी वलय उंच अशा उपायीं ॥**
**भूपें हळूच धरिला कलहंस पायीं ॥ ३८ ॥**

उपानह टाकी, पदें अतिमंद ठेवी, विजार डौरहि वरी केली, मौन सेवी, वलय हस्तीं उंच करी, भूपें अशा उपायीं कलहंस पायीं हळूंच धरिला.

उपानह–पायांत घालण्याचा चर्मी जोडा. टाकी–काढून टाकिला. पदें–पावलें अतिमंद–अगदीं हळुंच न वाजतील असीं. विजार–पायजमा. डौर–झगा, अंगरखा. मौन–मूकभाव, न बोलणें. सेवी–धारण करता झाला. वलय–( सोन्याचें ) कंकण, कडें. हस्तीं–हातांत. उंच करी–वर चढविलें ( कोपरा कडच्या बाजूला. आवाज न व्हावा या हेतूनें ) अशा उपायीं–अशा युक्तीनें पायीं धरिला–पाय धरून राजहंस कबजांत करून घेतला. ( पायीं–या सप्तमीसंबंधांत नवनीतांतील टीप पाहा ) स्वभावोक्ति.

या.—**कलकल कलहंसें फार केला सुटाया ।**
**फड फड निजपक्षीं दाविलें कीं उडाया ॥**
**नृपतिस मणिबंधीं टोंचिता होय चंचू ।**
**धरि सुदृढ जया तो काय सोडील पंचू ॥ ३९ ॥**

कलहंसें सुटाया फार कलकल केला; उडाया निजपक्षीं फड फड दाविलें कीं; नृपतिस मणिबंधीं चंचू टोंचिता होय ( परंतु ) जया सुदृढ धरि तो पंचू सोडील काय ?

कलहंसें–राजहंसानें. सुटाया–सुटण्या करितां. नळ राजाच्या हातांतून मोकळें होण्या करितां. फार–पुष्कळ. कलकल केला–ओरडून गोंगाट केला. उडाया–उडून जाण्या करितां. निजपक्षीं–आपल्या पंखानें. आपले पंख हलवून. फड फड दाविलें–पंखाचा फड फड असा आवाज करून दाखविला. ( कीं–वाक्याच्या शेवटीं निश्चयार्थी योजितात ). नृपतिस–राजाला ( अर्थात नळराजाला ) मणिबंधीं–मनगटाच्या ठिकाणीं. चंचू–चोंच. टोंचितां होय–टोंचिली. नृ...होय–राजाला मनगटाच्या ठिकाणी चावला. जया–ज्याला. सुदृढ–घट्ट. बळकट. धरि–धरिलें होतें, तो–हंस. पंचू–बहादर.

अलंकारः—स्वभावोक्ति.

मा.—**तदितर खग भेणें वेगळाले पळाले ।**
**उपवनजलकेली जे कराया मिळाले ॥**
**स्वजन गवसला जो त्याजपाशीं नसे तो ।**
**कठिण समय येतां कोण कामास येतो ॥ ४० ॥**

तदितर जे खग उपवनजलकेली कराया मिळाले ( ते ) भेणें वेगळाले पळाले. जो गवसला त्याजपाशीं तो स्वजन नसे. कठिण समय येतां कामास कोण येतो ?

तदितर—त्याच्या पकडलेल्या पक्ष्याच्या शिवाय इतर अन्य. खग-पक्षी. ख—ह्म० आकाशांत ग ह्म० गमन करणारे. ( उ. स. ) उपवनजल-केली-बागेंतील जलक्रीडा उपवन ह्म० बाग; जल-पाणी; केली-क्रीडा, उपवनांतील जल केली. ती ( स. तत्पु. ) करायां-करण्यासाठीं. मिळाले-जमले होते. भेणें-भीतिनें. वेगळाले-वेगळे वेगळे, एक एक. पळाले-उडून गेले. जो गवसला-सांपडला ( अर्थात संकटांत ) पडला. स्वजन-आपला आप्त, स्नेही, नात्यागोत्याचा. कठिण समय-संकट समय. दुःखाचा प्रसंग. येतां-आला असतां. कामास येणें-उपयोगी पडणें.

अलंकारः—अर्थांतरन्यास व प्रश्नालंकार.

दिंडी—**न सोडी हा नळ भूमिपाळ मातें ॥**
**असें जाणोनी हंस वदे त्यातें ॥**
**हंसहिंसा नच घडो तुझ्या हातें ॥**
**स्वस्थळातें पावेन पक्षपातें ॥ ४१ ॥**

हा नळ भूमिपाळ मातें नच सोडी असें जाणोनी त्यातें हंस वदे ( कीं ) तुझ्या हातें हंसहिंसा नच घडो; ( मी ) पक्षपातें स्वस्थळातें पावेन.

मातें-मला (द्वि.बि.ए.व.) न च-निश्चयानें. सोडी-सोडीत नाहीं असें जाणोनी-असें समजलें तेव्हां. त्यातें-नळ राजाला. हंस-राजहंस. वदे-बोलता झाला. तुझ्या हातें-नळराजाच्या हातानें हंसहिंसा. हंसाची हिंसा; तीहिंसा ह्म० हत्या तुझ्या,.. घडो-हंसाची हत्या तुझ्या हातानें न घडावी ह्म० मला मारूं नयेस आणि तसें केलेंस च मला सोडलेंस तर मी. पक्षपाते-पक्षाच्या पातानें (ष. तत्पु.) ह्म० पंख हलवून.

स्व ह्म० स्वतःचें स्थळ ह्म० रहाण्याचें ठिकाण तें त्यातें स्वस्थळांतें. पावेन–पोहोंचेन. जाईन ( गमनार्थी क्रियापदापुढें ज्या स्थळाला गमन व्हावयाचें असतें त्या ठिकाणची द्वितीया योजीत असतात. )

दिंडी—**जागजागीं आहेत वीर कोटी ।**
**भले झुंझारहि[१] शक्ति जया मोठी ॥**
**तया माराया धैर्य धरी पोटीं ।**
**पांखरूं हें मारणें बुद्धि खोटी ॥ ४२ ॥**

भले झुंझारही जया मोठी शक्ति ( असे, ) कोटी वीर जागजागीं आहेत. तया माराया पोटीं धैर्य धरी. पांखरूं मारणें हे बुद्धि खोटी ( आहे ).

भले-मोठे मोठे, नामांकित. झुंझार-वीर; लढवय्ये; शूर पुरुष. जया-ज्यांना मोठी शक्ति-अत्यंत बल. जया...शक्ति-जे अत्यंत बलवान् आहेत. कोटी-कोट्यावधि,-अनेक ( अनेकार्थी संख्याविशेषण योजण्याचा प्रघात आहे अनुसरून ). वीर-लढवय्ये. जागजागीं-ठिकठिकाणीं. तया माराया—त्यांची खोड मोडावयाचें. त्याच्याशीं युद्ध करण्याचें; त्याच्यावर आपलें शौर्य दाखविण्याचें. धैर्य-धारिष्ट, पांखरूं-पक्षी ( यःकश्चितार्थ...अनादर इत्यादि दाखविण्याच्या हेतूनें नपुंसकलिंगाचा प्रयोग ). बुद्धि-इच्छा. खोटी-वाईट. अर्थांतरन्यास अलंकार.

**वधुन माझी हे कनकरूप काया ।**
**कटकमुकुटादिक भूषणें कराया ॥**
**कशी आशा उपजली तूज राया ।**
**काय नाहीं तूजला दया माया ॥ ४३ ॥**

राया हे माझी कनकरूप काया वधुनि कटकमुकुटादिक भूषणें कराया तूज आशा कसी उपजली ? तुजला दया माया नाहीं काय ?

राया-हे राजा ( संबोधन. ) कनकरूप-काया-कनकासारखी काया-कनकाचे रूपा सारखें आहे रूप जीचें असी काया कनक-सुवर्ण, सोनें. काया-देह, शरीर,

---

१ पदोपदीं २ हि ( नाहीं )

तनु. ( क. ) वधुनि–वध करून, मारून. हे...वधुनि–मला मारून; माझी मान मुरगाळून. ( त्या देहाची ) कटकमुकुटादिक–कटक आणि मुकुट ते कटकमुकुट ( द्वंद्व ). कटकमुकुट आहेत आदि ( ह्म० प्रथम ) ज्याच्या ते कटकमुकुटादिक. ( बहुवी. ) कटक ह्म० कडी. मुकुट–किरीट. शिरोभूषण. आदि–प्रथम, पहिलें. भूषणें–अलंकार, दागीने. कराया–करण्याची ( अर्थात् तयार करण्याची ). आशा–इच्छा. उपजली कसी–कसी उत्पन्न झाली.

शा. वि.—**ह्मातारी उडतां नयेचि तिजला माता मदीया असी ।**
**कांता काय वदों नव प्रसव ते सातां दिसांची तसी ॥**
**पाता त्या उभयास मी मज विधी घातास योजीतसे ।**
**हातामाजि नृपा तुझ्या गवसलों आतां करावें कसें ॥४४॥**

मदीया माता, तिजला उडतां नयेचि, असी म्हातारी आहे. तसी ( मदीया ) कांता,–( तिचे ) ते नव प्रसव काय वदो सातां दिसांची ( आहे ) त्यां उभयास पाता मी ( आहे ). विधी मज घातास योजीतसे. ( ह्मणून ) नृपा, तुझ्या हातामाजि गंवसलों. आतां कसें करावें ?

मदीया–माझी. माता–आई ति...येचि–जिला उडण्याची शक्ति बिलकुल नाहीं. असी–इतकी. म्हातारी–वृद्ध ( ह्यानें तिची स्वतः पोटास मिळविण्याची असमर्थता दाखविली ) तसी–त्याप्रमाणें. कांता–बायको, पत्नी. ते नव ह्म० नवीन ( नुकतेच झालेले ) असे प्रसव ह्म०प्रसूतीवेदना बाळंत होण्याच्या वेळीं होणारे कष्ट श्रम. काय वदो–किती सांगावे ? अर्थात ते सांगणें शक्तीबाहेर आहे. शक्य नाहीं. सात दिवस झाले आहेत. ( हें सांगून स्वतः श्रम करून पोटास मिळविण्याची असमर्थता दर्शविली. ) त्या उभयास–त्या दोघांस आई व पत्नी या दोघांस. पाता–पालन करणारा; पोसणारा. ( ह्याने आपली जबाबदारी दाखविली. ) जो मी त्या मजला विधी–धाता, ब्रह्मदेव. ( दैव ) घातास योजीतसे–माझा घता ह्म० नाश करूं इच्छित आहे. नृपा–हे राजा हे नळराजा तुझ्या हातांमाजि–हातीं, हातांत. गवसलो–सांपडलों आतां कसें करावें–आतां काय युक्ती योजावी कीं जेणेंकरून तुझ्या हातातून माझी मुक्तता होईल व मी सुटेन. ( आपली कर्तव्यनिष्ठा दाखविली. ) ह्या पद्यांत कवीनें अनुप्रासालंकाराची बहार केली आहे.

पद—**हर हर सांपडलों, सांपडलों ॥**
**कैसा फांशीं पडलों ॥ हर हर सां० ॥ ध्रु० ॥**
**इतर नदी जळटाकीं ॥ टाकुनि आलों याच तटाकीं ॥ १ ॥**
**सोडुनि मानसकेली ॥ कापुनि घ्याया आलों शेली ॥ २ ॥**
**ठेवुनि तव पदिं माथा ॥ आतां सोडवि मज रघुनाथा ॥ ३ ॥**

हर हर सांपडलों सांपडलों, फांशीं कैसा पडलों ॥ ध्रु० ॥ हर हर—(खेदार्थी) शिवशिव, रामराम, इत्यादि खेदोद्गार. सांपडलों—हातीं लागलों, धरला गेलों. ( निश्चितार्थ दाखविण्याकरितां द्विरुक्ति; खरोखरच, निःसंशय धरला गेलों हा भावार्थ ). फाशीं—फांसांत ( पशुपक्षी वगैरे धरण्याकरितां पारधी लोक दोरीचें जाळें करितात त्यांत ). कैसा—कसा पडलों—सांपडलों. फांशीं...पडलों—मी कसा फसलों आणि या नळराजाच्या हस्तरूप फासांत सांपडलों हा भावार्थ. ॥ ध्रु० ॥

पद्याचा एखादा चरण बाकीच्या सर्व चरणाला जुळेल असा योजिलेला असतो त्यास ध्रुवपद ह्मणण्याचा प्रघात आहे. ध्रुव ह्म० कायमचें, न बदलणारें, असें जें पद ( चरण ) तें ध्रुवपद.

" इतर नदी जळ टाकी टाकुनि याच तटाकीं आलों ह्मणून सांपडलों इत्यादि."

इतर—याशिवाय अन्य. जळटाकीं जळानें भरलेलीं टाकीं ह्म० डबकीं. टाकुनि—सोडून; वगळून. याच तटाकीं—याच तडागावर सरोवरावर आलों.

" मानसकेली सोडून शेली कापून घ्याया आलों त्यामुळें हर हर सांपडलों इ० "

मानसांतील ह्म० मानस सरोवरांतील केली ह्म० जलक्रीडा ती मानस-केली. सोडुन—टाकून. शेली—मान, गळा. कापून घ्याया आलों.

" रघुनाथा, तव पदीं माथा ठेवुनी ' आतां मज सोडवी ' असें विनवी. "

रघुनाथा—हे रामा, तव—तुझ्या. पदीं—चरणावर पायावर. माथा—डोकें. ठेऊनी. तव...ठेऊनी—तुझ्या पायावर डोकें ठेवूनी. तुझ्या पायाला नमस्कार करून, तुझ्या पायीं नम्र होऊन. आतां—ह्यासमयीं, या प्रसंगांतून. मज—मला. सोडवी—मुक्त कर.

शेवटच्या कडव्यांत कवीनें आपलें नांव ' रघुनाथ ' असें मोठ्या खुबीनें आणिलें आहे तें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

ह्या सर्व पदाचा स्वतंत्र रीतीनें कवि स्वतःच या संसाररूपी सागराला कंटाळून या भवचक्रांतून पार पाडण्याची परमेश्वरास प्रार्थना करीत आहेत अशा प्रकारचा अर्थाचाही बोध होतो.

दिंडी—**सखे माझे परतोनि घरा येतां।**
**तुवां सजणे हा समाचार घेतां॥**
**तया शोकें घायाळ हृदय होतां।**
**कशी होशिल तें आठवितों आतां॥**

( हे ) सजणे माझे सखे, घरां परतोन येतां तुवां हा समाचार घेतां तया शोकें हृदय घायाळ होतां ( तूं ) कशी होशिल तें ( मी ) आतां आठवितों.

सजणे—हे सुभग स्त्रिये. माझे सखे—माझे स्नेही ( प्र. वि. ए. व. ) येतां या धातुसाधिताचा कर्ता. घरां परतोनि येतां—ते स्नेही घरीं परत आल्यावर. हा... घेतां—( "मी धरला गेलों ह्यामुळें घरीं येऊं शकत नाहीं," ) अशी बातमी तुला समजल्यावर. तया—त्या. शोकें—ह्या बातमीनें उत्पन्न होणाऱ्या दुःखामुळें. घायाळ—जखमी. ( येथें ) दुःखित. आळ प्रत्यय लागून झालेलें विशेषण ( दाम. पान ५४४ )

दिंडी—**थोर होतिल बाळकें तुझीं बाळे।**
**तुला कामा येतील वेल्हाळे॥**
**माय माझी बैसेल शोकशाळे।**
**मला आठवितां हृदय तिचें पोळे॥**

( हे ) बाळे, ( हे ) वेल्हाळे, तुझीं बाळकें थोर होतील ( आणि ) तुला कामा येतील ( परंतु ) माझी माय शोकशाळे बैसेल ( आणि ) मला आठवितां तिचें हृदय पोळे.

बाळे—प्रिये, वेल्हाळे—प्रिये. तुझीं बाळकें—तुझीं मुलें थोर होतील—मोठीं होतील, जाणतीं होतील ( आणि मग ) तुला कामा येतील—तुझ्या उपयोगीं पडतील ( तुझें दुःख दूर करतील, पांग फेडतील, ही तुला आशा आहे; परंतु ) माझी माय-माझी आई. ( जिला माझ्याशिवाय दुसरा आधार नसून मी मेल्यावर तिला पुत्र नाहींसा झाल्यानें सर्वच आशा खुंटेल म्हणून निराश होऊन ) शोकशाळे बैसेल—दुःख करीत—रडत—बसेल. ( राजेलोकांच्या येथें पूर्वी वाड्यांत

एक स्वतंत्र जागा शोक करण्याकरितां मुकर केलेली असून तिला शोकशाळा असें नांव असे शोक करावयाच्या वेळीं त्या शाळेंत जाऊन वसण्याची वहिवाट पूर्वी असे त्यावरून शोकशाळेंत बसणें ह्मणजे दुःख करणें असा अर्थ प्रचारांत आला. ) शोक—दुःख, रुदन करण्याची शाळा ह्म. जागा ती तिच्यांत शोकशाळे. मला... पोळे—माझी आठवण करकरून तिचें हृदय ( अंतःकरण ) पोळेल.

मालिनी—**सदय हृदय याचें भूप हा तापहारी ।**
**ह्मणुनि परिसतां मी होय एथें विहारी ॥**
**मजहि वध कराया घातकी पातला जो ।**
**वरुनि पति असा ही भूमि कैसी न लाजो ॥ ४८ ॥**

हा भूप तापहारी ( आहे. ) याचें हृदय सदय ( आहे ) ह्मणुनि परिसतां मी एथें विहारी होय. जो घातकी मजहि वध कराया पातला असा पति वरुनि ही भूमि कैसी न लाजो ?

हा भूप—हा राजा ( नळ नांवाचा ). ताप—दुःख, संकट इत्यादि हरण करणारा तो तापहारी ( उपपदत. ) आहे. हृदय—अंतःकरण. दयेसहित जें तें सदय म्ह० करुणायुक्त ह्मणुनि परिसतां—असें ऐकून. मी एथें—ह्या उपवनांतील तळ्यांत. विहार ह्म० क्रीडा करणारा तो विहारी. होय—झालों. मी...होय—मी एथें येऊन जलक्रीडा करिता झालों. ( परंतु एथें मला विपरीत अनुभव आला असें सांगण्याच्या हेतूनें ) जो घातकी—घात ह्म० नाश, हत्या करणारा. मजहि मज सारख्या निरपराध्यासही वध कराया—मारण्यास. पातला—आला प्राप्त झाला, सिद्ध झाला, असा पति वरुनि—अशा नवऱ्याशीं लग्न लावून, असा स्वामी करून. ( राजाला भूमीचा नवरा म्हणण्याचा प्रघात आहे त्यास अनुसरून हें वर्णन ) ही भूमि—ही पृथ्वी. कैसी न लाजो.—लाज कशी न वाटावी ( अर्थात् भूमीला असा राजा मिळाला म्हणून लाज वाटावी हा भावार्थ. पतीच्या अपकीर्तीनें बायकोची मानहानी होते हें प्रसिद्धच आहे. )

घात+क+ई=घातकी ( पररूप संधि. व्या. पा. ५४९ )

व. ति.—**एणेंपरीं परिसतां अतिदीन वाचा ।**
**हेलावला नळ पयोधि दयारसाचा ॥**

**सोडी, ह्मणे विहर जा अथवा फिराया ।**
**राहे यथा-निज-मनोरथ हंस-राया ॥ ४९ ॥**

एणेंपरी अति दीनवाचा परिसतां दयारसाचा पयोधि ( असा ) नळ हेलावला, ( आणि ) हंसराया सोडी ( आणि ) ह्मणे विहर अथवा फिराया जा ( अथवा ) यथा-निज-मनोरथ राहे.

एणेंपरी-अशा प्रकारची ( वरील पद्यांत सांगितल्याप्रमाणें ) अति-फार, दीन-करुणा उत्पन्न होईल अशी. वाचा-भाषणें, बोलणें. परिसतां-ऐकून दया-हाच कोणी-एक रस ह्म० प्रवाही पदार्थ तो दयारस ( क. धा. ) त्याचा ( ष. त. ) पयोधि-समुद्र. ( ष. त. ) दयारसाचा पयोधि ह्म० दयेचा सागर. अंतःकरणांत ओतप्रोत दया असलेला. हेलावला-उचंबळला. जशा सागराला वाऱ्यानें लाटा येऊन सर्व समुद्र खळबळून जातो त्याप्रमाणें दया उत्पन्न झाल्यानें नळराजाचें अंतःकरण खळबळून आलें. गहिंवरून गेलें. ( इकडे दयेचा सागर असें म्हटलें ह्मणून सागराला साजेल असें हेलावला हें क्रियापद कवीनें योजिलें आहे ). हंसराया-धरलेल्या राजहंसाला. सोडी-सोडिता झाला, मुक्त केलें, सोडून दिलें. ह्मणे-ह्मणाला बोलला. विहर स्वेच्छ ( स्वतंत्रपणें ) विहार कर, किंवा फिराया जा-फिरायला जा, किंवा राहे-येथें या उपवनांत रहा. यथा ह्म० जसा-निज-ह्म० तुझा स्वतःचा-मनोरथ असेल तसें यथा-निज-मनोरथ. ( अव्ययीभाव समास ) क्रियाविशेषण विहर फिराया जा आणि राहे या तीन क्रियापदांचें. रूपक चरण २ विकल्प चरण ३।४.

मालिनी—**सुटुनि खग पळाला बैसला शालशाखे ।**
**क्षणभरि निज देहीं मुक्ति-विश्रांति चाखे ॥**
**स्वजन तंव तयाचे भोंवताले मिळाले ।**
**कवळिति निजबंधू बाष्पबिंदू गळाले ॥ ५० ॥**

खग सुटुनि पळाला, ( आणि ) शालशाखे बैसला. निजदेहीं क्षणभरी मुक्ति-विश्रांति चाखें. तंव तयाचे स्वजन ( तयाचे ) भोंवताले मिळाले ( आणि ) निज-बंधू कवळिति ( तेव्हां त्यांचे नेत्रांतून ) बाष्प-बिंदू गळाले.

खग-पक्षी. ख ह्म. आकाश त्या ठिकाणीं किंवा त्यांतून गमन करणारा तो खग- या पद्यांत राजहंस. सुटुनि-मुक्त होऊन, नळराजानें सोडून दिल्यावर.

पळाला–लांब उडून गेला. शाल म्ह. त्या नांवाचें झाड त्याची शाखा म्ह. खांदी ती शालशाखा तिजवर बैसला–उडून बसला. निज म्ह. स्वतःचा देह तो निजदेह त्याच्या ठिकाणीं निजदेहीं. क्षणभरि–थोडावेळ, निमिषमात्र. मुक्ति–विश्रांति मुक्तिपासून ( राजाच्या हातून सुटल्यामुळें ) अनुभवास येणारी विश्रांति ती (पं. त. ) तँव–तोंच. तयाचे–त्या राजहंसाचे. स्वजन–आप्तजन, इष्टमित्र, स्वतःचे जन ते स्वजन. भोंवताले–सभोंवती, त्यास घेरा घालून. मिळाले–गोळा झाले, जमले. निजबंधू–आपला प्रियकर स्नेही. कवाळिती–आलिंगन देती. आलिंगन देते झाले. बाष्पाचे म्ह. आसवांचे, बिंदू म्ह. थेंब ते बाष्पबिंदू. गळाले–स्रवले. टपटप पडले.

शिख.—**विसावा घे कांहीं उडुनि लवलाहीं परतला ।**
**नृपाळाच्या स्कंधीं बसुनि मणिबंधीं उतरला ॥**
**म्हणे हंस क्षोणीपतिस तुज कोणी सम नसे ।**
**दयेचा हा ठेवा तुजजवळिं देवा वसतसे॥ ५१ ॥**

हंस कांहीं विसावा घे, लवलाहीं उडुनि परतला, नृपाळाच्या स्कंधीं बसुनि मणिबंधीं उतरला, क्षोणीपतिस म्हणे " देवा, तुज सम कोणी नसे, ( कारण ) हा दयेचा ठेवा तुज जवळिं वसतसे.

कांहीं–थोडासा, किंचितसा. विसावा–विश्रांति. घे–घेता झाला. लवलाहीं–लौकरच; थोड्याच वेळांत. परतला–परत आला. नृपाळाच्या–नळराजाच्या; स्कंधीं–खांद्यावर; मणिबंधीं–मनगटावर; उतरला–खालीं आला; खालीं येऊन बसला. क्षोणीपतिस–नळ राजाला क्षोणी म्ह० पृथ्वी तिचा पति म्ह० स्वामी नवरा तो त्यास ( ष. त. ) म्हणे–बोलला, वदला. देवा–हे राजा. हे स्वामी. तुजसम–तुझ्यासारखा. दयेचा-कारुण्याचा; ठेवा–संग्रह, सांठा, खजीना; दयेचा... तसे–तूं अत्यंत दयाळू आहेस.

अलंकार–अनुप्रासचरण १।२।३।४.

दिंडी—**ऐक राया तूं थोर दयासिंधू ।**
**नीतिसागरही तूंच दीनबंधू ॥**

**निखंदूनी बोलिलों नको निंदू ।**
**सकल वदसी तरि पाय तुझे वंदू ॥ ५२ ॥**

राया, ऐक, तूं थोर, दयासिंधू ( आहेस ) नीतिसागरही ( आहेस ) तूंच दीनबंधू ( आहेस ) ( तुला मी ) निखंदूनी बोलिलों ( परंतु ) निंदू नकोस ( तूं ) वदसी तरी ( आह्मी ) सकल तुझे पाय वंदू.

राया—हे राजा, थोर—मोठा, उदार, दयेचा सिंधू ह्म० सागर तो दयासिंधू, नीतिचा सागर तो नीतिसागर. ही—देखील. दीनांचा बंधू तो दीनबंधू, निखंदूनी—झिटकारून, टाकून, वदसी...वंदू—तूं ह्मणशील तर आह्मी सगळे जण तुझ्या पायां पडून तुझी क्षमा मागूं.

रूपक—चरण १।२

दिंडी—**पारधीमाजी खगा मृगा राजे ।**
**करिति हिंसा जी तीच बरी साजे ॥**
**तुवां दिधली मज मोकळीक बा जे ।**
**दया केली हे कीर्ति तुझी गाजे ॥ ५३ ॥**

राजे पारधीमाजी जी खगा मृगा हिंसा करिती तीच बरी साजे. बा, तुवां मज जे मोकळिक दिधली हे दया केली ( अशी ) तुझी कीर्ति गाजे.

राजे—राजे लोक; पारधीमाजी—शिकारींत. राजे...करिती—राजे लोक शिकारींत पाखरांना व पशूंना मारतात तेंच त्यांना योग्य होय. शिकारीशिवाय इतर वेळीं पांखरांना मारणें योग्य नाहीं; असा भावार्थ. खगा—पांखरांची; मृगा—पशूंची. हिंसा—हत्या. बरी—चांगली, योग्य; साजे—शोभते. बा—अरे. तुवां—तूं, त्वां; मज...दिली—मला मुक्त केलेंस, सोडलेंस. हे—ही. गाजे—गाजत आहे. अशी तुझी कीर्ति लोक वर्णन करतात.

दिंडी—**हंस मिळणें हें कठिण महीलोकीं ।**
**सोनियाचा तो नवल हें विलोकी ॥**
**तशा मजलाही सोडिलें तुवां कीं ।**
**तुझा ऐसा उपकार मी न झांकी ॥ ५४ ॥**

महीलोकीं हंस मिळणें हें कठिण ( आहे ). ( त्यांतही ) तो सोनियाचा ( असावा ) हें नवल. विलोकी. तशा मजलाही तुवां सोडिलें कीं. ऐसा तुझा उपकार मी न झांकी.

महीलोकी–या मृत्युलोकीं. या पृथ्वीवर. हंस मिळणें–हंस सांपडणें हें कठिण–दुर्मिळ. सोनियाचा–सोन्याचा, सुवर्णाचा ( सोनि. हें कवितेंतील रूप आहे ). विलोकी–पहा. तशा–सोन्याच्या तशा मजला–मी हंस असून तो सोन्याचाही असतां. सोडिलें–मुक्त केलें. ऐसा...झांकी–हा तुझा उपकार मी गुप्त ठेवणार नाहीं, तर प्रकट करीन आणि सदोदित त्याची अंतःकरणांत आठवण ठेवीन.

अनुगुण अलंकार चरण १।२

विभावना अलंकार चरण ३.

दिंडी—**तुझा करपंजर होय मला थारा ।**
**तुझ्या वचनांचा ओघ दुग्धधारा ॥**
**तुझें मानस बहु थोर गा उदारा ।**
**सत्य लोकेशाहि तूंचि गुणागारा ॥ ५५ ॥**

तुझा करपंजर मला थारा होय. तुझ्या वचनांचा ओघ ( मला ) दुग्धधारा ( होय ). गा उदारा, ( हे ) गुणागारा, तुझें मानस बहु थोर आहे ( आहे ); ( आणि ) लोकेशाहि तूंचि ( आहेस, हें ) सत्य.

करपंजर–कर ह्म. हात हाच कोणीएक पंजर ह्म. पिंजरा ( लक्षणानें ) पक्ष्यांचें रहाण्याचें ठिकाण तो करपंजर. थारा–आश्रयस्थान. तुझा हात हें मला आश्रयाचें ठिकाण आहे. वचनांचा ओघ–भाषणाचा प्रवाह, अस्खलित भाषण. दुग्धधारा–दुग्धाच्या ह्म० दुधाच्या धारा त्या दुग्ध धारा. तु...धारा–तुझें अस्खलित भाषण दुधाच्या धारांप्रमाणें मला अत्यंत प्रिय आहे. हंसाना दूध आवडतें हें प्रसिद्धच आहे. अगा उदारा–हे महाभाग, हे थोर मनाच्या. गुणागारा.–गुणांचे आहे आगर ह्म. घर, रहाण्याचें ठिकाण जो तो गुणागार ( ष. त. ) त्याचें संबोधन गुणागारा–हे गुणवान् राजा. मानस–मन. पक्षीं मानस नांवाचें हिमालयावरील सरोवर ( हें स्थान हंसाचें आवडतें वसतिस्थान आहे अशी प्रसिद्धी आहे. ) लोकेश–लोकांचा ईश ह्म. स्वामी तो लोकेश ह्म. राजा. पक्षीं सत्यलोकेश ह्म०

ब्रह्मदेव. सत्यलोक हें ब्रह्मदेवाच्या रहाण्याचें स्थान. हे राजा, तुझ्या ठिकाणीं हंसांना प्रिय अशा सर्व गोष्टी आहेत. तुझीं भाषणें दुधाप्रमाणें आहेत, व अंतःकरण मानससरोवराप्रमाणें आहे आणि तूं स्वतः हंसाचा स्वामी ब्रह्मदेव आहेस असा भावार्थ.

रूपक चरण १।२

श्लेषालंकार चरण ३।४

दिंडी--**किती रावे असतील तुझे धामीं ।**
**किती कोकीळा सारिका तसा मी ॥**
**चित्त जडलें हें तूझिया लगामी ।**
**नृपा स्वामी मज योजिं तुझ्या कामीं ॥ ५६ ॥**

तुझे धामीं किती रावे किती कोकीळा सारिका असतील तसा मी ( असेन. कारण कीं ) तूझिया लगामी हें चित्त जडलें. ( हे ) नृपा ( हे ) स्वामी, तुझ्या कामी मज योजिं.

धामीं—धाम ह्म० घर, (सप्तमी). घरांत. रावे–राघू. सारिका—मैना. तसा–त्याप्रमाणें. तूझिया लगामीं...जडलें—जसा घोड्याला लगाम घातल्यावर तो लगाम धरणाराच्या इच्छेनुरूप वर्तण्यास तयार असतो त्याप्रमाणें हें माझें चित्त-ही तुझ्या इच्छेनुरूप वर्तण्यास तयार झालें आहे. योजिं—लाव. मज...... कामीं—मला आपलें कांहीं काम सांग.

व. ति.--**हें पांखरूं मजासि येइल काय कामा ।**
**ऐसें नृपा न वद पूरित–लोक–कामा ॥**
**मोलें उणें व्यजन तें धरितां पुढारीं ।**
**छाया करी तपनदीप्तिसही निवारी ॥ ५७ ॥**

( हे ) पूरित–लोक–कामा नृपा, हें पांखरूं मजासि काय कामा येइल ऐसें न वद. ( कारण कीं ) ( जें ) व्यजन मोलें उणें ( आहे ) तें पुढारीं धरितां छाया करी ( आणि ) तपनदीप्तिस ही निवारी.

पूरित-लोक-कामा--पूरित ह्म० पूर्ण केले आहेत लोकांचे ह्म० जनाचे काम ह्म० इच्छा ज्यानें तो पूरित–लोक–काम त्याचे संबोधन ( बहुव्री. स. ). हें

पाखरूं--श्लो० ४२ वरील टीप पहा. मजासि...येइल--माझें काय काम करील ? ऐसें न वद--असें म्हणू नकोस. भावार्थ—मी यःकश्चित लहानसें पांखरूं आणि तूं थोर राजा आहेस तेव्हां तुझ्या सारख्या थोर मनुष्याच्या उपयोगीं माझ्या सारखें लहानसें पांखरूं काय पडणार आहे असें समजून माझी अवहेलना करूं नकोस. मीहीं तुझ्या उपयोगीं पडूं शकेन. ह्याच अर्थ दृष्टांतानें राजहंस राजास पुढील दोन ओळींत सांगत आहे.

व्यजन—पंखा, परंतु येथें छत्री अबदागिरी या अर्थी कवीनें योजिला असल्याचें दिसतें.

मोलें--किमतीनें. उणें--कमी. पुढारीं धरितां—पुढें धरलें असता. तपन-दीप्तिस—तपनाची ह्म० सूर्याची दीप्ति ह्म० प्रकाश, कांति, तेज. ती तपनदीप्ति तिला तपनदीप्तिस ( ष. त. ) अबदागिरी किंवा छत्री अत्यंत कमी किंमतीची असते परंतु ती राजाच्या डोक्यावर धरली तर छाया होते आणि ऊन लागत नाहीं. ह्या प्रमाणें लहान पदार्थहि थोर माणसाच्या प्रसंगीं उपयोगी पडतात.

अलंकार-परिकर चरण १।२

-दृष्टांत चरण ३।४

मालिनी—**वीरनृपति विराजे भीम हें नाम ज्याला ।**
**वर दमन ऋषीनें दीधला कीं तयाला ॥**
**वरसुत दम-नामा दांतनामा द्वितीय ।**
**वरतनु दमयंती नंदिनी हे तृतीय ॥ ५८ ॥**

ज्याला भीम हें नाम ( आहे, असा ) वरनृपति विराजे. तयाला दमन ऋषीनें वर दिधला कीं. वरसुत दम-नामा, द्वितीय दांत नामा ( आणि ) वरतनु दमयंती हे तृतीय नंदिनी ( होय ).

वरनृपति-वर ह्म० श्रेष्ट असा नृचा ह्म० नराचा मनुष्यांचा पति ह्म० स्वामी तो वरनृपति-श्रेष्ठ राजा ( क. ). विराजे-आहे. कीं-केवलप्रयोगी अवयव. याचा वाक्यांत उपयोग करण्याचा प्रघात जसें-मी देतों कीं. याच्या योगानें कधिं कधिं किंचित् आश्चर्य दाखविलें जातें, परंतु बहुतेक पादपूरणार्थंच उपयोग केला जातो. वर-देणगी, प्रसाद. वर-सुतवर ह्म० ज्येष्ठ असा सुत ह्म० मुलगा तो

वरसुत ( कर्मधारय. ) दमनामा—दम आहे नाम ज्याचें तो दमनामा (बहुव्रीहि.) दांतनामा—दांत आहे नाम ज्याचें तो दांतनामा ( सदर ). वरतनु—वर ह्म० श्रेष्ठ आहे तनु ह्म० शरीर जीचें ती वरतनु (सदर) तृतीय–तिसरी. नंदिनी–मुलगी.

व. ति.—तेजोनिधीस तनया यमुना जशी ते ।
सीता जशी सुजनका जनका तशी ते ॥
ते आवडे सुतहि ते न तसे तयाला ।
ते नोवरी करवितों तुज मी दयाला ॥ ५९ ॥

जशी तेजोनिधीस ते यमुना तनया (आहे, किंवा) जसी सुजनका सीता तशी जनका ते ( आहे ). तयाला ( जसी ) ते आवडे तसे ते सुतहि न ( आवडती ). दयाला मी ते तुज नोवरी करवितों.

तेजोनिधीस—तेजाचा ह्म० प्रकाशाचा निधी ह्म० सांठा तो तेजोनिधी त्यास ( षष्ठीतत्पु. ) सूर्याला. तनया–मुलगी सुजनका–सु ह्म० चांगला ( सज्जन ) असा जो जनक ह्म० जनक नांवाचा राजा तो त्यास. ( कर्मधारय. स. ) जनका–बापास. ते–दमयंती. सुतहि–मुलगे देखिल. जशी सूर्याची कन्या यमुना व जनकाची सीता तशी भीमराजाची दमयंती फार रूपवान् म्हणून प्रसिद्ध आहे.

अलंकार—उपमा चरण १।२.

व. ति.—राया तिचे मुख सुधाकर या द्वयाला ।
नाहींच वेगळिक हें गमतें मनाला ॥
संपूर्ण नित्य असता नसता कलंकी ।
हा चंद्र हें मुख असें मग कोण शंकी ॥ ६० ॥

राया, तिचें मुख, ( आणि ) सुधाकर या द्वयाला वेगळिक नाहींच हें मनाला गमतें. ( तो चंद्र जर ) नित्य संपूर्ण असता ( आणि ) कलंकी नसता ( तर ) हा चंद्र ( व ) हें मुख असें मग कोण शंकी ?

राया—राजा, ( संबोधन ). सुधाकर—सुधा ह्म० अमृत आहे कराच्या ठायीं ह्म० किरणांत ज्याच्या तो सुधाकर. ( चंद्राच्या किरणांत अमृत असतें असें वर्णन पुराणांतरीं आहे ). या द्वयाला—या दोघांत, या जोडींत. वेगळिक–भिन्नता

च–निश्चयार्थ दाखवितो. हें–असें. गमतें–वाटतें. राया...गमतें. दमयंतीचें तोंड व चंद्र या दोघांत भिन्नता नाहीं हा निश्चय समजा.

इतकेंच नाहीं तर चंद्रापेक्षांही तोंड जास्त चांगलें आहे असें दाखविण्याच्या हेतूनें कवि ह्मणतात.

नित्य–रोज, दररोज, संपूर्ण–षोडश कलांनीं युक्त, पूरा. कलंकी नसता–( चंद्राला ) कलंक नसता. कलंक–चंद्राला जे काळे डाग दिसतात त्याला कलंक ह्मणतात. हा चंद्र व हें मुख असें बोटानें दाखवितां येईल इतकी भिन्नतेची शंका कोण घेईल ? कोणी नाहीं. चंद्र सदोदित पूर्ण व कलंकरहितअसता तर त्याच्यांत व दमयंतीच्या मुखांत कोणास कधींच भिन्नता वाटली नसती. पण कधीं तो कलंकित व कधीं कधीं अपूर्ण असल्यानें दमयंतीच्या मुखापेक्षां कमी सुंदर दिसतो व दोघतली भिन्नता दिसून येते.

रूपक––चरण १।२ संभावना––चरण ३।४ व्यतिरेक––चरण ३।४

व. ति.—**चांफेकळी परिसही सरलत्व नाकीं ।**
**जीचा धरी अधर विद्रुमभावना कीं ॥**
**भासे मनांत मज बिंबफळ भ्रमानें ॥**
**कीं सत्य चंचुपुट वोढविलें शुकानें ॥ ६१ ॥**

( जीच्या ) नाकीं चांफेकळीपरिसही ( जास्त ) सरळत्व ( आहे. ) जीचा अधर विद्रुमभावना धरी कीं. मज मनांत भासे कीं शुकानें बिंबफळभ्रमानें चंचुपुट वोढविलें ( हेंच ) सत्य.

नाकीं–नाकाच्या ठायीं. चांफेकळीपरीसही–चांफ्याच्या कळीपेक्षां देखील. सरलत्व–सरलपणा. नाकीं...सरलत्व—जिचें नाक चांफेकळीपेक्षांही जास्त सरळ आहे. अधर–खालचा ओंठ. विद्रुमभावना–विद्रुम–पोंवळें. भावना–भाव. विद्रुमाची भावना तीं ( षष्ठी तत्पु. ) शुकानें–पोपटानें. राघूनें. बिंबफळभ्रमानें–बिंबफळ ह्मणजे तोंडलें– त्याचा भ्रम ह्म० संदेह. संशय. तो त्यामुळें ( षष्ठी तत्पु. ) चंचुपुट–चोंच. सत्य–खरोखरींच. वोढविलें–पुढें केलें. नाक हें राघूच्या चोंचीप्रमाणें व खालचा ओंठ तोंडल्याप्रमाणें लाल असल्यानें, राघूनें तोंडल्याच्या भ्रमानें चोंच ओठापुढें केली आहे कीं काय असा भास होतो.

व्यतिरेक—चरण १. उपमा—चरण २. संदेह—चरण ३।४.

**पद—रूपवती ते भूपसुता अनुरूप नसे दुसरी वनिता**
**हूप धरूनि वरीं तिजला अनुरूप पयोधि जशी सरिता ॥ ध्रु० ॥**
**वीज अचंचळ शीतळ जे तजवीज कसी तुज हे नुमजे**
**नीज जशी तुझिया नयना सुखबीज सपल्लव भाव लता ॥१॥**
**सुंदरता तव तीजविणें अति मंद गमे तरि काय जिणें**
**कुंदरदा तर मंदर-धीरा सुंदरिला हो वश करिता ॥ २ ॥**
**नूतन-नीरज-नूत-मुखी पुरुहूत-वधूसि सखी निरखी**
**दूत तुझा परि मीच सुखी करवीन ह्मणे 'रघुनाथ-नुता'॥३॥**

ते रूपवती भूपसुता ( जशी तुजला ) अनुरूप ( आहे तशी ) दुसरी वनिता नसे. म्हणून अनुरूप ( अशा ) तिजला हूप धरूनि वरीं जसी पयोधि ( अनुरूप ) सरिता ( वरी ).

रूप आहे जिला ती रूपवती. रूप ह्म० सौंदर्य. भूपाची ह्म० राजाची. सुता ह्म० कन्या, मुलगी, ती भूपसुता ( षष्ठीतत्पु. ). अनुरूप—रूपाला अनुसरून ती अनुरूप ह्म. योग्य. ( तुझ्या सौंदर्यास साजेल अशी ). हूप धरून-उत्साह धरून हूप ह्म० उत्साह.

वीज अचंचळ.........लता ॥ १ ॥

जे वीज ( ते ही तिजपुढें ) अचंचल ( आणि ) शीतल ( आहे ) हे तजवीज तुज कशी नुमजे ? जशी नीज सुखबीज ( असते किंवा ) सपल्लव लता ( सुख-बीज असते ) ( तशी ही ) तुझिया नयना ( सुखबीज ) भाव.

अचंचल—चंचल नाहीं ती मंद. शीतल—मंद. मंदत्वाचा प्रकर्ष आधिक्य दाखविण्याकरितां द्विरुक्ति. नुमजे—समजत नाहीं. नीज—झोंप ( नाम. ) सुखबीज—सुखाचें बीज ह्म० मूळ निदान तें ( षष्ठीतत्पु. ). सपल्लव—पल्लवा सहित ह्म० पानासहित ती ( तृतीया तत्पु. स ). भाव—मान ( भावणें ह्म० मानणें या धातूचें आज्ञार्थी एकवचनीरूप त्याचें कर्म 'हें' अध्याहृत ). ती विद्युल्लतेहून चपल व सुंदर असल्यानें तुझ्या नेत्रांना कोंवळ्या वेलीप्रमाणें सुखदायक होईल.

सुंदरता तव........ वशकरिता ॥ २ ॥

( हे ) मंदर-धीरा, तीज विणें तव सुंदरता ( जरि ) अति मंद गमे तरि जिणें काय ? तर ( त्या ) कुंदरदा सुंदरिला वश करिताहो.

मंदरधीरा—मंदराच्या धीराप्रमाणें आहे धीर ह्म० धैर्य ज्याचा तो त्याचें संबोधन. ( बहुव्री० ) किंवा मंदराप्रमाणें ( मंदरपर्वताप्रमाणें ) आहे जो धीर ह्म. स्थिर तो त्याचें संबोधन ( कर्मधारय. ) तीजविणें-तिच्यावांचून दमयंती वांचून-तव सुंदरता-तुझें स्वरूप, तुझें सौन्दर्य. अति मंद—अगदि फिकें. गमे—वाटतें, भासतें. तरि जिणें काय ? तर मग जीवंत राहण्यांत अर्थ कोणता ? तर—म्हणून, याकरितां. कुंदरदा—कुंदाप्रमाणें ( कुंद नांवाच्या पुष्पाप्रमाणें ) आहेत रद ह्म. दांत जिचे ती. वश करिता हो—ह्म. मन वळविता हो, ( सुंदरीचें ) मन तुला अनुकूल होईल असें कर.

नूतन-नीरज-नूत-मुखी...रघुनाथनुता ॥ ३ ॥

( ती ) नूतन-नीरज-नूत-मुखी पुरुहूतवधूसि सखी ( आहे असें ) निरखी. परि, हे रघुनाथ-नुता मीच तुझा दूत ( होऊन तुला ) सुखी करवीन ( असें ) ह्मणे.

नूतन-नीरज-नूत-मुखी—नूतन ह्म. नवीन अशा नीरजानें ह्म. कमलानें. नूत ह्म. स्तविलेलें आहे मुख ह्म. तोंड जीचे ती ( बहुव्री. ) ह्म. नवीन कमलाहून सुंदर मुखाची. पुरुहूत-वधूसि-पुरुहूत ह्म. इंद्र त्याची वधू ह्म. वायको ती तिशी. सखी-मैत्रीण. ( येथें सखी हा शब्द साम्यता दाखविणारा आहे म्हणून पुरु...सखी याचा अर्थ इंद्राणीसारखी अत्यंत सुंदर असा होतो. ) निरखी-पहा. समज. ( निरखणें या धातूचें आज्ञार्थी एकवचनी रूप ). परि-परंतु, असें जरी आहे तरी. रघुनाथनुता-रघुनाथकवीनें नुत ह्म. स्तविलेला, वर्णन केलेला, गाइलेला तो नळराजा त्याचें संबोधन.

व. ति.—**धाता करींच करिता मृदु हे न होती ।**
**या कारणास्तव मनोमय मूस ओती ॥**
**तेथें भरोनि पहिला रस पूर्ण केली ।**
**ओतींव हे न घटिताकृति बोलिजेली ॥ ६३ ॥**

धाता करींच करिता ( तरि ) हे मृदु न होती या कारणास्तव मनोमय मूस

ओती ( मग ) तेथें पहिला रस भरून ( ती ) पूर्ण केली. हें ओतीव बोलिजेलि घटिताकृति न.

धाता–ब्रह्मदेव. करींच–करानेंच हातानेंच. करिता–केली असती ( कर धातूचे संशयार्थी तृतीय पुरुषी एकवचनीरूप ). हे–दमयंती. मृदु—मऊ, लुसलसित. याकारणास्त–ह्मणून. मनोमय–मनाची बनविलेली मूस–कोणत्याही धातूचा रस करण्याकरितां एका विशेष प्रकारच्या मातीचें वाटीच्या आकाराचें पात्र करितात ती. या ठिकाणी 'सांचा' या अर्थी उपयोग केला आहे. मन हें कल्पनामय असल्यानें पाहिजे तेवढें मृदु होऊं शकतें पण हात त्या मानानें फार कठिण म्हणून हातानें न बनवितां मनाच्या मुसींत ढाळून दमयंती ब्रम्हदेवानें तयार केली. तेथें–त्या मुसींत. साच्यांत. पहिला रस—शृंगार रस. तेथें... केली—त्या मुशींत शृंगार कमी होता तो निराळा घालून धात्यानें दमयंती ओतून बनविली. ह्मणून ती ओतीव पुतळी ह्मणावी. घडलेली आकृती नाही. एरवीं तिच्यांत इतका लुसलुशितपणा आला नसता. बोलिजेली—कर्मणी तृतीय पुरुषी एकवचनीरूप. कर्ता हे. ( दामल्याचे शा. व्या. ). घटिताकृति—घटित ह्म० घडलेली अशी आकृती आहे जीची ती. ( ब्र. वी. )

अपन्हुति अलंकार अभिज्ञान शाकुंतलांतील 'रूपोच्चयेन विधिना मनसा कृतानु' ह्यां चरणांत हीच कल्पना आहे तो पहावा.

व. ति०—**ऐसीं खगेंद्र वचनें वदतां तयाला ॥**
**विश्रांतिही विरहखेदहि फार झाला ॥**
**आधार हा मज ह्मणोनि गणोनि डोले ॥**
**झाला सवेंचि विरही नळराज बोले ॥ ६४ ॥**

खगेंद्र तयाला ऐसीं वचनें वदतां ( तयाला ) विश्रांति ही विरहखेदही फार झाला ह्मणोनि हा मज आधार ( आहे असें ) गणोनि सवेंचि विरही झाला नळराज डोले ( आणि ) बोले.

खगेंद्र–खगाचा किंवा खगांत ह्म० पक्ष्यांचा किंवा पक्ष्यांत इंद्र ह्म० श्रेष्ठ किंवा अधिपति तो ( षष्ठी किंवा सप्तमी तत्पु. स. ) पक्षिश्रेष्ठ राजहंस. ऐसीं–ह्याप्रमाणें, वर वर्णन केल्याप्रमाणें. वचनें वदतां–भाषण केलें असतां. विरहखेद

—विरहाचा खेद तो ( खेद—दुःख ). ह्मणोनि—या कारणास्तव, यासाठीं. हा—राजहंस. आधार—पाठिंबा देणारा. मदत करणारा, साह्यकर्ता. गणोनि—मानून. सवेंचि—लागलींच, तात्काळ, तत्क्षणीं. झाला—भूतभूतकालवाचक धातुसाधित विशेषण, झालेला. डोले—मान तुकावी, तुझें बोलणें मला मानवलें असें मान हलवून सुचवी.

व. ति.—**वेल्हाळ ते न दिसतां विरहांधकारीं ।**
**चालून मी हळुंच चांचपतां पुढारीं ॥**
**चक्रापरीच सजलों असतां फिराया ।**
**हंसा तुझा उदय होय सुखी कराया ॥ ६५ ॥**

( हे ) हंसा, ते वेल्हाळ विरहांधकारीं न दिसतां चक्रापरीच मी पुढारीं चालून हळुंच चांचपतां ( आणि ) फिराया सजलों असतां ( मला ) सुखी कराया तुझा उदय होय.

ते वेल्हाळ—ती सुंदरी. विरह हाच कोणीं अंधकार त्यांत विरहांधकारी ( क. ) चक्रापरी—चक्रवाक नांवाच्या पक्षाप्रमाणें. चांचपता—अडखळत अनुमानानें शोधीत असतां, धुंडीत असतां. तुझा उदय होय—तूं दृश्य झाला, तूं दिसलास. तूं प्राप्त झालास, तूं आलास. ( उदय होणे—ठळक रितीनें दिसणें ). प्रहर्षण अलंकार—येथें दमयंतीच्या विरहाचें दुःख कसें घालवावें या उपायाचे शोधांत नळराजा असतां त्यास साह्य करण्या कारितांराजहंसाचा उदय झाल्याचें वर्णन आहे म्हणून प्रहर्षणालंकार झाला.

चक्रवाक पक्षी ज्याप्रमाणें रात्रीच्या अंधारांत आपल्या स्त्रीस शोधितो त्या प्रमाणें मी दमयंतीस धुंडतों आहे. येथें अंधार असणें अवश्य असल्यानें विरहांधकारीं या पदानें ती उणीव भरून काढिली. सूर्योदय झाल्यावर चक्रवाक-पक्ष्याला आपल्या स्त्रीची प्राप्ती होते त्याप्रमाणें येथें तुझा उदय झाला आहे तेव्हां आतां मलाही दमयंतीची प्राप्ती खास होणार असें कवीनें सुचविलें आहे.

व. ति.—**ध्यानीं धरूनि तिजला मन हें निरीक्षी ।**
**दृष्टीपुढें दिसतसे मज ते मृगाक्षी ॥**

**आहे जणों जवळि हे गज-राज-गामी ।**
**ऐसाच भाव तंव बोलतसें तिला मी ॥ ६६ ॥**

( जँव ) हें मन तिजला ध्यानीं धरून निरीक्षी तँव ते मृगाक्षी मज दृष्टीपुढें दिसतसे, जणों हे गजराज–गामी जवळि आहे ( आणि ) मी तिला बोलतसें. ऐसाच भाव ( असे किंवा आहे. )

हें मन–माझें अंतःकरण. निरीक्षी–निरखून पहातें. मृगाक्षी–मृगाच्या आक्षि डोळे त्याप्रमाणें आहेत अक्षि जिचे ती ( बहुव्री. ) गजराजगामी–गजाचा राजा तो त्याप्रमाणें गामी ह्म. जाणारी ती. ( उपप. ) भाव—तात्पर्य.

व. ति.—**भृंगें विराजित नवीं अरविंद-पत्रें ।**
**पाहूनि मानुनि तिचींच विशालनेत्रें ॥**
**घालीन अंजन अशा मतिनें तटाकीं ।**
**आहा वृथा उतरलों भिजलों विलोकीं ॥ ६७ ॥**

आहा ! ! भृंगें विराजित ( अशीं ) नवीं अरविंदपत्रें पाहून ( त्यांस ) तिचींच विशालनेत्रें मानूनि अंजन घालीन अशा मतीनें तटाकीं उतरलों ( आणि ) वृथा भिजलों हंसा ( हें ) विलोकीं.

भृंगें–भ्रमर. विराजत–विराजमान झाले आहेत–बसले आहेत त्यावर असीं. अरविंदपत्रें–अरविंदाची कमलांची पत्रें पानें तीं अरविंदपत्रें ( षष्ठी तत्पु. स ). विशालनेत्रें–विशाल अशीं नेत्रें डोळे तीं विशालनेत्रें ( कर्मधारय. ) मानुनि–समजून. अंजन–काजळ. अशा मतिनें–अशी इच्छा धरून, असें मनांत आणून. तटाकीं–सरोवरांत. वृथा–फुकट. विलोकी–पहा भ्रांतिमान् अलंकार–येथें अरविंदपत्रें पाहून दमयंतीच्या नेत्रांचीं भ्रांति झाल्याचें वर्णिलें ह्मणून भ्रांतिमान् अलंकार झाला.

व. ति.—**हंसा विलोकुन सुधाकर अष्टमीचा ।**
**म्यां मानिला निटिल देश तिचाच साचा ॥**
**शंखद्वयीं धरुनि कौंकुम कीर–वाणी ।**
**लावावया तिलक लांबविला स्वपाणी ॥ ६८ ॥**

हंसा, अष्टमीचा सुधाकर विलोकुनि म्यां तिचा निटिलदेशच साचा मानिला,

( आणि ) शंखद्वयीं धरून कौंकुम तिलक लावावया स्वपाणी कीर-वाणी लांबविला.

सुधाकर—सुधा ह्म० अमृत आहे कराचे ठायीं किंवा करांत ह्म० किरणांत ज्याच्या तो चंद्र ( बहु व्री. ). निटिल ह्म० कपाळ हाच देश ह्म० प्रांत, भाग. ( क. ) साचा—खरोखर. ( क्रियाविशेषण. ) शंखद्वयी—कपाळाच्या दोन्ही हाडांस शंख असें ह्मणतात ह्म० कपाळाचीं कानसीलाजवळील दोनी हाडें. कौंकुम—कुंकुमाचें ह्म० कुंकवाचें तें कौंकुम ( गुणवाचक विशेषण ) तिलक—टिका, टिकली. लावावया—लावण्याकरितां, स्वपाणी—स्वतःचा पाणी, हात. लांबविला—लांब केला.

अलंकार भ्रांतिमान-चरण ३।४ प्रतीप—चरण १।२

दिंडी—**असें बोलोनी नळें रंजवीला ।**
**अंजुळी माजी हंस बैसवीला ॥**
**गमे चंपककुसुमौघहारझेला ।**
**पाठवाया युवतीस सिद्ध केला ॥ ६९ ॥**

असें बोलोनी नळें हंस रंजविला ( आणि ) अंजुळी माजी बैसवीला. ( तें पाहून असें ) गमे ( कीं ) ( नळानें ) ( हा ) युवतीस पाठवाया चंपककुसुमौघ-हारझेला सिद्ध केला.

रंजवीला—आनंदवीला; संतोषित केला; अंजुळी—( स. अंजलीचा अपभ्रंश ). ओंजळ. माजी—सप्तमी विभक्तीकरितां येणारें शब्दयोगी अव्यय. चंपककुसुमौघहार झेला—चंपकाचीं कुसुमें फुलें त्यांचा ओघ प्रवाह ( लक्षणानें प्राचुर्य ) त्या चंपककुसुमौघाचा हार हाच कोणी झेला तो ( क. ) हंस सोन्याप्रमाणें पिंवळा असल्यानें त्याच्यावर सोनचाफ्याच्या हाराचें रूपक केलें आहे सिद्ध केला—तयार केला. रूपकालंकार—येथें हंस व चंपककुसुमौघ-हारझेला यांचा अभेद मानला आहे सबब रूपकालंकार झाला.

दिंडी—**भला माझा तूं हंस गडी राया ॥**
**विरह-दुस्तर-विस्तार निस्तराया ॥**

**चित्त नेघे मज तूज जा म्हणाया ॥**
**तेंचि वाहन तरि तूं करी फिराया ॥ ७० ॥**

राया, तूं माझा विरहदुस्तर–विस्तार निस्तराया भला हंसगडी ( आहेस ) ( यास्तव ) तूज जा म्हणाया चित्त मज नेघे. तरि तूं फिराया तेंचि वाहन करी.

राया—राजहंसा ( ' राजा ' या संस्कृत शब्दाचा मराठी अपभ्रंश. 'य'च्या स्थानीं 'ज' व 'ज'च्या स्थानीं 'य' यावयाचा या नियमास अनुसरून ). विरह-दुस्तर–विस्तार—विरहाचा ह्म० वियोगाचा, दुस्तर असा ह्म० दुःखानें तरण्यास शक्य असा विस्तार तो. निस्तराया—दूर करण्यास, निवारण करण्यास, चित्त......नेघे—मनांत येत नाहीं. माझें मन मला सांगत नाहीं. फिराया—परत येण्यास. तेंचि—तेंच चित्त, मन. तूं...करी—तूं मनाचा घोडा करू त्यावर बसून ये. ( मनाची गति वाऱ्यापेक्षांही जास्त आहे. म्हणून त्यालाच घोड केलास म्हणजे लौकर येशील असा भावार्थ. )

दिंडी—**त्वरित पुनरागम असो तुझा एथें ॥**
**झेंप घाली सुखरूप गगनपंथें ॥**
**नको विसरूं आम्हासि असे एथें ॥**
**वदुनि धरिजे गहिंवरा महीनाथें ॥ ७१ ॥**

एथें तुझा पुनरागम त्वरित असो. गगनपंथें झेंप सुखरूप घाली. एथें आम्हांसि विसरूं नको. असें महीनाथें वदुनि गहिंवरा धरिजे.

एथें—या ठिकाणीं. पुनरागम—परत येणें. पुनः ह्म० फिरून, आगम ह्म० येणें गगनपंथें–आकाशमार्गानें. गगन आकाश हाच पंथ मार्ग, रस्ता तो ( क. त्यानें. झेंप–पक्ष्यांची उडी. सुखरूप–खुशाल, कोणतेंही संकट न येतां. महीनाथें-महीचा पृथ्वीचा नाथ स्वामी ( ष. त. ) त्यानें–राजानें. ( नळानें ) गहिंवर धरिजे–गहिंवर धरिला. ( राजा सद्गदित झाला ) राजाचा कंठ भरून आला आशीरलंकार—असो, घाली, विसरूं नको इत्यादि क्रिया आशीर्वादात्मक आहेत म्हणून आशीरलंकार झाला.

दिंडी—**बरें, येतों, ह्मणवूनि हंस बोले ।**
**उडुनि जातां बहु शकुन तया झाले ॥**

**पवनचंचळ मधुबिंदुमुखीं आले ।**
**वाम-भागीं उभयतां गरुड गेले ॥ ७२ ॥**

अन्वय मूळश्लोक आहे तसाच.

ह्मणवूनि—ह्मणून, बोलून. पवनचंचळ—पवनानें वाऱ्याच्या योगानें चंचल उडणारे, वाहत जाणारे, (क.) (विशेषण मधुबिंदूचें). मधु-बिंदु—मधुचे मकरंदाचे, पुष्परसाचे, फुलांतील मधाचे बिंदु थेंब (ष. त.). मुखीं—तोंडांत. वामभागीं—डाव्या बाजूनें. उभयतां—दोन, एक जोडपें (गरुडाचें). प्रवासांत गरुड, नीळकंठ, हे पक्षी, विशेषतः त्यांचें जोडपें डाव्या बाजूनें गेल्यास शुभ शकुन मानतात.

दिंडी—**उडत होते खग वायसादि जाणा ।**
**तया भासे तैं हंस तो ससाणा ॥**
**नभा मानुन कीं निकषपाषाणा ।**
**स्वर्णरेखातें तेज मनीं आणा ॥ ७३ ॥**

वायसादि खग उडत होते तैं तया तो हंस ससाणा भासे जाणा; कीं नभा निकषपाषाणा मानुन (तो हंस) स्वर्णरेखा (माना. मग जसें तेज दिसेल) तें तेज मनीं आणा.

वायसादि—वायस कावळे आहे आदि प्रारंभीं ज्यांच्या ते (बहुव्री.). खग—पक्षी, खच्या ठायीं आकाशांत गच्छति जातात ते खग. (उपप. स.) जाणा—हें कवि श्रोत्यास किंवा वाचकांस उद्देशून बोलत आहे. तया—त्या आकाशांतून उडणाऱ्या पक्ष्यांना कीं—किंवा. निकष-पाषाणा—निकष नांवाचा पाषाण (निकष—कसोटी. ज्या दगडावर सोनें घासून त्याची प्रतवारी लावितात तो. शालिग्रामशिला) पाषाण—दगड. स्वर्णरेखा—स्वर्णाची सुवर्णाची सोन्याची रेखा रेघ. वेगामुळें ससाण्यासारखा व पिंवळ्या वर्णामुळें सोन्याच्या रेघेसारखा तो हंस भासला.

अलंकार—उपमा चरण २।३।४.

दिंडी—**असा वेगें तो नभामाजि धांवे ।**
**तया वैदर्भी देशिं झणीं पावे ॥**

**तेथ कुंडिन नगरा समीप धांवे ।**
**राजमंदीरीं गोपुरीं विसावे ॥ ७४ ॥**

असा तो नभामाजि वेगें धांवे. या वैदर्भी देशीं इत्यादि जसें आहे तसाच अन्वय.

असा—ह्याप्रमाणें, वरील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें. नभामाजि—नभ ह्म. आकाश; माजि हे सप्तमीं विभक्तिकरितां येणारें शब्दयोगी अव्यय नभामाजि आकाशांत. क्षणी—लौकर, थोड्याच वेळांत. पावे—पोंचला. राजमंदिरीं—राजाचें मंदीर ह्म. वाडा; भव्य मकान इमारत इत्यादि तें त्या ठिकाणीं. गोपुरीं—मोठ्या भव्य इमारतीसमोर अंगण ठेऊन त्यासभोंवती कोट घालून आंत येण्यासाठीं मोठा गाडीघोडे हत्ती इ. येण्यासारखा दरवाजा ठेवतात व त्यावर उंचच उंच एकाहून एक लहान मजले बांधून इमारत तयार करतात तीस गोपूर असें म्हणण्याचा प्रघात आहे. त्यास क्वचित् नगारखानाही म्हणतात कारण बहुत-करून त्या ठिकाणीं नगारे ठेविलेले असून नगारची लोक प्रहराप्रहराला नगारा वाजवून सनईवर सुस्वर गायन करीत असतात. विसांवे—विश्राम करी बसून श्रम परिहार करी.

गोपुर—a building over the gate ( of a city, ) of the encircling wall of a temple, palace &c. A gate so over built.

मालिनी—**खग मग नगरीचे गोपुरीं झेंप घाली ।**
**मृदु-पवन-गवाक्षीं बैसतां झोंप आली ॥**
**तदुपरि जवशाली वेंघला चंद्रशाला ।**
**निरखि विततशाला राजधानी विशाला ॥ ७५ ॥**

मग ( तो ) जवशाली खग नगरीचे गोपुरीं झेंप घाली. मृदुपवनगवाक्षीं बैसतां ( त्यास ) झोंप आली. तदुपरि ( तो ) चंद्रशाला वेंघला ( आणि ) वित-तशाला ( आणि ) विशाला ( अशी ) राजधानी निरखि.

मग—तदनंतर—कुंडिननगरास पोंचल्यावर. झेंप घाली—उडून बसला. झडप घातली. मृदुपवनगवाक्षीं—मृदु हळुं हळुं वहात येणारा अतएव आल्हादकारक असा पवन वारा तो मृदुपवन. मृदुपवन येण्याकरितां ठेविलेलें जें गवाक्ष तें

( मध्यमपदलोपि स. ). चंद्रशाला-सर्वांत उंच माडी. वेंघला-उडी मारून बसला. उडून बसला. विततशाला-वितत ह्म० विस्तीर्ण अशा आहेत शाला ह्म० मोठमोठीं दालनें जींत ती ( बहुव्री. स. राजधानीचें विशेषण ). विशाला-विस्तीर्ण, फार दूरवर वसलेली. राजधानी-राजाचे राहण्याची नगरी. निरखी-पहाता झाला. अनुप्रास अलंकार.

चूर्णिका.

**सकलभुवनललामायमाना ॥ मानाधिक-विभव-धनिक-सदन-शत-विराजमाना ॥ कलश-जनित-मुनि-चकित-जलधि-शरणाति-विस्तृत-परिखांतरीपायमाना ॥ चंद्रशाला-विजित-सुर-विमाना ॥ जीचे सौध गगन-मंडपाधार-स्तंभचि माना ॥ लाविति जे जलदा निजमाना ॥ वासवचाप जयास कमाना ॥ ऐशी कुंडिन-नामधेय-नगरी राजहंसें पाहिली ॥ ७६ ॥**

सकलभुवनललामायमाना, मानाधिकविभवधनिकसदनशतविराजमाना, कलशजनितमुनिचकितजलधिशरणातिविस्तृतपरिखांतरीपायमाना, चंद्रशालाविजितसुरविमाना, जीचे सौध गगनमंडपाधारस्तंभचि माना, जे जलदा निज माना लाविति, जयास वासवचाप कमाना ( आहेत ) ऐशी कुंडिननामधेयनगरी राजहंसें पाहिली.

सकलभुवनललामायमाना—सकल ह्म० सर्व भुवनांना ह्म० मृत्युलोकादि चतुर्दश लोकांना ललामायमाना ह्म० ललामाप्रमाणें ह्म० लोलका प्रमाणें, शिरोभूषणाप्रमाणें असणारी. मानाधिकविभवधनिकसदनशतविराजमाना—मानाहून प्रमाणाहून गणिताहून अधिक ह्म० अगणित असें विभव ऐश्वर्य त्याच्या योगानें झालेले धनिक ह्म० श्रीमान् लोक त्यांच्या सदनाचें शत ह्म० शेंकडों घरें तीं आहेत विराजमान जींत ती ( बहुव्री. स. ). चंद्रशालाविजित सुरविमाना—चंद्रशालांच्या योगानें उंच उंच माड्याच्या योगानें विजित जिंकलीं आहेत सुरांची देवांची विमानें जिनें ती ( बहुव्री. स. ).

कलशजनितमुनि-चकित जलधिशरणातिविस्तृत-परिखांतरीपायमाना—कलशापासून ह्म० तांब्यापासून जनित ह्म० जन्म पावलेला मुनी तो कलश-जानित मुनि अगस्ति ऋषि, त्यापासून चकित भय पावलेला असा जो जलधी समुद्र

त्याचें जें शरण ह्म० आश्रयस्थान अशा अतिविस्तृत ह्म० अत्यंत लांब रुंद अशा परिखा ह्म० खंदक. त्यामध्यें अंतरीपायमाना ह्म० मध्यें असणारी. सौध–उंच उंच वाडे, इमारती.

गगनमंडपाधारस्तंभ––गगन ह्म० आकाश हाच कोणी मंडप त्याचे आधार ह्म० आश्रय देणारे, भार संभाळणारे स्तंभ ह्म० खांब. माना ह्म० समजा ( मानणें या धातूचें आज्ञार्थी अनेकवचनी रूप ). जल देतात ते जलद ह्म० मेघ. ( उपपदस ). वासवाचें ह्म० इंद्राचें चाप ह्म० धनुष्य तें ह्म० इंद्रधनुष्य. कुंडिन-नामधेय–नगरी—कुंडिन हेंच आहे नामधेय ह्म० नांव जीचें अशी नगरी ह्म० पुरी, शहर ती.

अनुप्रास.

व. ति.—**कोणी वणिग्जन विकी तुळिता तराजे ।**
**कस्तूरिका तिजसवें अलिनी विराजे ॥**
**दोनी समान निरखी विकणार देतो ।**
**घेणार तो न समजोनि उगाच घेतो ॥ ७७ ॥**

कोणी वणिग्जन कस्तूरिका विकी ( ती ) तराजे तुळितां तिजसवें अलिनी विराजे. ( तो ) विकणार दोनी समान निरखी ( आणि ) देतो. तो घेणार न समजोनि उगाच घेतो.

वणिग्जन–वाणी. तराजे तुळितां–तराजू तोलीत असतां. अलिनी–भ्रमरी ( अली ह्म० भ्रमर त्यापासून ‘ नी ’ प्रत्यय लागून स्त्रीलिंग ). ह्यावरून त्या नगराची विशाल संपत्ति सूचित होते.

भ्रांतिमान् अलंकार. येथें अलिनी ही कस्तूरिकाच आहे अशी भ्रांति विकणार व घेणार यांस झाली म्हणून भ्रांतिमान अलंकार झाला.

व. ति.—**तेणें तसें नगर तें धरितां निडारीं ।**
**तेथें विलासवन एक दिसे पुढारीं ॥**
**जेथें सुशीतळ महीतळ सांद्रसाई ।**
**जाई जुई फुलमयी बहु आंबराई ॥ ७८ ॥**

तेणें तें तसें नगर निडारीं धरितां तेथें ( त्यांस ) जेथें सुशीतळ महीतळ ( आहे, जेथें ) सांद्र साई ( आहे, जेथें ) जाई जुई फुलमयी ( अशी ) बहु आंबराई ( आहे, असें ) एक विलासवन पुढारीं दिसे.

तेणें—त्या राजहंसानें. तसें—वर वर्णन केल्याप्रमाणें. निडारीं धरितां—दृष्टीसमोर धरितां, उंचावरून पहातां. तेथें—त्या नगरींत. कुंडिनपुरींत. सुशीतळ—सु ह्म० चांगलें, फार, शीतळ, ह्म० थंड. तें ( क. स. ) महीतळ—महीचें ह्म० पृथ्वीचें तळ जमीन. सांद्र—घनदाट. साई—छाया. आंबराई—आंब्याच्या झाडाचें वन, ज्या ठिकाणीं पुष्कळ आंब्याचीं झाडें लावलेलीं असतात अशी जागा. विलासवन—विलासाचें ह्म० करमणूकीचें जें वन तें विलासवन. पुढारीं—पुढें, समोर.

पद—**तया वनीं खेळे भूपसुता ॥ धृ० ॥**
**खेळविता बहु मेळविला सखि मेळ तया सहिता ॥ १ ॥**
**राजस ते द्विजराजमुखी गजराजगती ललिता ॥ २ ॥**
**ध्यात असे नळराजकथा रघुनाथ-कवींद्र-नुता ॥ ३ ॥**

तया वनीं भूपसुता खेळे ॥ धृ० ॥

तया वनीं—त्या उपवनांत, त्या क्रीडावनांत. भूपसुता—भूला पाळितो तो भूप त्याची सुता ती ह्म. राजकन्या. ध्रुवपद—ध्रुव ह्म. शाश्वत, कायम असें जें पद तें ध्रुवपद. प्रत्येक पदांत दोन भाग असतात. एका भागाला अक्कल कडवें, ध्रुवपद किंवा अस्ताई म्हणतात व दुसऱ्याला कडवें किंवा अंतरा म्हणतात. अंतरा किंवा कडवें निरनिराळ्या अर्थाचा असला तरी ध्रुवपद सर्वांना एकच असून त्यांत अशी खुबी असावी लागते कीं प्रत्येक कडव्याच्या अर्थाला तें जुळेल असें असावें.

खेळविता सखिमेळ बहु मेळविला तयासहिता भूपसुता खेळे ॥ १ ॥

खेळविता—खेळविणारा. सखिमेळ—सखींचा मेळ ह्म० सख्यांचा घोळका, पुष्कळशा सख्या. मेळविला—मिळविला, जमविला, बोलावून गोळा केला. तयासहिता—त्या सख्यांबरोबर. भूपसुता खेळे.

ते राजस द्विजराज-मुखी गजराजगती ललिता ( अशी भूपसुता इत्यादि )

ते—ती. राजस—सुंदर. ( राजस ह्म. राजसगुणाची सत्व, रज, तम असे तीन गुण आहेत त्याप्रमाणें दुसऱ्या गुणाची राजे लोक बहुधा याच गुणाचे असतात ).

द्विजराजमुखी–द्वि ह्म. दोन वेळ ' ज ' जन्मतो तो द्विज ह्म. विप्र, पक्षी इ. त्यांचा राजा तो द्विजराज ह्म. चंद्र त्याप्रमाणें आहे मुख जीचें ती ह्म. चंद्रवदना. ( बहुव्री. स. ) गजराजगती–गज ह्म. हत्ति त्यांचा राजा ह्म. श्रेष्ठ तो गजराज त्याच्या गतीप्रमाणें आहे गती ह्म. चाल ( चालण्याची ढब ) जिची ती ह्म. हत्तीप्रमाणें डोलत डोलत व त्वरित गतीनें परंतु पाय बिलकुल वाजूं न देतां चालणारी. ( बहुव्री ). ललिता–सुंदर स्त्री.

रघुनाथकवींद्रनुता नळराजकथा ध्यात असे ( अशी भूपसुता इ० ). रघुनाथकवींद्रनुता–रघुनाथ नांवाचा कवींचा जो इंद्र–राजा त्यानें नुता–गाइलेली, वर्णन केलेली ती ( तृतीया तत्पु. ). नळ राजकथा–नळ हाच राजा तो नळराजा त्याची कथा. ध्यात असे–मनन करीत गुणगुणत असलेली.

व. ति.—**तो मंडलाकृति फिरे उतरावयाला ।**
**भैमीमुखेंदुपरिवेष ह्मणों तयाला ॥**
**तेथें महीवरि असा खग बैसताहे ।**
**कीं सुंदरी निज कुतूहल जेविं पाहे ॥ ८० ॥**

तो उतरावयाला मंडलाकृति फिरे. तयाला भैमीमुखेंदु–परिवेष ह्मणों. तेथें महीवरि खग असा बैसताहे कीं जेविं सुंदरी निज कुतूहल पाहे.

उतरावयाला–खालीं येण्याकरितां, आकाशांतून जमीनविर येण्याकरितां, मंडलाकृति–मंडलाची जशी आकृति असते तशा आकृतीप्रमाणें गोल. तयाला–त्या गोल गोल फिरणाऱ्या राजहंसाला. भैमीमुखेंदुपरिवेष–भीमाची भीमराजाची मुलगी ती भैमी, तिचें मुख तें भैमीमुख हाच इंदु ह्म० चंद्र, त्याचा परिवेष ह्म० खळें तो दमयंतीच्या मुखरूपचंद्राचें खळें कीं काय. हंस हा पीतवर्ण व तेजस्वी असल्यानें ही उपमा. निज कुतूहल–आपला चमत्कार; आपल्या स्वतःचा, हंसाचा, चमत्कृतिजनक देह. जेविं–जेणेंकरून. पाहे–पाहील, पाहूं शकेल.

अलंकार–स्वभावोक्ति चरण १. रूपक चरण २.

व. ति.—**जो बैसतां चपळ पक्ष-पुटीं धरेला**
**हाणीतसे फडफडां ध्वनि हो उदेला ॥**
**पाहे तया खगवरासि वरानना हे ।**
**मानी मनीं नवलही मग बोलताहे ॥ ८१ ॥**

जो बैसतां धरेला चपल पक्षपुटीं हाणीतसे ( तेव्हां ) फडफडां ध्वनि उदेला हो तया खगवरासि हे वरानना पाहे ( आणि ) मनीं नवलही मानी. मग बोलताहे.

बैसतां–बसतांनां. धरेला–जमीनीला. चपल–चंचल. पक्षपुटीं–पक्ष हेच पुट त्यांनीं. ( क. स. ) ( पुट–पातळ पदार्थ राहील अशा आकाराची घडी घालून केलेली आकृति. ) हाणीतसे–मारीतसे. फडफडां–( अनुकरणवाचक ) फडफड असा ध्वनि–शब्द आवाज. उदेला–उत्पन्न. हो–होई. होत असे. तया–त्या. खगवरासि–खगांमध्यें वर ह्म. श्रेष्ठ त्यास ( स. त. )–हे–ही. वरानना–वर ह्म. श्रेष्ठ सुंदर आहे आनन ह्म. मुख जिचें ती ( बहु व्री. स. ). नवल–आश्चर्य. स्वभावोक्ति चरण १

या श्लोकांत ' च ' व ' पळ ' अशीं दोन पदें पाडलीं असतां:—बैसतांच–बसतांक्षणीं. पळ–पळभर ( क्रिया विशेषण ) असा अर्थ करावा. हा अर्थ जास्त सरस दिसतो.

शिख.—असा पक्षी लक्षी बहुविहगलक्षीं न मिळता ।
सुवर्णी जो वर्णी वद कवण वर्णी कवयिता ॥
अगाई हा बाई त्वरित वर जाईल पळुनी ।
धरूं जातें हातें हळुं हळुं तयातें न कळुनी ॥ ८२ ॥

बहुविहगलक्षीं असा पक्षी न मिळता ( हें ) लक्षी. जो वर्णी सुवर्णी ( आहे तया ) कवण कवयिता वर्णी ( तें ) वद. अगाई ! बाई ! ! हा त्वरित वर पळुनी जाईल ( ह्मणून ) हळुंहळुं न कळुनी तयातें हातें धरूं जातें.

दमयंती सख्यांस ह्मणतेः–बहुविहगलक्षीं–बहु–पुष्कळ असे जे विहगाचें ह्म० पक्ष्याचें लक्ष (एकेक लक्ष संख्येचा एकेक कळप असे अनेक) त्यांत. असा–ह्या राजहंसासारखा. न मिळता–मिळाला नसता. वर्णी–रंगांत. सुवर्णी. सुवर्णी–सुवर्णासारखा सोन्यासारखा. कवण–कोण. कवयिता–कविता करणारा. वर्णी–वर्णन करूं शकेल. न कळुनी–पक्ष्यास कळूं न देतां. हातें–हातानें. अलंकार–अनुप्रास चरण १।२।३।४.

व. ति.—ऐसें वदे मग तयास धरावया हे ।
तैं होय हंसगमना पहिलीच आहे ॥

**वाजे च ना वलय नूपुरनाद नोहे ।**
**तो तद्गतीस निरखूनि कसा न मोहे ॥ ८३ ॥**

ऐसें वदे. तैं मग हे ( जी ) पहिलीच हंसगमना आहे ( ती ) तयास धरावया हंसगमना होय. ( तैं ) वलय वाजेच ना, नूपुरनाद नोहे. तो तद्गतीस निरखूनि कसा न मोहे ?

ऐसें वदे--वर सांगितल्याप्रमाणें बोलती झाली. तैं–मग, त्यानंतर, तसें बोलून. हंसगमना--हंसाच्या गमना प्रमाणें गमन म्ह० गति आहे जीची ती म्ह० हंसाप्रमाणें चालणारी. ( बहुव्री. स. ). हंसगमना होय–( हंसाकडे गमन करणारी ती हंसगमना ) हंसाकडे जाऊं लागली. वलय–कंकणें ( बांगड्या इत्यादि ). नूपुरनाद—नूपुराचा म्ह० घाघऱ्याचा, घुंगरांचा लक्षणानें, घुंगरे असले-ल्या पादभूषणांचा नाद म्ह० आवाज, शब्द. नोहे--होत नसे. तद्गतीस–तिच्या गतीस. तिच्या चालीस. निरखूनि—लक्ष लावून पाहून. कसा न मोहे–कसा मोहणार नाहीं ? ( अर्थात् मोहेल ). मोहणें–गुंग होणें. जें काम करीत असेल तिकडेच तंद्री लागणें. त्याच कामांत गढून जाणें.

स्वभावोक्ति.

व. ति.—**हे मंद-मंद-पद सुंदर कुंददंती ।**
**चाले जसा मद–धुरंधर इंद्रदंती ॥**
**हंसा धरूं जवळि जाय कृशोदरी ते ।**
**निष्कंप-कंकण-करासि पुढें करीते ॥ ८४ ॥**

हे मंद-मद-पद, सुंदर, कुंददंती, ( दमयंती ) जसा मदधुरंधर इंद्रदंती ( चाले तशी ) चाले. ते कृशोदरी हंसा धरूं ( हंसा ) जवळी जाय ( आणि ) निष्कंप-कंकण-करासि पुढें करीते.

मंद-मंद-पद–मंदमंद म्ह. हळूंहळू आस्ते आस्ते. असे आहेत पद म्ह. पाय लक्षणानें पायांची चाल जीची ती ( बहुवी. ). कुंददंती–कुंदाप्रमाणें आहेत दंत जीचे ती ( बहुवी. ). मदधुरंधर–धुरेप्रत म्ह. जोकडाप्रत धरतो तो धुरंधर लक्षणेनें प्रमुख, मदयुक्त जो धुरंधर तो ( मध्यमपदलोपी स. ); मदोन्मत्त, माजलेला व अतिशय मोठा असा. इंद्रदंत्ती–इंद्राचा दंती म्ह. हत्ती ऐरावत. कृशोदरी–कृश

ह्म. बारिक आहे उदर ह्म. पोट जीचें ती बारिक पोटाची; सुंदर शरीराची. निष्कंप कंकणकरासि–कंप नसलेली तीं निष्कंप–निष्कंप अशी कंकणें आहेत ज्यांत असा कर ह्म. हात त्यासि.

**द्रु. वि.—गंवसलाच असा खग भासला ।**
**तंव तदीय सखीजन हांसला ॥**
**मग सवें च बुझावुन हांकिला ।**
**उडविला च पिटाळुन टाकिला ॥ ८५ ॥**

अन्वय आहे तसाच.

गंवसला–सांपडला, हातीं आला, धरिला. खग–पक्षी ( राजहंस ). तँव–तोंच, इतक्यांत. सखीजन–सख्या मैत्रिणी. ( जन शब्द समुदायवाचक आहे. व ह्या अर्थी तो नित्य पुल्लिंगी चालतो. क्वचित् एकवचनींही येतो जसें हा जन संताचा दास आहे. ह्या ठिकाणीं हा जन ह्म० मी असा अर्थ आहे. ) सवेंच–लागलीच, तात्काळ, त्याच वेळीं. बुझावून–भिववून भयचकित करून. ( बुजणें–भयचकित होणें त्यापासून प्रयोजकरूप 'बुजावणें' अथवा'–बुझावणें–'ह्म० भयचकित करणें. ) पिटाळून–त्वरेनें जाई असें करून.

( मराठींत कित्येक साहाय्य क्रियापदाचा प्रयोग दुसऱ्या एखाद्या क्रियेच्या ऊन प्रत्ययांत धातूसाधिताबरोबर करून त्याच धातुसाधिताचा अर्थ दाखविला जातो जसें:–तो तें काम करून चुकला, त्यानें तें काम करून टाकलें. इत्यादि. यांत करून चुकला, करून टाकलें इत्यादि शब्द प्रयोगाचा अर्थ केलें इतकाच आहे. )

अलंकार—कारक दीपक.

व. ति.—**कांहीं उडोनि गगनीं मग नीट येतो ।**
**नाहींच दूर न समीप बसे तसा तो ॥**
**पाहे सुधाकरमुखी कलहंसराया ।**
**लाहे मनोरथ तयास पुन्हा धराया ॥ ८६ ॥**

मग गगनीं कांहीं उडोनि, नीट येतो ( आणि ) दूर नाहीं न समीप तसा तो बसे. सुधाकरमुखी ( त्या ) कलहंसराया पाहे ( आणि ) तयास धराया पुन्हा मनोरथ लाहे.

मग–सखी जनानीं पिटाळून लाविल्यावर. कांहीं–कांहींसा थोडासा ( क्रियाविशेषण " उडोनी " या धातुसाधिताचें ). नीट–सरळ. ( पूर्वी घिरट्या घालित उतरण्याचें वर्णन आलें आहे त्याच्या विरुद्ध. तसें घिरट्या घालीत न उतरतां सुधा ). सुधाकरसुखी–सुधा ह्म० अमृत आहे करांत ह्म० किरणांत ज्याच्या तो ह्म० चंद्र सुधाकराप्रमाणें आहे मुख ह्म० तोंड जीचें ती ह्म० दमयंती ( बहुव्री. ). कलहंसराया–( कलार्थ ह्म० क्रीडार्थ जो हंस तो कलहंस त्यांतील श्रेष्ठ त्याप्रत. मनोरथ लाहे–मनांत इच्छी, मनांत आणी. ( लाहणें–प्राप्त करून घेणें, मिळविणें; मनोरथ ह्म० इच्छा; मनोरथ लाहे–इच्छा मिळवी अर्थात् इच्छी. मनांत आणी ).

स्वभावोक्ति.

मदिरा.

**हंस धरीन ह्मणोनि मनोरथ हा मज होय विनोद तुम्हांला ।**
**हा कलहंस पिटाळवितांहि, पुन्हा उडवाल तया विहगाला ॥**
**जा परत्याच, तुम्ही नलगेच, असें वदुनी नृपराजसुता ते ।**
**राहविला सखिचा जन आपणमात्र तयास धरूं मग जाते ॥ ८७ ॥**

" हंस धरीन म्हणोनि हा मज मनोरथ होय. ( तो ) तुम्हांला विनोद होय. ( आणि म्हणून तुम्ही ) हा कलहंस पिटाळवितांही. ( तुह्मी ) तया विहगाला पुन्हा उडवाल. ( या करितां ) ( तुह्मी ) जाच परत्या, तुह्मी नलगेच " असें वदुनी सखीचा जन राहविला ( आणि ) मग ते राजसुता आपणमात्र तयास धरूं जाते.

म्हणोनि–असा, हा. हा मज मनोरथ होय–ही मला इच्छा आहे. विनोद–थट्टेचा विषय. पिटाळवितां–हाकून लावतां. विहगाला–पक्ष्याला राजहंसाला, परत्या–( वाक्यांत औदासिन्यादि गम्य असतां केवळ वाक्यालंकारार्थ याचा उपयोग होतो. मुळचा शब्द परता त्याचे स्त्रीलिंगी अनेकवचनीरूप ). नलगेच–नकोच ( च–निश्चयार्थवाची ). नृपराजसुता–नृपांतला राजा ह्म० श्रेष्ठ त्याची सुता ह्म० कन्या राजकन्या ( ष. त. ) राहविला–थांबविला. आपल्या बरोबर न येऊं देतां होता तेथेंच थांबविला. आपणमात्र–आपणाशिवाय दुसरें कोणी बरोबर नाहीं अशी ह्म० आपण एकटी.

व. ति.—**रागेजली अरुण-कांति विराजवी ते ।**
**हे एकली सुतनु चंद्रकला तशी ते ॥**
**गेली हळूं च कलहंस समीप केला ।**
**कांहीं पुढें फडकला अवलोकिजेला ॥ ८८ ॥**

( ते ) रागेजली ( अत एव ) अरुण-कांति विराजवी ते ( जशी ) चंद्रकला तशी हे एकली सुतनु हळूंच गेली ( आणि ) कलहंस समीप केला ( तों तो ) कांहीं पुढें फडकला ( असा ) अवलोकिजेला.

रागेजली—रागेजणे या धातूंचे भूतभूतकालवाचक विशेषण=रागावलेली. पक्षीं-रंगलेली, लाल झालेली. अरुणकांति—अरुण ह्म० लालसर किंचित् लाल अशी कांति ह्म० शोभा, द्युति, छवि, ती ( कर्मधारय. ) पक्षीं अरुणोदयाचे वेळची शोभा. विराजवी–धारण करी. ते–ती. एकली–एकटी, आपण मात्र, चंद्रकला–चंद्राची कला ह्म० कोर. कांहीं–कांहींसा ( क्रियाविशेषण ' फडकला ' या धातुसाधित विशेषणाचें ). फडकला–फडकणें या धातूचें भूतभूतकालवाचक विशेषण कलहंसाचें. अवलोकिजेला–पाहिला गेला.

अलंकार—श्लेष. चरण १।२.

स्वभावोक्तिचरण १।२।३।४.

व. ति.—**आणीकही पद न वाजत मंद चाले ।**
**जो चालतां पदर सांवरिला न हाले ॥**
**हेही करी निजकरीं खग सांपडेसा ।**
**तोही हळू हळुच होय पलीकडेसा ॥ ८९ ॥**

( हे ) आणीकही पद न वाजत मंद चाले ( तें ) चालतां जो पदर सांवरीला ( तो ) न हाले. हेही निजकरीं खग सांपडेसा करी. तोही हळू हळुच पलीकडेसा होय.

पद न वाजत–पाऊल न वाजेल अशी. आणीक ही–जास्त. पूर्वी जितकी मंद चालत होती त्याहून अधिक मंद. मंद–हळुं हळुं, पदर–लुगड्याचा शेवट. सांवरि-ला–आंगाभोंवती आंवरून घेतलेला. निजकरीं–निज ह्म० स्वतःचा, आपला जो कर त्यांत, आपल्या हातीं. सांपडेसा–सांपडेल असा, धरिला जाईल असा, पलीकडेसा–दूर दूर.

मालिनी—**मदगजगमनेनें मागुती चाल केली ।**
**विनत-तनु-लता हे तत्समीपास गेली ॥**
**पुनरपि फडके तो फारसा दूर नाहीं ।**
**जवळि जवळि ऐसा भासला हंस कांहीं ॥ ९० ॥**

मदगजगमनेनें मागुती चाल केली. हे विनत तनुलता ( होत्साती ) तत्समीपास गेली. तो हंस पुनरपि फडके ( परंतु ) फारसा दूर नाहीं ( तर ) कांहीं जवळि जवळि ऐसा भासला.

मदगजगमनेनें—मदानें युक्त जो गज ह्म० हत्ती तो त्याच्या गमनाप्रमाणें आहे गमन ह्म० चालण्याची ढब जीची ती तिनें ( बहुव्री. स. ). मागुति—पुन्हा, पुनरपि. चाल केली—चालून गेली ( मुळचा अर्थ हल्ला करणें असा आहे ). विनततनुलता—तनु हीच कोणी लता ती तनुलता. विनत ह्म० वांकलेली खालीं लवलेली अशी आहे तनुलता जीची ती विनततनुलता ( बहुव्री. ). तत्समीपास—त्याच्या समीप तें तत्समीप ( मूळचें क्रियाविशेषण परंतु येथें नामासारखा प्रयोग करून त्याची द्वितीया किंवा चतुर्थी विभक्ति केली आहे ). फडके—उडून बसला. कांहीं—थोडासा ( क्रियाविशेषण जवळि जवळि याचें ). स्वभावोक्ति.

व. ति.—**हंसें तदा चतुरसंमत युक्ति केली ।**
**ते चालवीत सुतनू बहु दूर नेली ॥**
**छाया तियेशि दुसरी तिसरी वनाळी ।**
**जे सांवळी युवतितुल्य दिसे निराळी ॥ ९१ ॥**

तदा हंसें चतुरसंमत युक्ति केली ( आणि ) ते सुतनु चालवीत बहु दूर नेली. तियेशि दुसरी छाया तिसरी जे निराळी युवतितुल्य सांवळी दिसे ( ते ) वनाळी ( होती ).

तदा—तेव्हां. हंसें—राजहंसानें. चतुरसंमत—चतुरांची ह्म. हुशार असे लोक त्यां संमतची—मान्य ( ष. त. ) निराळी—अन्य, दुसरी. युवतितुल्य—तोलण्यास योग्य ती तुल्य. युवतीशी तुल्य ती ( क. स. ) सांवळी—काळसर. वनाळी—वनाची आळी ह्म. ओळ. आळी हा प्रत्यय लागून साधित नामें होतात उ. दिवाळी इ. ( दा. व्या. पा. ५४५ ) तियेशि...वनाळी—तिच्या सोबतीला

तिची छाया व वनांतलीं स्त्रियासारखींच दिसणारीं झाडें यांशिवाय अन्य कोणी नव्हतें. अर्थात् तिला एकटीला राजहंसानें भुलवून दूर वनांत नेलें.

अलंकार–पर्यायोक्ति चरण ३।४.

प्रमाणिका—**तया वनांत एकली ॥ विलासिनी विलोकिली**
**मदें भरोनि डोलतो ॥ तियेस हंस बोलतो ॥ ९२ ॥**

( त्यानें जेव्हां ) तया वनांत एकली विलासिनी विलोकिली ( तेव्हां ) हंस मदें भरूनि डोलतो आणि तियेस बोलतो.

विलासिनी–वेल्हाळा, विलासाची आवड आहे अशी स्त्री ( येथें दमयंती ). विलोकिली–पाहिली.

दिंडी—**भूमिभागीं फिरणार तूं तुला मी ।**
**कसा सांपडेन सांग गगनगामी ॥**
**बाळ बाळे जरि होय चंद्रकामी ।**
**हस्त त्याचा लागेल काय सोमीं ॥ ९३ ॥**

तूं भूमिभागीं फिरणार ( आहेस ) तुला मी गगनगामी कसा सांपडेन ( तें ) सांग. बाळे, जरि बाळ चंद्रकामी होय ( तरि ) त्याचा हस्त सोमीं लागेल काय ?

भूमिभागीं—भूमीचा भाग त्यावर भूमिभागीं ह्म० पृथ्वीवर जमीनीवर. फिरणार–फिरणारी, चालणारी. गगनगामी–गगनांत ह्म० आकाशांत गमन करणारा तो गगनगामी ह्म० आकाशांत उडणारा. ( उपप. स. ). बाळे–मुली, पोरी. बाळ–पोर, मूल. चंद्रकामी–चंद्राचा कामी इच्छिणारा होय–झाला. हस्त–हात. सोमीं–चंद्राला.

अलंकार—तुल्ययोगिता व प्रश्नालंकार. चरण—३।४.

दिंडी—**असो, सांपडतों तुझ्या करामाजी ।**
**पुन्हा सुटका करशील काय माझी ॥**
**कसा पातेजूं बाळबुद्धि तूझी ।**
**स्त्रीस्वभावें बहु आणशील बाजी ॥ ९४ ॥**

असो, तुझ्या करामाजी सांपडतों ( परंतु ) माझी पुन्हा सुटका करशील काय? तुझी बाळबुद्धि ( आहे, तिजवर ) कसा पातेजूं ? ( नाहींतर ) स्त्रीस्वभावें बहु-बाजी आणशील.

करामाजी–हातांत. बाळबुद्धि–बाळाची बुद्धि ती ( षष्ठीतत्पु. ) पातेजूं–विश्वास ठेवूं. भरंवसा ठेवूं. स्त्रीस्वभावें–स्त्रियांचा स्वभाव तो त्या योगानें. बाजी–संकट. जसें:—त्या कामांत मजवर मोठी बाजी आली. ह्म. संकट आलें.

मालिनी—**चतुर नर जसा हा बोलतो हंस तैसा ।**
**तरि न धरि मृगाक्षी विस्मयीं भाव कैसा ॥**
**पळुनि तिज निखंदी तीस तो खेद नाहीं ।**
**शिणहि विसरली ते बोलती होय कांहीं ॥ ९५ ॥**

जसा चतुर नर ( बोलतो ) तैसा हा हंस बोलतो तरि मृगाक्षी विस्मयीं भाव कैसा न धरी ? पळुनि तिज निखंदी तो खेद तीस नाहीं. ते शीण ही विसरली ( आणि ) कांहीं बोलती होय.

विस्मयीं......धरी—विस्मय कसा पावणार नाहीं, कसी आश्चर्य पावणार नाहीं. निखंदी–निंदी. खेद–दुःख. शीण–थकवा. बोलती होय–बोलूं लागली.

अलंकार–प्रश्न. चरण २

दिंडी—**कोण तूं गा कोठील कवणियाचा ।**
**कसा झाला तव देह सोनियाचा ॥**
**कशी आली ही तूज मनुजवाचा ।**
**काय भाग्योदय सांगु या वनाचा ॥ ९६ ॥**

गा, तूं कोण कोठील कवणियाचा ( आहेस ) ? तव देह सोनियाचा कसा झाला ? ही मनुजवाचा तूज कशी आली ? या वनाचा भाग्योदय काय सांगूं ?

कवणियाचा–कोणाचा याचे कवितेंतील रूप. सोनियाचा–सोन्याच्या रंगाचा, सोन्यासारखा. भाग्योदय–भाग्याचा उदय ( षष्ठी तत्पु. ) मनुजवाचा–मनुपासून जन्मले ते मनुज ह्म० मानव त्यांची वाचा ( ष. त. )

दिंडी—**धरिल पाहिल सोडील असा पाहीं ॥**
**मजवरता विश्वास तुझा नाहीं ॥**
**असो पुसते ते सांग कथा कांहीं ॥**
**जाइ अथवा मग याच वनीं राहीं ॥ ९७ ॥**

( ही ) धरिल, पाहिल, ( आणि ) सोडील असा तुझा मज वरता विश्वास नाहीं पाहीं. असो. कांहीं पुसते ते कथा सांग मग जाई अथवा याच वनीं राहीं.

अर्थ अगदीं सरळ आहे.

अलंकार—विकल्प चरण ४. कारकदीपक चरण १.

दिंडी—**असें बोलोनी मौन धरुनि राहे ॥**
**काय बोले तो हंस असें पाहे ॥**
**तदा त्याचा वचनौघ असा वाहे ॥**
**राजकन्ये तूं आयके गिरा हे ॥ ९८ ॥**

असें बोलोनी ( दमयंती ) मौन धरुनि राहे ( आणि ) तो हंस काय बोले असें पाहे. तदा त्याचा असा वचनौघ वाहे ( कीं ) राजकन्ये, तूं हे गिरा आयके.

मौन धरुनि राहे—गुप झाली. बोलेनाशी झाली. ( मुनीचा भाव तें मौन—भाववाचक नाम ). वचनौघ—वचनाचा ओघ ( षष्ठी तत्पु. ) तदा...वाहे—तेव्हां हंस पुढीलप्रमाणें बोलूं लागला. गिरा—भाषण.

दिंडी—**ब्रह्मदेवाचे बहु विमानवाही ॥**
**हंस आहेती ऐकिलें तुवांही ॥**
**तया वंशी सौवर्ण देह हाही ॥**
**ज्या सरीखा सखि सर्वमान्य नाहीं ॥ ९९ ॥**

ब्रह्मदेवाचे विमानवाही हंस बहु आहेती ( असें ) तुवांही ऐकिलें ( असेल ). सखि, ज्या सरीखा ( अन्य ) सर्वमान्य नाहीं तयावंशीं हा सौवर्ण देहही ( झाला ).

विमानवाही—विमानाला वाहणारे. ( उप. स ). आहेती—आहेत. ( कवितेंतील रूप ). तुवां—त्वां. सखि—संबोधन. सर्वमान्य—सर्वांस मान्य. सौवर्ण—सुवर्णाचा तो सौवर्ण. सरीखा—सारखा.

व. ति.—**मंदाकिनीमधिल जीं कनकारविंदें ।**
**तीं जेवितों मृदुलनालमृणालकंदें ॥**
**आम्ही असों नृपसुते तरि कांचनाचे ।**
**जें कार्य तें धरिल कीं गुण कारणाचे ॥ १०० ॥**

( हे ) नृपसुते, मंदाकिनीमधिल जी कनकारविंदें तीं मृदुलनालमृणालकंदें आह्मी जेवितों तरि ( आह्मी ) कांचनाचे असों. जें कार्य ( आहे ) तें कारणाचे गुण धरिल कीं.

मंदाकिनी—गंगानदी. कनकारविंदें—कनक ह्म० कनकासारखीं सोन्यासारखीं (सोन्याच्या रंगासारखी असून त्याप्रमाणेंच चकाकणारीं) अशीं अरविंदें ह्म० कमलें तीं ( कर्मधारय. ) मृदुलनालमृणालकंदें—मृदुल मृदु-मऊ असे जे नाल कमलाचे देंठ व मृणाल ह्म० कमलाचे तंतु ते मृदुलनालमृणाल, त्यांचे कंद ह्म० कांदे तीं. जेवितों ह्म० खातों. तरि—म्हणून. कांचनाचे—सोन्याचे. असों—आहोंत. कार्य—घडलेला परिणाम. कारण—मूळ, निदान. कीं—निश्चयबोधक अव्यय.

व. ति.—**जो मानसीं विहरतो विहरो परी तो ।**
**कां आमुची कुलसती असती करी तो ॥**
**राखीं नळा निजयशोमय हंस राया ।**
**आलों महीवर फिराद अशी कराया ॥ १०१ ॥**

( हे ) राया, नळा, जो निजयशोमय हंस मानसीं विहरतो तो विहरो परी आमुची कुलसती असती कां करीतो ( त्या ) राखीं अशी फिराद कराया महीवर आलों.

निजयशोमय हंस—निज ह्म० स्वतःचा यशरूप जो हंस तो निजयशोमय हंस. मानसीं—मानससरोवरांत ( श्लेषानें ) स्वर्गांत. विहरतो—खेळतो, विहार करतो. तुझा यशोरूप हंस स्वर्गांत क्रीडा करूं लागला अर्थात् तुझें यश स्वर्गांत सर्वत्र पसरलें. परी—परंतु. कुलसती—कुलाची वा कुलांतील सती ह्म० पतिव्रता स्त्री कुलसती ( पक्षीं ) आमच्या कुळाची कीर्तिरूप पतिव्रता स्त्री. असती—जारिणी. नळाचा यशोरूप हंस आमची कीर्तिरूप स्त्री हरण करून तिचें पातिव्रत्य नष्ट करतो. राखीं—रक्षण कर, त्या यशोरूप हंसास तसें करण्यापासून निवारण कर. त्यास तसें करूं देऊं नको. फिराद—फिर्याद, शिकायत, गाऱ्हाणें. महीवर—मृत्युलोकीं पृथ्वीवर.

स्पष्टार्थः—नळराजाची कीर्ति सत्यलोकापर्यंत गेल्यामुळें आमची कीर्ति लुप्त झाली म्हणून असा जो कीर्तिमान नळराजा त्याच्या भेटीस्तव मृत्युलोकीं आह्मी आलों असें हंसाचे सांगण्याचा भावार्थ.

व. ति.—**मी गुतलों नळमहींद्रगुणौघ-पाशीं ।**
**सेवेसही मग करोनि तयाच पाशीं ॥**
**आलोकुनी कवण या चतुरा न नाचे ।**
**लोकेशता विभव ही चतुराननाचे ॥ १०२ ॥**

मी नळमहींद्रगुणौघपाशीं गुंतलों मग सेवेसही करोनि तयाच पाशीं ( गुंतलों ). या चतुरा चतुराननाचे लोकेशता विभव ही ( आहेत तें ) आलोकुनी कवण न नाचे ?

नळमहींद्रगुणौघपाशीं—नळ नांवाचा जो महीचा इंद्र त्याचे गुणाचा ओघ तो नळमहींद्रगुणौघ हाच कोणी पाश ह्म. फांसा तो त्यांत ( कर्मधारय ). सेवेसही करोनि—सेवा करून, चाकरी करून. तयाच पाशीं—त्याचेच जवळ. या चतुरा—या चतुर राजाला. चतुराननाचे—चतुर ह्म. चार आहेत आननें ह्म. तोंडें ज्याला तो त्याचे ब्रह्मदेवाचे लोकेशता—लोकांचा जो ईश मालक स्वामी तो लोकेश त्याचा भाव राजेपणा, नृपत्व. विभव—वैभव, ऐश्वर्य. आलोकुनी—पाहुनी. कवण—कोण न नाचे—नाचणार नाहीं. अर्थात् सर्व नाचतील. सर्वांना अत्यानंद होईल. नळामध्यें ब्रह्मदेवाचे गुण असल्यानें मला त्याच्याविषयीं जास्त आप्तपणा व प्रेम वाटूं लागलें असा भावार्थ.

अलंकार—रूपक चरण १. उपमा चरण ४. प्रश्न चरण ३.

व. ति.—**एकांत लेखनहि वाचनही करीतो ।**
**माझी तनुद्युति समीप तदा धरीतो ॥**
**या कारणें नळ मला बहु आप्त मानी ।**
**तो सांगता निजमनोरथ होय कानीं ॥ १०३ ॥**

( जेव्हां तो ) एकांत लेखनहि वाचनही करीतो तदा माझी तनुद्युति समीप धरीतो या कारणें नळ मला बहु आप्त मानी ( आणि म्हणूनच ) तो निजमनोरथ ( माझ्या ) कानीं सांगता होय.

एकांत—एकांतीं, एकटाच असतां. लेखन-लिहिणें. तनुद्युति-तनु ह्म. शरीर तिची द्युति. माझी...धरीतो-एकांतांत लिहितां वाचतांना माझ्या तेजस्वी शरीराच्या प्रकाशाचा दिव्याप्रमाणें नळराजा उपयोग करतो. ( यावरून मजवर त्याचें प्रेम असून विश्वासही अत्यंत आहे असें दाखविलें ) या कारणें-ह्मणून. आप्त-मिळालेलें हा धात्वर्थ, त्यापासून स्नेहानें मिळविलेला, स्नेही, जिवलग मित्र. निजमनोरथ-निज आपला स्वतःचा मनो-रथ ह्म. इच्छा.

व. ति.—**आधींच नैषधकथा-नवनीत-भेला ।**
**होता अलंकरणरूप इच्या जिभेला ॥**
**हंसोदयें विघरतां अधरीं धरी ते ।**
**स्वीकारितां वचन तें मग आदरीते ॥ १०४ ॥**

नैषधकथा-नवनीत-भेला इच्या जिभेला आधींच अलंकरणरूप होता ( तो ) हंसोदयें विघरतां ते अधरीं धरी. मग स्वीकारितां तें वचन आदरीते.

नैषधकथा-नैषधाची कथा ( षष्ठीतत्पु. ) नैषधकथा हाच कोणी नवनीताचा लोण्याचा भेला ढेप. ( क. धा. ) अलंकरणरूप-अलंकार, भूषण. हंसोदयें-हंसाचा ह्म. राजहंसाचा ( पक्षी ) सूर्याचा ( हंस=सूर्य ) उदय त्यानें. विघरतां-विरघळतां. द्रवरूप होतां. अधरीं-ओंठांवर ( अधर ह्म. खालचा ओंठ. परंतु येथें विवक्षितच ओंठ अपेक्षित नाही. ) आदरीते-आदर करीते. वचन आदरीते-आदरानें वचन बोलली. दमयंतीला नळाविषयीं पूर्वींपासून प्रेम वाटतच होतें तें हंसाच्या बोलण्यानें वृद्धिगत झालें. व पूर्वीं जें जिभेवर होतें तें ओठावर आलें. मग तेथून तें भाषणरूपानें बाहेर पडूं लागलें. ह्मणजे पूर्वीं मनांत असलेलें गूढ प्रेम आतां भाषणांत सूचित होऊं लागलें हा भावार्थ.

हंसोदय आणि विघरता या श्लिष्टपदानें वाच्यार्थाहून अन्य अर्थ सुचविला ह्मणून श्लेष आणि नैषधकथा व नवनीतभेला याचा अभेद दाखविला ह्मणून रूपक.

दिंडी—**नळें तुजशीं एकांत काय केला ।**
**तोचि ऐकाया जीव हा भुकेला ॥**
**तया बोलोनी निवावें या भुकेला ।**
**ऐकवावा मज ह्मणुन नायिकेला ॥ १०५ ॥**

नळें तुजशीं काय एकांत केला तोचि ऐकाया हा जीव भुकेला ( आहे ) तया बोलोनी या भुकेला निवविं. ( तो ) नायिकेला ह्मणुनि मज ऐकवावा.

नळें—नळराजानें. भुकेला—इच्छित ( विशेषण ) तया बोलोनी—तो सांगून. भुकेला—इच्छेला ( नाम. द्वितियाविभक्ति ). निवविं—शांत कर. नायिकेला—ऐकलेला नाहीं. ह्मणूनि—यासाठीं. ऐकवावा—सांगावास.

दिंडी—**नळाशीं जो एकांत तुझा कां ।**
**प्रकट कीजे म्या सांग इतर लोकां ॥**
**धन्य डोळे न करोनि तदालोकां ।**
**नळकथेनें हे कर्ण धन्य हो कां ॥ १०६ ॥**

जो तुझा नळाशीं एकांत ( झाला, तो ) म्या इतर लोकां प्रकट कीजे कां ? सांग. तदालोका करोनि डोळे धन्य न ( ह्मणून ) हे कर्ण ( तरि ) नळकथेनें धन्य हो कां.

प्रकट कीजे कां—जाहीर करावा, मी लोकांस सांगेन काय. ( अर्थात् सांगणार नाहीं. ). तदालोका—त्याचा आलोक ह्म० दर्शन त्याप्रत. तदालोका... धन्य न—त्याला पाहण्याइतकी मी दैववान नाहीं. त्यास मी अद्यापि पाहिलें नाहीं. ह्मणून निदान त्याच्या गोष्टी ऐकून कान तरी धन्य होवोत, तृप्त होवोत. नळ कथेनें—नळाची कथा तिच्या योगानें. ( ष. त. )

दिंडी—**निषधराजीं हे फार दिसे राजी ।**
**असें हंसें जाणोनि मनामाजी ॥**
**बोलिजेली नळराजकथा हे जी ।**
**भला हेजीव तीशि ह्मणे हेजी ॥ १०७ ॥**

हे निषधराजीं फार राजी दिसे असें मनामाजी जाणोनि हंसें हे जी नळराजकथा ( ती ) बोलिजेली. हे भला हेजीव तिशीं जी ह्मणे.

हे—दमयंती. निषधराजीं—नळराआच्या ठायीं. राजी—खुष. मनामाजी—मनांत, अंतःकरणांत. हंसें—हंसाकडून ( कर्मणीप्रयोगांतील तृतीयांत कर्ता ). नळराजकथा—नळराजाची कथा ( षष्ठीतत्पु. ) ( मूळ वाक्यांतील कर्म परंतु कर्मणीप्रयोगांतील प्रथमांत कर्ता बोलिजेली या क्रियेचा ). हंसें नळराजकथा बोलिजेली

हंसाकडून नळराजकथा सांगितली गेली] ह्म० हंसानें नळराजकथा सांगितली. ( दामले यांचें व्याकरण पहा ). हे भला हेजीब–हा शाहाणा ( चतुर ) दूत ( हेजीब ह्म० दूत ). तिशीं जी ह्मणे–तिला होय म्हणे. तिची आज्ञा मान्य करी. ( अर्थात् तिनें नळकथा सांगण्यास सांगितली आणि; तिचें सांगणें हंसानें मान्य-करून कथा सांगितली ).

दिंडी—**नळ ह्मणाला मज सहज धरुनि बाहीं ।**
**तुला कोठेंही बंक अटक नाहीं ॥**
**सकल भुवनें तरि फिरुनि राजगेहीं ।**
**एक नवरी मज योग्य बरी पाहीं ॥ १०८ ॥**

नळ मज सहज बाहीं धरूनी ह्मणाला ‘ तुला कोठेंही बंक अटक नाहीं. तरि सकल भुवनें फिरुनी मज योग्य एक बरी नवरी राजगेहीं पाहीं.’

बाहीं–हातांत किंवा हातानें. बंक–पहारा, चौकी. अटक–अटकाव, मनाई, रोक. भुवनें–लोक ( भुवनें एकंदर १४ आहेत जसें:–मृत्युलोक पाताललोक स्वर्गलोक इत्यादि. ) बरी–चांगली. राजगेहीं–राजाचें गेह घर राजगेह. त्यांत ( षष्ठी तत्पु. ). राजवाड्यांत किंवा राजकुलांत.

व. ति.—**एकांत हाच वदला मज जाण बाळे ।**
**तूं सांग तो वर तुला रुचला रसाळे ॥**
**एणेंपरी परिसतांच तया अनन्या ।**
**ते बोलते चतुर सुंदर राजकन्या ॥ १०९ ॥**

बाळे, ( तो ) मज हाच एकांत वदला ( हें ) जाण ( हे ) रसाळे, तो वर तुला रुचला ( कीं काय तें ) तूं सांग. एणेंपरी परिसतांच ते चतुर ( आणि ) सुंदर राजकन्या तया अनन्या बोलते.

बाळे–लडिवाळपणानें लहान मुलीचें संबोधन. वदला–बोलला. रसाळे–रसज्ञे रसिके, पारखणारे. वर–नवरा. रुचला–आवडला, पसंत आहे. एणेपरी–असें परिसतांच–ऐकतांच. चतुर–हुशार, शहाणी. तया–राजहंसाला. अनन्या–अन्य ह्म० दुसरा कोणी नाहीं ज्याला तो त्यास ( बहुव्री. ).

व. ति.—मी जाण देवनळही स्वकरीं धराया ।
सांगेन काय चतुरा मज लाज जाया ॥
कालें करूनि सुख जोंवरि होय लेखीं ।
हें बोलणें खग मनीं उभयार्थ लेखी ॥ ११० ॥

( अन्वय १ ) कालें करूनि जोंवरी लेखीं सुख होय ( तोंवरी ) देवनळही स्वकरीं धराया ( योग्य आहे असें ) मज लाज जाया ( मला निर्लज्जता प्राप्त होण्याला ) चतुरा मी सांगेन काय ? ( हें ) जाण. ( अर्थ ) कांहीं काळानें जोंपर्यंत नळ मला वरील तोंपर्यंत देवनळही हातीं धरण्याला ह्मणजे लेखद्वारा परस्परांचें मनोगत परस्परांस कळविण्यामध्यें सुख करून घेतलें पाहिजे. मला जास्त बोलण्याला लाज वाटते. तूं चतुर आहेस. तुला आणखी सांगणें नको. ( अन्वय २ ) ( हे ) देवनळ ( नळराजा ) या ( व ) ही ( मी ) स्वकरीं धरा; मी जाण ( जाणती ) मज जाया लाज न काय ? कालें करूनि इत्यादि ( पूर्ववत् ) ( असें ) चतुरा सांग.

( अन्वय ३ रा. ) चतुरा, मज लाज काय ? ( हे ) देवनळ, या ( व ) ही जाया ( स्वस्त्री ह्मणून ) स्वकरीं धरा ( असें ) मी काले करून सांगेन. जाण. ( जोंपर्यंत तो मला वरी ) ( वरील ) तोंवरी लेखीं सुख होय.

( अन्वय ४ ) नळ ( हा ) देवही ह्मणजे देव असला तरी दैवीं लिहिलें असेल त्याप्रमाणें कांहीं काळानें त्याचे प्राप्तिरूप सुख होईपर्यंत मला निर्लज्जता येण्याला मी तो पाणिग्रहण करण्यास योग्य आहें असें सांगेन काय ? तात्पर्य कीं तुला नळ हा वर आवडला कीं नाहीं ह्मणून तूं पूर्वश्लोकांत विचारिलें, तर स्त्रिया अमुक वर आवडला असें कधीं सांगत असतात काय ? असें सांगण्यास त्यांना लाज नाहीं काय ? मिळणारा वर देव असला तरी सांगणार नाहींत; असें उत्तर दिलें. ह्यांत लाजेमुळें सांगत नाहीं पण मनांतून तसें आहे असें सुचविलें. ह्यावरून नळच इष्ट आहे असें दर्शविलें. ( नवनीत नवी आवृत्ति ५ पान ३९६।९७ पहा ).

उभयार्थ–उभय होय किंवा नाहीं ह्या दोनीं प्रकारचा अर्थ आहे ज्याचा तें ( ब. व्री. ), लेखी—लेखलें, समजला. हें......लेखी—दमयंतीच्या ह्या बोलण्याचा होय किंवा नाहीं ह्या दोनी प्रकारचा अर्थ होतो हें हंस समजला.

श्लेषालंकार.

स्रग्विणी—**श्लेष-शब्दें इणें भाव सांगीतला।**
**नैषधाधीश तो नाथ मागीतला ॥**
**होय जाणीयली घे त्रपाकंचुला।**
**हंस बोलावया हालवी चंचुला ॥ १११ ॥**

इणें श्लेषशब्दें भाव सांगीतला ( आणि ) तो नैषधाधीश नाथ मागीतला. ( ही ) त्रपाकंचुला घे ( तरी ) जाणीयली होय. हंस बोलावया चंचुला हालवी.
इणें–हीनें. श्लेषशब्दें–द्व्यर्थी शब्दांनीं. भाव–आपलें मनोगत, आपली इच्छा. नैषधाधीश–नैषध देशाचा अधीश ह्म० स्वामी ( षष्ठी तत्पु. ) ह्म० नळराजा. नाथ–पति, नवरा. त्रपाकंचुला–त्रपा ह्म० लज्जा, लाज. हीच कोणी कंचु ह्म० चिलखत, कवच, त्याप्रत ( क. ). जाणीयली– ओळखलेली, जिचा भाव ( मनो-गत ) ओळखला आहे अशी. चंचुला–चोंचीला. बोला...हालवी–बोलण्यास प्रारंभ करी.

व० ति०—**गांठ्याळ जें हृदय सांद्र न होय ज्याचें।**
**नामेंचि देवनळ कार्य नसे तयाचें ॥**
**धत्तूर हा कनक नाम सदा धरीतो।**
**होईल काय रसिका कनकापरी तो ॥ ११२ ॥**

ज्याचें जें हृदय गांठ्याळ, सांद्र न होय, ( तो ) नामेंच देवनळ. तयाचें कार्य नसे. धत्तूर हा सदा कनक नाम धरीतो ( ह्मणून ) तो रसिका कनकापरी होईल काय ?

ज्याचें—ज्या देवनळाचें. हृदय–( देवनळपक्षीं ) शरीर, ( नळराजा पक्षीं ) अंतःकरण. गांठ्याळ–गांठणीयुक्त ( देवनळपक्षीं ) आंतल्या गांठीचे, कपटी. (नळपक्षीं) सांद्र–रसयुक्त ( oily ) रस निघेल असे पक्षी मृदु कोमल. ( वांस कितीही कुटला तरी त्यांतून रस निघत नाहीं हें प्रसिद्धच आहे ). धत्तूर–धोतरा. कनक–धोतऱ्याचें संस्कृत नांव, ( पक्षीं ) सोनें. रसिका–रसज्ञ. तात्पर्य, देवनळ गांठीचा असतो व कुटला तरी रस निघत नाहीं त्याची उपमा नळाला देऊं नकोस, नळाचें अंतःकरण आंतल्या गांठीचें नसून रसिक व कोमल आहे. ज्याप्रमाणें धोतऱ्याचें नांव कनक असलें तरी तो रसिकाला कनकाप्रमाणें ह्मणजे सोन्याप्रमाणें प्रिय होत नाहीं त्याचप्रमाणें देवनळाचें व नळराजाचें नामसादृश्य असलें तरी नळ सोन्यासारखा

आहे व देवनळ धोतऱ्यासारखा आहे. त्या दोघांची बरोबरी होऊं शकणार नाहीं असा भावार्थ.

अलंकार–श्लेष–चरण १.

**व. ति.—ती बोलते युवति लाज मनीं दडाली ।**
**होती तुवां विघरतां मन ती उडाली ॥**
**आतां वरूं नळवरासि तुला नवाजूं ।**
**गाऊं तुझी स्तुति करूनि कशास लाजूं ॥ ११३ ॥**

ती युवती बोलते ( जी ) लाज मनीं दडाली होती ती तुवां मन विघरतां उडाली. आतां तुझी स्तुति करून तुला नवाजूं ( आणि ) नळवरासि वरूं व गाऊं. लाजूं कशास ?

युवती–तरुणी ( दमयंती ). लाज...होती–जी लाज मनांत लपली होती ती. विघरतां–पाझरवितां कोमल केलें असतां, स्नेहयुक्त केलें असतां. उडाली–निघून गेली, नाहींशी झाली, दूर गेली. नवाजूं–वाखाणूं.

**मालि.—परिसुनि वच ऐसें जें इणें बोलिजेलें ।**
**पतगकुलवतंसें अंतरीं ध्याइजेलें ॥**
**परवशहृदया हे नैषधें राजहंसें ।**
**म्हणुनि समजतां हें बोलिजे राजहंसें ॥ ११४ ॥**

जें ऐसें वच इणें बोलिजेलें ( तें ) परिसुनि पतगकुलवतंसें अंतरीं ध्याइजेलें, हे नैषधें राजहंसें परवशहृदया ( केली आहे ) म्हणूनि समजतां राजहंसें हें बोलिजें.

ऐसें–वर सांगितल्याप्रमाणें. इणें–इजकडून बोलिजेलें, बोलिलें गेलें ( कर्मणी ). पतगकुलवतंसें–पतगाचें ह्म० पक्ष्यांचें जें कुल ह्म० वंश तें पतगकुल. त्यांतील वतंस ह्म० तुरा ( पक्षी–श्रेष्ठ ) त्यानें पतगकुलवतंसें–राजहंसानें. ध्याइजेलें–ध्याइलें. चिंतन–मनन केलें. दमयंती बोलली त्याचा विचार केला. ) हे–ही दमयंती. नैषधें–निषध देशाच्या राजानें नळानें. राजहंसें–राजांतील हंसानें श्रेष्ठानें राजश्रेष्ठानें. परवशहृदया–पराला ह्म० अन्याला जें वश तें परवश. परवश आहे हृदय जीचें ती परवशहृदया. ( बहुव्री. ) हें–पुढें सांगितल्याप्रमाणें.

दिंडी—**जशी रंजलि आहेस निषधभूपीं ॥**
**तसा तोही रंजला तुझ्या रूपीं ॥**
**दैवघटने अन्योन्य व्हाल सोपीं ॥**
**तुह्मी नांदालहि सत्य हें निरोपीं ॥ ११५ ॥**

जशी ( तूं ) निषधभूपीं रंजली आहेस तसा तोही तुझ्या रूपीं रंजला. दैवघटनें तुह्मी अन्योन्य सोपीं व्हाल ( आणि ) नांदालही. हें निरोपीं सत्य.

निषधभूपीं–निषध देशाचा भूप ह्म० राजा त्याचे ठायीं ( षष्ठी. तत्पु. ) रंजली आहेस–तुझें चित्त जडलें आहे. दैवघटनें–दैवाची घटना ती दैवघटना तिनें ह्म० दैवयोगानें. ( षष्ठी. तत्पु. ) अन्योन्य–उभयतां एकमेकांस. परस्परांस. सोपीं व्हाल–सहज साध्य व्हाल. नांदाल–सुखानें संसार कराल. निरोपीं–संदेश. हें...सत्य–मी जो निरोप आणला त्याचा हाच खरा इत्यर्थ आहे. किंवा मी जें हें सांगतों तें सत्य आहे असें निरोपीं म्हणजे पक्कें समज.

अलंकार–आशी. चरण ३।४

दिंडी—**कोण योजावी नोवरी नळाला ।**
**ब्रह्मदेवानें हा विचार केला ॥**
**तुझा नामाक्षर-संघ घेइजेला ।**
**असें भासतसे माझिया मनाला ॥ ११६ ॥**

नळाला कोण नोवरी योजावी हा विचार ( जेव्हां ) ब्रह्मदेवानें केला ( तेव्हां ) तुझा नामाक्षरसंघ घेइजेला असें माझिया मनाला भासतसे.

नोवरी–नवरी, जिचे लग्न व्हावयाचें ती मुलगी येथें बायको या अर्थी उपयोग ब्रह्मदेवानें–( कोणत्या मुलीचें कोणत्या मुलाशीं लग्न व्हावयाचें हें ब्रह्मदेव जन्मकाळींच ठरवीत असून त्याजबद्दल गांठ मारून ठेवीत असतो अशी समज आहे त्यास अनुसरून हें वर्णन आहे. ) नामाक्षरसंघ–नामाच्या अक्षरांचा संघ ह्म० समुदाय. घेइजेला–घेणें या धातुचें कर्मणीरूप भूतकाळ. भासतसे–वाटतें.

मालिनी—**नळरहित वराशीं तूज योजूनि पाहे ।**
**तरि मग विधि ऐसा कोण तो मूढ आहे ॥**
**अचतुर नर तोही जाहल्या जेविता कीं ।**
**सळमिसळ करीना सर्वथा क्षीर-ताकीं ॥ ११७ ॥**

( जरि ) विधि नळरहित वराशीं तूज योजूनि पाहे तरि मग ( त्याच्या ) ऐसा मूढ तो कोण आहे ? ( जो ) अचतुर नर तोही जेवितां जाहल्या सर्वथा क्षीर ताकीं सळमिसळ करीना कीं.

विधि–ब्रह्मदेव. नळरहित–नळाशिवाय अन्य नळराजाहून दुसरा. ऐसा–इतका मूढ–मूर्ख. अचतुर–मूर्ख; चतुर ह्म. शहाणा नाहीं तो अचतुर ( नञ् तत्पु० ) अर्थात् मूढ. जेविता जाहल्या–जेऊं लागला असतां ( जेविता हें धातुसाधित कर्तृवाचक प्रथमांत नाम. कर्ता ' जाहल्या ' या धातुसाधिताचा. ) सळमिसळ करीना–भेसळ करीत नाहीं–मिश्र करीत नाहीं; मिळवीत नाहीं. कीं–( निश्चय बोधक अव्यय ).

अलंकार–काव्यार्थापत्ति.

दिंडी—**कशाला हें बोलणें काय एणें ।**
**तुवां वरिला नळराज तूंहि तेणें ॥**
**सफळ माझें हें एथवरी येणें ।**
**राजकन्ये नीरोप मला देणें ॥ ११८ ॥**

हें बोलणें कशाला ( पाहिजे ) ? एणें काय ( होय ) ? ( कारण ) तुवां नळराज वरिला. तेणें ही तूं ( वरिजेली ) ( ह्मणून ) माझें हें एथवर येणें सफल ( झालें ). ( म्हणून आतां ) राजकन्ये मला निरोप देणें.

हें बोलणें–वर जें आपलें बोलणें झालें तें कशाला–त्याचें काय कारण आहे. अशा या बोलण्यांत व्यर्थ वेळ घालवणें योग्य नाहीं असा भाव. कारण कीं, वरिला–परिणिला. तेणें—त्यानें. तूं–प्रथमांत कर्ता ( वरिजेली ) या क्रियेचा कर्मणी प्रयोग. ( जसें:—जाउनि तो सूत वदे " कृष्णे ! द्यूतांत तूं स्वयें धर्में हारविलीस—" मोरोपंतकृत सभापर्व. ) येणें–धातुसाधित नाम. प्रथमा वि. कर्ता ' झालें ' या अध्याहृत क्रियेचा. निरोप देणें–जावयाची आज्ञा दे.

दिंडी—**चतुर सुंदर तो तरुण निषधराजा ।**
**तुवां राजी केलाच तूं घरा जा ॥**
**धन्य वैदर्भी दैवयोग तूझा ।**
**बोल मानी सत्यार्थ मनीं माझा ॥ ११९ ॥**

तुवां तो चतुर सुंदर तरुण निषधराजा राजी केलाच ( आहेस ). ( आतां ) तूं ( स्वस्थ अंतःकरणानें ) घरा जा. ( हे ) वैदर्भी, तुझा दैवयोग धन्य ( आहे ) ( हा ) माझा बोल मनीं सत्यार्थ मानी.

निषधराजा—निषध देशाचा राजा नळ. राजी केला—अनुकूल करून घेतलाच आहे. वश केला. दैवयोग—दैवाचा योग तो दैवयोग ( षष्ठी तत्पु. ). सत्यार्थ मानीं—सत्याकारणें मानी ह्म० सत्य मान, किंवा सत्य आहे अर्थ ज्याचा असा ह्म० सत्य मान.

दिंडी—**असें जाउनि तूं बोल राजहंसा ।**
**तुझी दासी जाहलें राजहंसा ॥**
**नको चिंता तूं करूं अरिध्वंसा ।**
**ऐक शुभ्रांशूवंशजावतंसा ॥ १२० ॥**

राजहंसा, तूं जाउनी असें बोल ( कीं ) " ( हे ) अरिध्वंसा शुभ्रांशूवंशजावतंसा राजहंसा, ऐक, तूं चिंता करूं नको, ( मी ) तुझी दासी जाहलें. "

दमयंती म्हणतेः—राजहंसा—हे राजहंसपक्ष्या. तूं...बोल—तूं जा आणि नळास असें सांग कीं. अरिध्वंसा—अरींना ह्म० शत्रूंना ध्वंस कर तो तो ह्म० शत्रूंचा नाश करणारा. ( उ. त. ) ( संबोधन ) शुभ्रांशूवंशजवातंसा—शुभ्र पांढरे आहेत अंशु किरण ज्याचे तो ह्म० चंद्र. ( ब. व्री. ) त्याचा जो वंशतो शुभ्रांशुवंश ह्म० चंद्रवंश. चंद्रवंशांत जन्मलेले ते त्यांचा किंवा त्यांत अवतंस ह्म० तुरा ( श्रेष्ठ ) तो शुभ्रांशुवंशजावतंस त्याचें संबोधन. ( ष. किंवा स. त. ). राजहंसा—राजांतला हंस ह्म० ( श्रेष्ठ ) तो राजहंस राजश्रेष्ठ नळराजा. चिंता करूं नको—काळजी करूं नको.

दिंडी—**नको पाहूं तूं नोवरी नळाशी ।**
**मीच भावें होईन सत्य दासी ॥**
**जरी यावें आतांचि तया पाशीं ।**
**गोष्ट भासे विपरीत लौकिकासी ॥ १२१ ॥**

तूं नळासी ( दुसरी ) नवरी पाहूं नको. ( कारण कीं ) मीच ( त्याची ) भावें दासी होईन ( हें ) सत्य ( आहे ). जरी आतांचि तयापाशीं जावें ( तरी, हे ) गोष्ट लौकिकासी विपरीत भासे.

दासी होईन–दासीप्रमाणें आज्ञेंत वागणारी विवाहित बायको होईन ( आदरार्थी बोलण्याचा एक प्रकार ). लौकिकासी...भासे–लोकाचाराचें विरुद्ध दिसतें. बाकीचा अर्थ सरळ आहे.

मालिनी—**करुनि मज रवाना राजसे तूजसाठीं ।**
**नृपति निरखि माझी वाट आरामवाटीं ॥**
**बसवुनि निजपाठीं तूज नेईन तेथें ।**
**परि चुकुर तुझे हे लोक होतील येथें ॥ १२२ ॥**

राजसे, तुजसाठीं मज रवाना करुनि नृपति आरामवाटीं माझी वाट निरखी. ( मी ) तूज निजपाठीं बसवूनि तेथें नेईन, परि येथें हे तुझे लोक चुकुर होतील.

राजसे–हे सुंदरी ( राजस–सुंदर ). रवाना करुनि–पाठवून. आरामवाटीं–आरामा करितां ह्म० विश्रांति करितां जी वाटी ह्म० वृक्षादिकांचा बाग ती ( चतुर्थी तत्पु.). तिजमध्यें ( वाटी अथवा वाटिका ह्म० फुलझाडें इत्यादिकांचा बाग ). चुकुर होतील–घाबरतील. चकित होतील. जसें, तुका म्हणे संग देसी कोण्या काळीं, चुकुर दुर्बळी होतों आह्मी.

व. ति.—**येरीकडे नृपति धाडुनि राजहंसा ।**
**तो बैसला करित आपण तत्प्रशंसा ॥**
**येईल शीघ्र घटना करुनी तियेची ।**
**होईल भेटि मज आज तये प्रियेची ॥ १२३ ॥**

येरीकडे तो नृपति राजहंसा धाडुनि तियेची घटना करुनि ( तो हंस ) शीघ्र येईल ( आणि ) आज तये प्रियेची मज भेट होईल ( असी ) आपण तत्प्रशंसा करित बैसला.

येरीकडे–इकडे. ( एर–इतर. त्यापासून एरीकडे ह्म० दुसऱ्याकडे दुसरें पक्षीं. त्याचा अपभ्रंश येरीकडे. ए च्या जागीं ये चा उपयोग अपभ्रंशानें करण्याचा प्रघात आहे जसें:—येरंड, येरव्हीं, येरझार, येलची, इ० ) धाडुनि–पाठवून. घटना–कोणतें एखादें कार्य साधण्याकरितां जी योजना करितात ती. तियेची घटना करुनी–त्या दमयंतीला मिळविण्याची व्यवस्था करून. तये–त्या. तत्प्रशंसा–त्याची. ( राजहंसाची ) किंवा तिची ( दमयंतीची ) प्रशंसा ती. ( ष. त. )

शा. वि.—**तों चिन्हें शुभ पाहुनी नृप ह्मणे लाभेल लाभावळी ।**
**आला सन्मुख राजहंस निरखी, बाहूयुगें आंवळी ॥**
**बोले मंजुळ वाक्य एथ बसलों त्वत्ध्यान लावूनि रे ।**
**झालें वृत्त समग्र सांगुनि करीं हंसा समाधान रे ॥ १२४ ॥**

शुभ चिन्हें पाहुनी लाभावळी लाभेल ( असें ) नृप ह्मणे तों सन्मुख आला राजहंस निरखी ( त्यास ) बाहूयुगें आंवळी ( आणि ) मंजुळ वाक्य बोले ( कीं ) त्वद्ध्यान लावूनि एथें बसलों रे. रे हंसा, झालें वृत्त समग्र सांगुनि समाधान करीं.

शुभ चिन्हें पाहुनी–शुभ शकुन होतात असें पाहून. लाभावळी–लाभाची आवली ह्म. पंक्ति अर्थात् एकाहून अनेक लाभ ( षष्ठी तत्पु. ) लाभेल–मिळेल प्राप्त होईल. ह्मणे–ह्मणत आहे. सन्मुख–तोंडासमोर. आला–आलेला. निरखी–पाही. बाहूयुगें–दोन्ही हातांनीं, आंवळी–दोनी हातानें त्यांस गाढालिंगन देई ( आलिंगन देणें हें प्रेमातिशयाचें एक लक्षण आहे. ) त्वद्ध्यान–त्वत् ह्म. तुझें ध्यान तें त्वद्ध्यान. लावून बसलों–तुझेंच चिंतन करीत वाट पहात बसलों ( यापासून राजहंसानें कार्य सफल करून परत यावें अशाबद्दलची नळराजाची उत्कंठा व्यक्त होते. कारण ज्या वस्तुच्या प्राप्तीची उत्कंठा असते त्या वस्तूकडे ध्यान लावून मनुष्य वाट पाहत बसत असतो ) समग्र–( सम्+अग्र शेवट ) सर्व.

दिंडी—**काय वदली तुजसवें हंसराया ।**
**मान्य झाली कीं ती मला वराया ॥**
**कधीं भेटे ती निजकरीं धराया ।**
**विरह-बाधा मज नये आंवराया ॥ १२५ ॥**

हंसराया, ती तुज सवें काय वदली ? मला वराया मान्य झाली कीं ? ती निजकरीं धराया कधीं भेटे ? मज विरहबाधा आंवराया नये.

निजकरीं=निज ह्म. आपला स्वतःचा कर ह्म. हात तो त्यांत. निजकरीं धराया–गाढालिंगन द्यावयास. विरहबाधा–विरहाची बाधा ती ( षष्ठी तत्पु. ) विरहबाधा–विरह वियोग त्याची बाधा ताप; दुःख.

दिंडी—**हंस बोले नृपराज सुगुणसारा ।**
**माळ घालीते ती तुला उदारा ॥**

**तुझ्या ध्यानीं संलग्न जे विचारा ।**
**सत्य मानी ती होय तुझी दारा ॥ १२६ ॥**

हंस बोले "( हे ) सुगुणसारा, उदारा, नृपराज, ती तुला माळ घालीते. जे तुझ्या ध्यानीं विचारा संलग्न ती तुझी दारा होय ( हें ) सत्य मानी.

सुगुण सारा–सुगुण–चांगले गुण सद्गुण. सुगुणाचें सार ह्म. तत्व अर्क, त्याप्रमाणें जो तो त्याचें संबोधन किंवा सुगुणांत सार ह्म श्रेष्ठ जो तो ( सप्तमी तत्पु. ) दारा–बायको ( मुळचा संस्कृत शब्द पुल्लिंग असून सदा अनेकवचनी चालतो. परंतु येथें कवीनें मराठीच्या प्रघातास अनुसरून स्त्रीलिंग एकवचनी प्रयोग केला. मोरोपंत आपल्या काव्यांत संस्कृत शब्दाचें लिंग वचन संस्कृताप्रमाणेंच कायम ठेवितात. ) तुझ्या...विचारा—जी तुझ्या मनांतील विचारांशीं संलग्न झालेली आहे म्हणजे तूं जिचें चिंतन करतों आहेस ती.

दिंडी—**जाइ नगरा तूं नृपा कृपाराशी ।**
**पत्र येतांची जा स्वयंवरासी ॥**
**स्वयें ये ते चालूनि मंदिरासी ।**
**फार वदणें नलगे सुखोत्करासी ॥ १२७ ॥**

( हे ) कृपाराशी नृपा, तूं नगरा जाई, ( आणि ) पत्र येतांची स्वयंवरासी जा. ते स्वयें चालून मंदिरासी ये. सुखोत्करासी फार वदणें नलगे.

कृपाराशी–कृपेचा ह्म. करुणेचा राशी ह्म. समूह संग्रह सांठा ( षष्ठी तत्पु. ) नृपा–नृला ह्म. मनुष्यांनां प ह्म. पाळीतो ( पा संरक्षणें ) तो ( उपपद समास ). स्वयंवर–नवऱ्यामुलीनें ( जिचें लग्न व्हावयाचें त्या मुलीनें आपल्या मनास येईल तो वर वरावा किंवा पराक्रमादिपरीक्षार्थ वडिलांनीं केलेला पण जो जिंकील त्यास वरावें अशा संकेतानें कन्येचा विवाह करतात त्याला स्वयंवर म्हणतात ). स्वयें चालून–अनायासें आपण होऊन. ये–येईल. सुखोत्करासी–सुखाचा उत्कर ह्म. राशी पुंज संग्रह इ. त्यास.

दिंडी—**बरें येतों बोलोनि पाय हातें ।**
**नमुनि चाले सप्रेम तो गृहातें ॥**
**नृप निघे तैं सहचमू निजपुरातें ।**
**हंस वचनीं लावुनी अंतरातें ॥ १२८ ॥**

तो " बरें, येतों " ( असें ) बोलोनि, हातें पाय सप्रेम नमुनि, हंसानें चाले. तैं नृप हंसवचनीं अंतरातें लावुनी सहचमू निजपुरातें ( जाया ) निघे.

बरें येतों—हा शब्दप्रयोग प्रायः जाणारा इसम इष्टमित्रांस किंवा ज्यांस तो भेटण्यास आला असेल त्याचा निरोप घेते वेळेस करीत असतो. त्यावरून त्याचा अर्थ " बरें आह्मी आतां जातों तुमची परवानगी असावी असा होतो. सप्रेम—प्रेमासहित, प्रेमानें. हातें...नमुनि-प्रेमानें पायाला हात लावून नमस्कार करून. ( अशा करण्यानें पूज्यभाव व्यक्त होतो. ) सहचमू—चमूसहित जो तो ( तृतीया तत्पु. ). हंसवचनीं-हंसाचें वचन तें त्याचेठायीं—अंतरातें. मनातें.

दिंडी—**जनकतनयेशीं पवनतनयसा तो ।**
**वदुनि वेगीं उड्डाण नभीं घेतो ॥**
**नलापाशीं वृत्तांत निवेदी तो ।**
**स्वधामातें पावोनि सुखी होतो ॥ १२९ ॥**

जनकतनयेसीं पवनतनयसा तो ( हंस असें ) वदुनी नभीं वेगीं उड्डाण घेतो ( आणि ) नळापाशीं तो वृत्तांत निवेदी, ( नंतर, स्वधामातें पावोनी सुखी होतो.

जनकतनयेसीं—जनकाची ह्म० जनकराजाची जी तनया ह्म० मुलगी ती तिला सीतेला पवनतनयसा—पवनाचा ह्म० वायूचा तनय ह्म० मुलगा तो त्यासारखा ह्म. हनुमंतासारखा. जसा सीतेला मारुती त्याप्रमाणेंच दमयंतीला असलेला तो राजहंस. वदुनी—वर सांगितल्याप्रमाणें बोलून. निवेदी—सांगता झाला, सांगितला. वेगीं—जोरानें. उड्डाण घेतो—झेप घातली. स्वधामा—आपल्याघरीं. पावोनि—पोंचून. मारुतीनें रामाचा निरोप सीतेला सांगितला तसा नळाचा निरोप हंसानें दमयंतीला सांगितला व नंतर तिचें वृत्त परत नळाला कळवून तो आपल्या घरीं गेला ह्मा भावार्थ. ह्मा श्लोकानें वरील वृत्तांताचा कवीनें समारोपसा केला आहे.

दिंडी—**असो ऐसीहे कथा सौरसाची ।**
**श्रवण कारितां बहु गोड गमे साची ॥**
**धन्य लीला त्या ऐक नैषधाची ।**
**प्रकट वाणी रघुनाथ-पंडिताची ॥ १३० ॥**

असो, हे सौरसाची ऐसी कथा श्रवण कारितां साची बहु गोड गमे. त्या नैषधाची धन्य लीला रघुनाथपंडिताची वाणी प्रकट ( करी, ती ) ऐक.

सौरसाची—सौरस ह्म० प्रीति, स्नेह त्याची. साची—खरोखर. लीला—चरित्र रघुनाथ...प्रकट ( करी )—रघुनाथ पंडितानें आपल्या काव्यांत वर्णन करून सांगितली आहे ती. ( सदरच्या पद्यांतील बोलणें कवीचें श्रोत्यास किंवा वाचकास उद्देशून आहे. )

दिंडी—**असो आल्या इजजवळि सख्या वेशा ।**
**बोलती त्या मग तीस सकळ केशा ॥**
**हंस धरुनी परिपूर्ण तुझी आशा ।**
**काय गेला तो उडुनि गगनदेशा ॥ १३१ ॥**

असो. ऐशा सख्या इजजवळिं आल्या ( आणि ) मग त्या सकल तीस केशा बोलती ( कीं ) हंस धरुनी तुझी आशा परिपूर्ण ( झालीना )? ( किंवा ) तो उडुनि गगन—देशा गेला काय ?

असो—पुरे, ही गोष्ट इतकीच राहूं द्या. ( हें कवीचें वाक्य आहे. ). गगन-देशा—गगन हाच देश त्याप्रत ( क. ) आकाशांत. आशा—इच्छा.

मालिनी—**धरुनि कर सखीनीं सौधशाळेंत नेली ।**
**खग-वचन-मधूनें जे मनीं मोहिजेली ॥**
**नळविरहभरानें पोळली गुप्तरूपें ।**
**नवल कनकसी ते गौरही तप्तरूपें ॥ १३२ ॥**

जे खगवचनमधूनें मनीं मोहिजेली, नळ—विरहभरानें गुप्तरूपें पोळली ( ते ) सखीनीं कर धरुनि सौधशाळेंत नेली. कनकसी ते तप्तरूपें ही गौर ( राहिली हें ) नवल.

खगवचनमधूनें—खगाचें वचन तें खगवचन. तेंच कोणी मधू ह्म० मद्य. त्यानें ( कर्मधारय. ) मोहिजेली—प्रेम उत्पन्न झालेली; पक्षीं, भ्रमिष्ट झालेली. ह्मणूनच तिला सखींनीं हातानें धरून नेण्याची आवश्यकता. नळविरहभरानें—नळाच्या विरहाचा जो भर त्यानें. सौधशालेंत—सौध ह्म० राजवाडा हाच शाला ह्म० घर. राजवाड्यांत. गुप्तरूपें—गुप्तपणें, आंतल्या आंत. मनांतल्या मनांत. तप्तरूपें—तप्त ह्म० तापलेलें असें जें रूप ह्म० आकार, सौंदर्य इ० त्यानें. कनकसी... नवल—सोनें तापवलें ह्मणजे लाल होतें. परंतु दमयंती सुवर्णवर्ण असतांही,

नळविरहाग्नीनें तापली तेव्हां लाल न होतां गौर ह्मणजे पांढरी झाली हें आश्चर्य. नळविरहानें ती पांढरी फिकट पडली हा भावार्थ.

रूपक—चरण २. उपमा–चरण ३।४.

शिख.—**न रंजे कारंजें निरखुनि फणीतें फणफणी ।**
**मुदेनें मोदेना नलगुणगणीं जे गुणगुणी ॥**
**न बैसे जे सेजेवरि न परिसे जे शुकगिरा ।**
**न नाहे माना हे न धरि ललना हेतु दुसरा ॥ १३३ ॥**

( जे असी फणफणी जणुं ) फणीतें निरखुनि फणफणी ( ते ) कारंजें न रंजे. जे नलगुणगणी गुणगुणी ( ते ) मुदेनें मोदेना. जे सेजेवरि न बैसे, जे शुकगिरा न परिसे, न नाहे, ( ते ) हे ललना दुसरा हेतु न धरी ( हें ) माना.

फणफणी–फणफण करते ( फणफणणें–रागानें किंवा दुःखानें मोठमोठ्यानें श्वास सोडणें. अनुकरणवाचक शब्द ). फणीतें–फणा आहे ज्याला तो ह्म० सर्प. सर्पाला पाहून जसा कोणी सुस्कारे टाकतो त्याप्रमाणें सुस्कारे टाकणारी दमयंती. कारंजें–पाणी उंच उडण्याकरितां एका उंच जागेवर पाण्याचा हौद करून, किंवा एखादा आयता उंच पाण्याचा संचय पाहून त्याला नळ वगैरे लावून विवक्षित स्थळी पाणी आपले इच्छेप्रमाणें वर उंच उडेल असी केलेली हौद इ. कांची रचना-विशेष ती तें. ( नपुंसकलिंग त्याचे तृतीयेचें ए. व. )—कारंज्यानें. न रंजे-चित्ताची करमणूक होत नाहीं. नलगुणगणीं–नलाचे जे गुण त्यांचे गण ह्म० अनेक गुण त्यांचे ठायीं. ( ष. त. ) गुणगुणी–गुणगुण करते. स्पष्टोच्चार न होई असें बोलते. जे नल...गुणी—जी नलाचे गुण स्पष्टोच्चार न होई असे रितीनें मनांतल्या मनांत बडबडते. मुदेनें–मुद ह्म० बायकांचा वेणींत घालावयाचा सोन्याचा मोदकाच्या आकाराचा अलंकारविशेष त्यानें. सेजेवरी–बिछान्यावर. शुकगिरा-शुकाची ह्म० पोपटाची गिरा ह्म० भाषण ती तिजप्रत. न परिसे–ऐकत नाहीं. न नाहे–जी न्हात नाहीं. दुसरा हेतु–( नलाशिवाय ) अन्य इच्छा. उपमा–चरण १

मालिनी—**गजबज बहु झाली माय धावोनि आली ।**
**धरुनि हृदय-देशीं तीजला सेज केली ॥**

**करिति विझणवारे त्या सख्या वेगळाल्या ।**
**वडिल वडिल दाया जाणत्याही मिळाल्या ॥ १३४ ॥**

गजबज बहु झाली, माय धावोनि आली ( आणि ) तिजला हृदयदेशीं धरुनि सेज केली. त्या सख्या वेगळाल्या विझणवारे करिती. ( आणि ) जाणत्या वडिल वडिल दायाही मिळाल्या.

गजबज बहु झाली–चोहिंकडे फार गडबड उडाली. माय–आई ( दमयंतीची ) हृदयदेशीं–हृदयाचा किंवा हृदय हाच देश तो हृदयदेश. सेज केली–निजविलें. हृदयदेशीं...केली–पोटासी धरून आपल्या छातीवर तिचें डोकें टेकून निजविलें ( अशा रितीनें प्रेमातिशय दाखविला जातो ). वेगळाल्या–एक एक निरनिराळी. विझणवारे–विझणाचे वारे ते विझणवारे. विझणा म्ह० पंखा. जाणत्या–औषधोपचार करण्यांत कुशल अशा. वडिल–वृद्ध. वडिल वडिल अशा द्विरुक्तीनें तरुण दायाचा निषेध दाखविला गेला आहे.

गीति—**ते शीतलोपचारीं जागी झाली हळूंच मग बोले ।**
**औषध न लगे मजला परिसुनि जननी बरें ह्मणुनि डोले १३५**

शीतलोपचारीं ते जागी झाली ( आणि ) मग हळूंच 'मजला औषध न लगे' ( पक्षी, 'गे मजला औषध नल' ) ( असें ) बोले ( ते ) परिसुनि जननी 'बरें' ह्मणुनि डोले.

शीतलोपचारीं–शीतल ह्म. थंड असे जे उपचार ते त्यांहीं ( तृतीयेचें अनेक वचन ). मजला औषध नलगे–मला औषध नको हा साधारण अर्थ परंतु श्लेषार्थ माझ्या ह्या दुखण्याचें खरें औषध तुह्मी करतां आहांत हे उपचार नसून केवळ नलराजाच आहे असें समजा. हे दमयंतीचे दोनी अर्थ जननी समजली व म्हणून 'बरें' म्हणून डोलूं लागली व लागलीच दुसरे दिवसापासून तिनें तिच्या स्वयंवराची तजवीज सुरू केली.

श्लेषालंकार.

दिंडी—**मूल उपवर हे जाहली इयेला ।**
**पाहिजे कीं वर योग्य पाहिजेला ॥**

**असें ऐकोनि वधूचिया बोला ।**
**सैंवराचा मग यत्न नृपें केला ॥ १३६ ॥**

हे मूल उपवर जाहली, इयेला योग्य वर पाहिजेला पाहिजे कीं, असें वधूचिया बोला ऐकोनि मग नृपें सैंवराचा यत्न केला.

हे मूल–ही मुलगी. उपवर–वरायोग्य, लग्नाजोगी. लग्न करण्यास योग्य. इयेला–हिला. पाहिजेला–पाहिला. वधूचिया बोला–बायकोचें बोलणें. ( अर्थात् दमयंतीची आई ती राजाची बायको होय. ) सैंवराचा–स्वयंवराचा ( अपभ्रंश )

दिंडी—**नगर सारें शृंगारविलें तैसें ॥**
**भूमिलोकीं वैकुंठ दिसे जैसें ॥**
**लिखित पाठविलें सकळ नृपा कैसें ॥**
**तुह्मी यावें जी स्वयंवरा ऐसें ॥ १३७ ॥**

जैसें भूमिलोकीं वैकुंठ दिसे तैसें सारें नगर शृंगारविलें ( आणि ) सकळ नृपा कैसें लिखित पाठविलें ( कीं ) " जी, तुह्मी स्वयंवरा यावें " ऐसें

भूमिलोकीं–मृत्युलोकीं. पृथ्वीवर. वैकुंठ–श्रीविष्णूचें रहाण्याचें; ठिकाण तें अत्यंत सुंदर असल्याची प्रसिद्धी आहे. सारें–सगळें. लिखित पाठविलें–पत्रिका लिहून पाठविल्या, पत्रें पाठविलीं.

उपमा–चरण १।२.

दिंडी—**निषधराजासी लिखित पाठवीतो ॥**
**प्रतिद्वीपीं भूपतिसही लिहीतो ॥**
**अशा यत्नीं लागला नृप अहो तो ॥**
**पुढें परिसा वृत्तांत कसा होतो ॥ १३८ ॥**

तो निषध राजासी लिखित पाठवीतो प्रतिद्वीपीं भूपतिसही लिहीतो. अहो, तो नृप अशा यत्नीं लागला. पुढें कैसा वृत्तांत होतो ( तो ) परिसा.

निषधराजासी–नळराजाला. प्रतिद्वीपीं–द्वीप द्वीप तें-प्रति-द्वीप. त्यांत (अव्ययीभाव समास). ह्म० झाडून सर्व द्वीपांत. द्वीप–खंड. बेट. ( ज्या पृथ्वीच्या भागाला चोंहीकडून पाणी आहे असा पृथ्वीचा पृष्ठभाग असा मूळचा द्वीप या

शब्दाचा अर्थ आहे परंतु तो अर्थ विविक्षित नसून साधारणपणें ‘ देश ’ असा अर्थ विविक्षित आहे. ) The word is applied particularly to the seven grand divisions of the earth, each being surrounded by a sea; and the central division जंबु or the known continent is again portioned into ten divisions. वृत्तांत—हकीकत. परिसा—ऐका.

दिंडी—**ऋषि नारद असतां नभोविहारी ।**
**वैजयंती ज्या दिसे मनोहारी ॥**
**मणी रमणीय कनक कलश भारी ।**
**सुरपतिचा जो सौध महाभारी ॥ १३९ ॥**

नारद ऋषि नभोविहारी असतां ज्या भारी रमणीय मणी कनककलश ( असा ) जो मनोहारी महाभारी सुरपतिचा वैजयंती सौध ( तो नारदास ) दिसे.

नारद ऋषि—ब्रह्मदेवाच्या दहा मानसपुत्रांपैकीं पहिला. हा मोठा भगवद्भक्त असून सदोदित फिरत रहाणारा आहे. त्याचें गमन स्वर्ग, मृत्यु, पाताल या तिन्ही लोकीं असून सर्व ठिकाणीं त्याचें अत्यंत आदरातिथ्य होतें. याचा धंदा देवदानवांत आपसांत कलागती लावण्याचा. परंतु त्या भांडणापासून जगाचें काहींतरी कल्याणच होत असतें. ( वगैरे वगैरे ) वर्णन पुराणांतरीं आहे. नभोविहारी—आकाशांत संचार करणारा, नभाचे ठायीं आहे विहार ज्याचा तो ( बहु. स. ) भारी—अत्यंत. मणी—रत्नें. कनककलश—सोन्याचा कळस. महाभारी—मोठा. सौध—राजवाडा. वैजयंती—हें इंद्राच्या वाड्याचें नांव; ‘ स्यात्प्रसादो वैजयंतो ’ इति अमरः सुरपतिचा—इंद्राचा.

दिंडी—**तया प्रासादीं जाय ऋषी पाहे ॥**
**सभा केली देवेंद्र बैसलाहे ॥**
**फार आदरिलें तया देवरायें ।**
**अर्घ्यपाद्यादिक करूनि विनतकायें ॥ १४० ॥**

ऋषी तया प्रासादीं जाय ( आणि ) पाहे ( कीं ) सभा केली ( आहे ) देवेंद्र बैसलाहे. देवरायें विनतकायें अर्घ्यपाद्यादिक करूनी तया फार आदरिलें.

ऋषी—नारद मुनि. तया प्रासादीं—त्या प्रासादांत प्रासाद ह्म० मोठा वाडा, राजवाडा. देवेंद्र—देवांचा इंद्र ह्म० स्वामी तो ह्म० इंद्रराजा. देवरायें—इंद्रानें, विनतकायें—विनत ह्म० नम्र असी काया ह्म० शरीर तिनें—( कर्मधारय. ) करणी तृतीया. आपलें शरीर नम्र करून. किंवा देवरायें याचें विशेषण केलें तर विनत असी आहे काया ज्याची त्यानें विनतकायें ( बहुव्री. ) अर्घ्यपाद्यादिक—अर्घ्य आणि पाद्य आदिकरून जें तें अर्घ्यपाद्यादिक ( समाहार द्वंद्व ) थोर पुरुष घरीं आलें असतां त्यांचे पाय धुणें व त्यांस तांदूळ फुलें वगैरे. समर्पण करणें यांस अनुक्रमें पाद्य व अर्घ्य करणें ह्मणतात. आदरिलें—गौरव केला, अत्यंत सन्मान केला.

भु. प्र.—**समुद्रोद्भवा अप्सरा साठ कोटी ।**
**जयांची द्युती ते रतीलाहि लोटी ॥**
**विधीनें तशा त्या तुळूं पाहिजेल्या ।**
**जियेशीं हळू जाहल्या उंच गेल्या ॥ १४१ ॥**

( नारद म्हणतात. ) जयांची ते द्युति रतीलाहि लोटी तशा त्या समुद्रोद्भवा साठ कोटी अप्सरा ( तियेशीं ) तुळूं पाहिजेल्या त्या जियेशीं हळू जाहल्या आणि उंच गेल्या.

जयांची—ज्या अप्सरांची. द्युति—शोभा, कांति, रूप रतीला—मदनाच्या बायकोला देखील ( मदन स्वतः अत्यंत सुंदर व रति त्याची बायको ही अत्यंत सुंदर अशी प्रसिद्धी आहे. म्हणून सौंदर्याची तुलना करावयाची असल्यास पुरुषाची मदनाशीं व स्त्रियांची रतीशीं तुलना करण्याचा प्रघात आहे ). लोटी—दूर सारिते. फिकी पाडते. समुद्रोद्भवा—समुद्रापासून आहे उद्भव ह्म० जन्म ज्यांचा त्या ( बहुव्री. ) समुद्रमंथनाच्या वेळीं ह्या समुद्रांतून उत्पन्न झाल्या अशी पौराणिक कथा आहे. अप्सरा—स्वर्गांतील इंद्राच्या सभेंत नृत्यगायनादि करणाऱ्या स्त्रिया. ( यांची सौंदर्याविषयीं अत्यंत ख्याति आहे ) जियेशीं—ज्या दमयंतीशीं. हळू—हलक्या. उंच गेल्या—स्वर्गीं गेल्या. तराजूंत कोणताही पदार्थ तोलला असतां हलका पदार्थ असलेलें पारडें वर जातें व वजनदार पारडें खालीं बसतें हें प्रसिद्धच आहे. खालीं बसणाऱ्या पारड्यांतील रकमचें महत्व दाखविलें जातें. दमयंती पृथ्वीवर व अप्सरा स्वर्गात आहेत. नारद ह्मणतात त्याचें कारण असें आहे

कीं कोणाचें रूप जास्त चांगलें हें पाहण्यासाठीं ब्रह्मदेवानें एका पारड्यांत दमयंती व दुसऱ्यांत सर्व अप्सरा घालून तोललें. तों अप्सरा अगदीं हलक्या ठरून वर गेल्या व दमयंती जड ह्म० जास्त रूपवती म्हणून खालीं राहिली ! !

व्यतिरेक आणि संबंधातिशयोक्ति अलंकार.

मालिनी—**उपवर दमयंती जाहली नोवरी ते ।**
**कवण वर कळेना हे जयातें वरीते ॥**
**दृढतरनिजलज्जागव्हरीं गुप्त केला ।**
**जिवलगहि सखीला जो नसे सांगिजेला ॥ १४२ ॥**

ते दमयंती उपवर नोवरी जाहली. जो दृढतर-निजलज्जा–गव्हरीं गुप्त केला ( व ) जिवलग सखीलाही सांगिजेला नसे ( आणि ) जयातें हे वरीते, ( असा ) कवण वर ( आहे, हें ) कळेना.

उपवर नोवरी—लग्नाला योग्य जाहलेली मुलगी. दृढतरनिजलज्जागव्हरीं—दृढतर अत्यंत कठिण ( न फुटण्यासारखी टणक ) अशी जी निज—आपली—लज्जा—लाज हेंच कोणी एक गव्हर—गुहा, तींत. गुप्त केला—लपवून ठेविला आहे. जिवलग—अत्यंत प्रिय आणि विश्वासू. सखी—मैत्रीण. सांगिजेला नसे—सांगितला नाहीं, कळविला नाहीं. दमयंतीला अत्यंत लाज असल्यानें तिनें आपणांस पसंत असलेल्या वराचें नांव अत्यंत प्रियसखीलाही सांगितलेलें नाहीं हा भाव. वर=नवरा.

रूपक—चरण ३.

दिंडी—**नवे तरणे नृप-मुख्य तीजसाठीं ।**
**मोहिले ते करिताति यत्न कोटी ॥**
**कलह-वार्ताही मानिताति पोटीं ।**
**तया युवतीची आस तयां मोठी ॥ १४३ ॥**

मोहिले ते नवे तरणे नृपमुख्य तीजसाठीं कोटि यत्न करिताति, पोटीं कलह-वार्ताही मानिताति. तयां तया युवतीची मोठी आस ( आहे ).

मोहिले—लुब्ध झालेले, मोह पावलेले, तिच्या स्वरूपावर भाळलेले. नृप-मुख्य—नृपांतले मुख्य ते नृपमुख्य ( सप्तमीतत्पु. ) ह्म. मुख्य मुख्य राजे. तीज-

साठीं—दमयंती मिळावी ह्मणून, दमयंतीशीं आपणास लग्न लावतां यावें ह्मणून. कोटि यत्न करिताति—कोट्यावधि प्रयत्न करित आहेत. पोटीं....मानिताति —काम पडल्यास वेळेवर लढाई करण्याचेंही त्यांचे मनांत घाटत आहे. वेळेवर लढाई करण्याचें काम पडल्यास ती देखील करूं पण दमयंतीला दुसऱ्याशीं लग्न लावूं देणार नाहीं असा निश्चय मनांत करितात. आस—आशा. तयां—त्या नृपांना. तया—त्या ( युवतीची ).

दिंडी—**असें नारद बोलोनि तो निघाला ।**
**जाय हृदयाशीं मानल्या स्थळाला ॥**
**थोर चिंता मग होय सुरेंद्राला ।**
**ह्मणे कैसी ते वरिल आपणाला ॥ १४४ ॥**

तो नारद असें बोलोनि निघाला ( आणि ) हृदयाशीं मानिल्या स्थळाला जाय. मग सुरेंद्राला थोर चिंता होय ( आणि ) ह्मणे ( कीं ) ते आपणाला कैसी वरील.

तो नारद—पूर्वीं सांगितलेला, प्रसिद्ध असा नारदमुनि. हृदयासीं मानल्या—आपल्या हृदयाला आवडलेल्या; इच्छित; सुरेंद्राला—सुरांचा देवांचा इंद्र ह्म० राजा तो सुरेंद्र—इंद्रराजा. थोर चिंता—मोठी काळजी. होय—लागली. ते—दमयंती.

दिंडी—**वरुण, पावक, यम, इंद्र हे मिळाले ।**
**असे चौघेहि रथारूढ झाले ॥**
**महीलोकाशीं यावया निघाले ।**
**तया कुंडिननगरासमीप आले ॥ १४५ ॥**

वरुण, पावक, यम, इंद्र हे मिळाले ( व ) असे चौघेहि रथारूढ झाले. महीलोकासीं यावया निघाले. तया कुंडिननगरासमीप आले.

वरुण—वरुण हा पश्चिमदिशेचा अधिपति असून सर्व प्रकारच्या नद्या, समुद्र इत्यादि जलाशयांचा राजा असल्याचें पुराणांतरीं वर्णन आहे.

पावक—अग्नि. हा आग्नेय दिशेचा अधिपति असून देवांचें मुख आहे व याच्या द्वारें यज्ञयागांत आपआपल्या नांवानें दिलेले बली देव ग्रहण करितात असें वर्णन आहे.

यम—हा दक्षिण दिशेचा अधिपति असून पितृलोकांचाही अधिपति ह्म. राजा आहे. पृथ्वीवर मृत्यु पावलेले सर्व प्राणी यमाकडेस जाऊन तेथें पापपुण्याचा न्याय होऊन ज्याचें जसें पाप किंवा पुण्य असेल त्याप्रमाणें त्यास तेथें फल भो-गावें लागतें अशी पौराणिक कथा आहे.

इंद्र—हा पूर्वदिशेचा अधिपति असून सर्व देवांचा राजा आहे. हे चौघेही दमयंतीनें आपणास वरावें असें मनांतून इच्छित होते. ह्मणून चौघेही बरोबरच स्वर्गांहून मृत्युलोकास येण्याकरितां निघाले.

रथारूढ—रथावर आरूढ ह्म० चढून बसलेले ते रथारूढ. महीलोकाशीं—पृथ्वीवर, मृत्युलोकीं. तया—त्या, दमयंती राहत असलेल्या.

द्रु. वि.—**तंव तया चवघांस तया पथीं ।**
**निषध-नायक येत दिसे रथीं ॥**
**तरुण सुंदर जो चतुराग्रणी ।**
**अतुल-वैभव-राज-शिरोमणि ॥ १४६ ॥**

तंव तया पथीं तया चवघांस जो चतुराग्रणी तरुण सुंदर ( आणि ) अतुल-वैभव—राज—शिरोमणी ( तो ) निषध नायक रथीं येत ( आहे असा ) दिसे.

तंव—तोंच. तया पथीं—त्या मार्गांत. चतुराग्रणी—चतुरांचा ह्म० चतुर हुशार अशा पुरुषांचा अग्रणी ह्म० मुख्य तो ( षष्ठी तत्पु. ) अतुल—वैभव—राज—शिरोमणी—अतुल ह्म० तुलना करण्यास अशक्य असें, निरुपम असें जें वैभव त्याचा आणि राजांचा शिरोमणी ह्म० मुख्य तो. ( शिरोमणी—शिरावर ठेवण्याचा मणी ह्म० रत्न, लक्षणेनें श्रेष्ठ; ) निषधनायक—नळराजा. रथीं येत—रथावर बसून येत असलेला.

मालिनी—**निरखुनि निषधेंद्रा इंद्र तो बोलताहे ।**
**युवति उभयताही लभ्य आह्मांसि नोहे ॥**
**वरिल जरि नळाला ते तया लाभली जे ।**
**न वरि तरि अह्मांसी मूढते काय कीजे ॥ १४७ ॥**

निषधेंद्रा निरखुनि तो इंद्र बोलताहे ( कीं ) युवती आह्मांसी उभयताही, लभ्य नोहे. ( कारण कीं ) जरि ते नळाला वरिल ( तरि ) तया लाभली. ( आणि ) जे न वरी तरि ते मूढ आह्मांसी काय कीजे.

निरखुनि—पाहुनि. युवती—तरुणी. उभयताहि—उभय पक्षीं. दोनीकडून. लभ्य-नोहे—लभ्य नाही मिळत नाहीं. मूढ—मूर्ख. आह्मांसी काय कीजे—आह्मांला काय करावयाची आहे. नळाचें अत्यंत सुंदर रूप पाहून इंद्र म्हणाला कीं ह्याचें रूप पाहून दमयंती यालाच वरील; तसें झालें तर ती आम्हांस लभ्य नाहीच. बरें कदाचित् तिनें याला न वरिलें तर तिच्यासारखी वेडी तीच. तेव्हां त्या वेडीला घेण्यांत तरी आम्हाला कोणता उपयोग ? मिळून दोनी पक्षीं दमयंती आतां आम्हांला मिळत नाहीं.

शिख:—**नळातें पाचारी सुरपति विचारी कुशल तो ।**
**ह्मणे आह्मांपाशीं तव गुरु विलासी निवसतो ॥**
**खुणा ज्या ज्या त्याच्या तुजजवळि त्या त्या निरखितों ।**
**खरा तूं तद्वंशी म्हणउनि तदंशी समजतो ॥ १४८ ॥**

तो कुशल ( आणि ) विचारी सुरपति नळातें पाचारी ( आणि ) ह्मणे कीं "विलासी तव गुरु आह्मांपाशीं निवसतो. त्याच्या ज्या ज्या खुणा ( आहेत ) त्या त्या ( आह्मी ) तुजजवळिं निरखितों. तूं खरा तद्वंशी ( आहेस ) म्हणउनि तदंशी समजतों." *

कुशल—शाहाणा. विचारी—विचार करून काम करणारा; विचारवंत. सुरपति सुरांचा पति तो ( षष्ठी तत्पु. ) पाचारी—बोलावी; हांक मारून जवळ बोलावी. विलासी—विलास करण्याचा हौसी. गुरु—पिता, बाप. निवसतो—रहातो. निरखितों—पहातों. खरा तद्वंशी—खरोखर त्याच्या वंशांत जन्मलेला ( त्याच्या वंशाला शोभणारा. त्याच्या वंशात जसे पुरुष जन्मावयास पाहिजेत तसाच. ) ह्मणवूनि ह्मणून, यासाठीं; यावरून. तदंशी—त्याच्या अंशाचा ह्म० त्याच्याच अंशानें जन्मलेला. त्याचा मुलगा, पुत्र ( पुत्र आपल्या बापाच्या अंशानें जन्म पावतो हें प्रसिद्धच आहे. )

---

* किंवा तो सुरपति नळातें पाचारी, कुशल विचारी ( आणि ) ह्मणे ( कीं ) "विलासी तव गुरु इत्यादि" येथें. कुशल विचारी ह्म० क्षेम समाचार पुसे.

व. ति.—**तो वन्हि, तो वरुण, तो यम, इंद्र गा मी।**
**झालों तुला सकळ हे विदित स्वनामीं ॥**
**बोले महीरमण हा नळ चंद्रवंशी।**
**वंदी पदास तुमच्या तुमचाच अंशी ॥ १४९ ॥**

गा, तो वन्हि, ( आहे ) तो वरुण ( आहे ) तो यम ( आहे ) आणि मी इंद्र ( आहें ). हे ( आह्मी ) सकळ तुला स्वनामीं विदित झालों. महीरमण बोले " हा चंद्रवंशी नळ तुमचाच अंशी ( असून ) तुमच्या पदास वंदी.

वन्ही—अग्नि. स्वनामीं—आपआपल्या नांवानें. विदित झालों—माहित झालों. ( आह्मा सर्वांची नांवें तुला कळलीं ) महीरमण—महीचा रमण पति, स्वामी तो ह्म० राजा, येथें नळराजा. चंद्रवंशी—चंद्राचे वंशांत जन्मलेला तो ( चंद्राचा गुरुपत्नी तारा इजपासून जन्मलेला मुलगा बुध. व बुधाचा इलेपासून जाहलेला मुलगा पुरूरवा राजा. त्याच्यापासून वाढलेल्या वंशाला चंद्रवंश असें नांव असून त्यांतच नळाचा जन्म झालेला होता. ). तुमचाच अंशी–तुमचाच अंशधारी. राजा हा अष्टदिक्पालांचा अंशधारी असतो असें मनुवचन आहे:–" अष्टानां लोकपालानां वपुर्धारयतो नृपः " वंदी–वंदन करतो, नमस्कार करतो.

दिंडी—**नळा कोठें जातोसि असें बोले।**
**नळें इंद्रासी असें बोलिजेलें ॥**
**भीमभूपें हें लिखित पाठवीलें।**
**सैंवरालागीं येइजे वहीलें ॥ १५० ॥**

" नळा, कोठें जातोसी ? " असें ( इंद्र ) बोले; नळें इंद्रासी असें बोलिजेलें ( कीं ) " भीमभूपें सैंवरालागीं वहीलें येइजे हें लिखित पाठवीलें "

नळें इंद्रासी असें बोलिजेलें ( कर्मणी प्रयोग ). भीम हाच भूप तो भीमभूप त्यानें. लिखित–पत्र. सैंवरा लागीं–स्वयंवराकरितां. येइजे–यावें. वहीलें–निश्चयानें, निःसंशय ( क्रियाविशेषण येइजे या क्रियेचें ) कोणतीही सबब न सांगतां. खात्रीपूर्वक.

दिंडी—**बोलताहे देवेंद्र नृपवराला।**
**नैषधा तूं आलासि सैंवराला ॥**

**समज आह्मी तुजवजळि याचनेला ।**
**करूं आलों मनिं धरुनि कामनेला ॥ १५१ ॥**

देवेंद्र नृपवराला बोलताहे ( कीं ) " नैषधा, तूं सैंवराला आलासि, ( आणि ) आम्ही मनिं कामनेला धरुनि तुजजवळ याचनेला करूं आलों ( असें ) समज.

मनीं कामनेला धरून—मनांत कांहीं एक इच्छा धरून. याचनेला करूं आलों—मागण्यास आलों; समज-मान ( आज्ञार्थी एकवचनी. )

व. ति.—**जे हे दिशांपति विशालयशा अशांला ।**
**आशावशा कुवलयांत दृशा कशाला ॥**
**हा बोल तूं न वद, तूजसमीप येतों ।**
**आह्मी मखीं निजमुखीं अवदान घेतों ॥ १५२ ॥**

( हे ) विशालयशा, " हे जे ( आह्मी ) दिशांपति, अशाला कुवलयांत आशा-वशा दृशा कशाला ? " हा बोल तूं न वद. ( कारण कीं ) आह्मी मखीं तुजसमीप येतों ( आणि ) निजमुखीं अवदान घेतों.

विशालयशा—विशाल आहे यश ज्याचें तो त्याचें संबोधन. ( बहुव्री. ) दिशांपति—दिशांचे पति ते दिक्पाल. लोकपाल. ( अलुक तत्पु. ). ( पद्य १४५ टीप पहा ). कुवलय—कुचें पृथ्वीचें जें वलय ह्म० कडें तें त्यांत ह्म० या पृथ्वीतलांत. आशावशा—आशेनें किंवा आशेला जी वश ती. दृशा—दृष्टि. कशाला—कां ( असावी असा भावार्थ ). आम्हीं निरानिराळ्या दिशांचे मालक असे देव असतां, पृथ्वीवर आशापूर्ण दृष्टि कां टाकावी असा भाव. हा... वद-असें ह्मणू नकोस. ( कारण कीं पृथ्वीवरील राजापाशीं याचना करण्याची व आपल्या इच्छा परिपूर्ण करून घेण्याची आमची नेहमींचीच वहिवाट आहे हें दाखविण्याच्या हेतूनें पुढील वाक्य देवेंद्र बोलत आहे ). मखीं—यज्ञांत. निजमुखीं-आपले तोंडांत. अवदान—यज्ञांत दिलेला बळी-किंवा आहुति.

व. ति.—**केला विचार हृदयीं नळराज यानें ।**
**हा जीवही धनहि देइन निश्चयानें ॥**
**देवेंद्र दे जरि ह्मणेल कदापि भैमी ।**
**ते देववेल मज काय ? करीन गै मी ॥ १५३ ॥**

नळराज यानें हृदयीं विचार केला ( कीं ) हा जीवही धनहीं निश्चयानें देईन ( परंतु ) जरि कदापि देवेंद्र भैमी दे ह्मणेल ( तरि ) ते मज देववेल काय ? मी गै करीन ?

भैमी–भीमाची मुलगी ती भैमी, दमयंती. गै–गय ( या शब्दाचें वृत्तसौकर्या-करितां रूप ) क्षमा, कानाडोळा. मी गै करीन–मी तें सहन करूं शकेन किंवा काय याविषयीं मात्र शंका वाटते असा भाव.

दिंडी—**म्हणे राजेंद्र तया देवदेवा ।**
**काय आज्ञा जी काय करूं सेवा ॥**
**वीरसेनाचा थोर पुण्य ठेवा ।**
**मज मिळाला तो दर्शनाख्य मेवा ॥ १५४ ॥**

राजेंद्र तया देवदेवा म्हणे " जी, काय आज्ञा ( आहे ) ? काय सेवा करूं ? वीरसेनाचा पुण्यठेवा थोर ( आहे, म्हणून ) तो दर्शनाख्य मेवा मज मिळाला. "

राजेंद्र–राजांचा इंद्र तो नळराजा. देवदेवा–देवांचा देव मुख्य तो त्याप्रत. दर्शनाख्य–दर्शन, हीच आहे आख्या ह्म० नांव ज्याचें तो दर्शनाख्य. दर्शनाख्य मेवा मज मिळाला–आपली भेट झाली हाच मला मोठा मेवा मिळाला आणि हा माझा बाप जो विरसेन त्याची थोर पुण्याई होती ह्मणून मिळाला. मेवा–फळफळावळ, लहान मुलाला दिलेला खाऊ.

रूपक—चरण ३।४.

व. ति.—**बोले सुराधिप नराधिपतीस राया ।**
**भैमी जसी मज वरील तसें कराया ॥**
**बोलावयास तिजशीं तिचिया घरा जा ।**
**तूं बोलका चतुर केवळ हास राजा ॥ १५५ ॥**

सुराधिप नराधिपतीस बोले " राया, जसी भैमी मज वरील तसें कराया ( आणि ) तिजशीं बोलावयास तिचिया घरा जा. ( कारण कीं ) ( हे ) राजा तूं केवळ चतुर बोलका हास ,,

सुराधिप—सुरांचा अधिप ह्म. स्वामी तो ह्म० इंद्र ( षष्ठीतत्पु. ) नराधि-पतीस—नरांचा ह्म० मनुष्यांचा जो अधिपति ह्म० स्वामी तो ह्म० राजा,

येथें नळराजा ( षष्ठीतत्पु. ) जसीं—जेणेंकरून, ज्या योगानें. भैमी—दमयंती. केवळ—या शब्दानें चतुरतेचें व बोलकेपणाचें आधिक्य दाखविलें जातें. ह्म० फार बोलका व अत्यंत चतुर आहेस असा अर्थ. होस—आहेस. ( हो धातूचें वर्तमान काळीं द्वितीय पुरुषीं एकवचनी रूप. )

मालिनी—**मग हळुच सुरेंद्रा बोलिजे भूपतीनें ।**
**मज निजसुमनाची घातली माळ तीनें ॥**
**हृदय तरि तियेचें सांद्र झालें सुवासें ।**
**चलित न करवे तें कोणत्याही प्रयासें ॥ १५६ ॥**

मग भूपतीनें सुरेंद्रा हळुच बोलिजे ( कीं ) " तीनें निजसुमनाची माळ मज घातली; तरि तियेचें हृदय सुवासें सांद्र झालें, तें कोणत्याही प्रयासें चलित न करवे".

भूपतीनें—नळराजाकडून. बोलिजे—'बोल' या धातूचें तृतीयपुरुषीं एकवचनी कर्मणी रूप. याचा कर्ता तृतीयांत भूपतीनें व प्रथमांत कर्ता ( मूळचें कर्म ) 'कीं' च्या पुढील सर्व वाक्य. निजसुमनाची—.निज ह्म. आपलें सुमन ह्म. पुष्प. तें निजसुमन त्याची ( श्लेषानें ) सुमन सु ह्म. चांगलें ( अर्थात् ) निर्मल मन ह्म. अंतःकरण. निजसुमनाची माळ—आपलें मन हीच कोणी माळ.

सांद्र–स्निग्ध ( पक्षीं ) प्रेमयुक्त घट्ट. सुवासें—चांगल्या वासानें सुगंधानें ( श्लेषानें ) सु–चांगला, दृढ वास–वसति त्याचे योगानें. बाह्यार्थ–पुष्पाची माळा करून जरि तिनें मला वरिलें आहे तरी तिचें अंतःकरण त्या माळेंतील पुष्पाच्या सुगंधानें भरलेलें आहे. ( व्यंग्यार्थ ) तिनें आपलें चांगलें अर्थात् निर्मल असें अंतःकरण मला दिलें आहे ह्म. मीच तिच्या अंतःकरणांत भरलों आहे व त्या ठिकाणीं माझी वसति दृढ झालेली असल्यानें आतां तिचें अंतःकरण चलित होणें कठीण आहे.

श्लेष अलंकार.

दिंडी—**पुन्हां बोले देवेंद्र नृपवरा या ।**
**तुला झालें वश हृदय तिचें राया ॥**

**तरिच आलों हे याचना कराया ।**
**तुझ्या वाक्यें आह्मांसि ते वराया ॥ १५७ ॥**

देवेंद्र या नृपवरा पुन्हा बोले " राया तिचें हृदय तुला वश झालें तरिच तुझ्या वाक्यें ते आह्मासि वराया. ( तुला ) हे याचना कराया आलों. "

देवेंद्र--इंद्र. या नृपवरा--या नळराजाला. तुझ्या...वराया --तुझ्या सांगण्यावरून तिनें आह्मास वरावें यासाठीं. तरिच--म्हणूनच.

व. ति.--**दातव्यही स्ववश आपण जाणताही ।**
**पर्याय उत्तर वदेच न देच कांहीं ॥**
**दाता असा शठ कसा ठकसा कदापि ।**
**जो याचकावरि दया न करीच पापी ॥ १५८ ॥**

दातव्यही स्ववश ( असतां, आणि )आपण ( स्वतः ) जाणता ही ( असतां ) पर्याय उत्तर वदे ( आणि )कांहीं नच दे असा जो ठकसा पापी याचका वरि कदापि दया न करी ( तो ) शठ दाता कसा ?

इंद्र पुढें म्हणतो. दातव्य--जें द्यावयचें तें. स्ववश--आपले स्वाधीन आपल्या ताब्यांत. जाणता-जाणणारा, समजणारा, विद्वान. पर्याय-जी गोष्ट करावयाची असते ती न करतां त्या ऐवजीं जो दुसरा प्रकारांतर आचरतात तो. ( येथें; जें दातव्य तें आपले स्वाधीन असल्यावर जो दाता असेल त्यानें तें याचकास दिलें पाहिजे तें न देतां त्या ऐवजीं कांहीं सबब सांगणें ह्म० पर्याय उत्तर देणें होय. ह्म० पर्याय उत्तर वदे ह्म० कांहीं तरी सबब सांगतो असा अर्थ झाला ). ठकसा--ठकविणाऱ्या सारखा. कपटानें दुसऱ्यास फसविणाऱ्या सारखा. शठ-लुच्चा. नळा, तूं जाणता, व दमयंती तुला वश, असें असतां ती आम्हाला मिळवून देण्याचें कबूल न करतां, तूं कांहीं तरी सबब सांगतोस यावरून तूं दाता नाहींस; असा भाव.

मालिनी--**गहिवरत गळा ही चावळे जीभ वाळे ।**
**विकळपण शरीरीं कंपही या निराळे ॥**
**धनिक विमुख होतां अंतरीं शोक राहे ।**
**हरहर मज भासे यातना याचना हे ॥ १५९ ॥**

धनिक विमुख होतां, गळा गहिवरत, जीभ वाळे ( आणि ) चावळे ही, शरीरीं विकळपण ( येतें ) या निराळे कंप ही ( येतो ) ( आणि, अंतरीं शोक राहे. हर हर ! ! याचना हे मज यातना भासे.

धनिक—धनवान्, श्रीमंत. विमुख होतां—पराङ्मुख होतां, तोंड फिरविलें असतां ( याचना नाकारिली असतां ) गहिवरत—दाटून येतो, भरून येतो वाळे—सुकते. चावळे—भिचुक बोलूं लागतें, भलभलतें बोलूं लागतें. विकळपण—शिथिलता, शैथिल्य. या निराळें—या शिवाय, आणखी. कंप—कांपरें. अंतरीं—अंतःकरणांत, मनांत. हरहर—( खेदार्थी ) शिवशिव, रामराम. यातना—तीव्र दुःख. श्रीमंतानें याचना नाकारिली असतां याचकाची कशी स्थिति होते याचें असें वर्णन करून तद्वत् माझी स्थिति झाली आहे असें इंद्र सूचित करीत आहे.

स्वभावोक्ति अलंकार.

व. ति.—**भांबावला धनमदें भलतेंच बोले ।**
**तो बोलही सरस मानुनि लोक डोले ॥**
**मासें करूनि फुगला गळसाच भावे ।**
**ज्या दीन मीन धरितां वळसाच पावे ॥ १६० ॥**

धनमदें भांबावला ( तो ) भलतेंच बोले; लोक तो बोल ही सरस मानुनि डोले- ज्या धरितां दीन मीन वळसाच पावे ( तो ) मासें करून फुग ( ले ) ला गळसाच भावे.

धनमदें—धनाचा मद ( कैफ नशा ) तो त्यानें. भलतेंच—असंबद्ध, अयोग्य, मागचे पुढचे किंवा चालू विषयाचें धोरण न ठेवितां. अद्वातद्वा. सरस—गोड, मधुर, प्रेमयुक्त. डोले—माना डोलावितात. प्रशंसा करितात. ज्या—या गळाला. दीन—याचक. मीन—मासे. वळसाच पावे—गरक्यांत येतो, गोत्यांत येतो, फसतो. मासें करून फुगला—गळाच्या टोंकाला मांस लावतात हें प्रसिद्धच आहे त्या मांसाच्या योगानें लठ्ठ झालेला. गळसा—गळा सारखा. भावे—वाटतो. ज्याप्रमाणें मांसाच्या लोभानें मासे येतात व फशीं पडतात, त्याप्रमाणें धनानें माजलेल्या गृहस्थापाशीं याचक धनाच्या लोभानें जातात व निराश होऊन फसतात—हा भाव. इंद्रानें निराश

याचकांचें व गर्विष्ठ धनिकांचे असें सामान्य वर्णन करून, नळाला तू त्या धनिका-प्रमाणें व मी याचकाप्रमाणें हल्लीं आहोंत असें सुचविलें आहे.

उपमा अलंकार

**दिंडी—असे परिसोनी बोल वासवाचे ।**
**तया नलराजा काय वदे वाचें ॥**
**तुह्मी ज्ञाते हो थोर थोर साचे ।**
**असां साक्षी तुह्मि माझिया मनाचे ॥ १६१ ॥**

वासवाचे असे बोल परिसोनि नलराजा तया वाचें काय वदे ( तें ऐका. ) हो तुह्मी साचे थोर थोर ज्ञाते ( आहांत आणि ) तुह्मी माझिया मनाचे साक्षी असां.

वासवाचे—इंद्राचे. असे बोल—हें बोलणें, हें भाषण. परिसोनि—ऐकून. वाचे—वाचेनें, शब्दानें, भाषणानें. वदे—बोले. वाचे वदे—बोलतो. साचे—खरोखर, खरे खरे, थोर थोर—अधिकार्थी द्विरुक्ति फार मोठे व चारीदिक्पाळांस अलग अलग उद्देशून, ज्ञाते—जाणणारे, विद्वान्. साक्षी—पाहणारे. असां—अहांत—( द्वि. पु. अ. व. ) तुम्ही माझ्या मनांत काय आहे हें जाणण्यास समर्थ असल्यानें मी खरोखर गर्विष्ठ आहे किंवा कांहीं तरी सबब सांगतों किंवा कसें हें तुम्ही जाणूं शकतों. असा भाव.

**दिंडी—ज्यासि जेथें सामर्थ्य नसे त्यातें ।**
**कसें कार्या त्या तुह्मी सांगिजेतें ॥**
**बाळ तान्हें उचलील काय जातें ।**
**बोलणाराचें मोल फोल जातें ॥ १६२ ॥**

ज्यासि जेथें सामर्थ्य नसे त्यातें त्या कार्या तुम्ही कसें सांगिजेतें? तान्हें बाळ जातें उचलील काय? ( या योगानें ) बोलणाराचें मोल फोल जातें.

सामर्थ्य—शक्ति, सांगिजेतें—सांगावें, तान्हें—नेणतें, दूध पिणारें, जातें—घट्टी. मोल—महत्व, मातबरी. फोल—व्यर्थ, फुकट. बोलणाराचें...जातें-बोलणाराचें महत्व कमी होतें. त्याच्या सुज्ञपणाची किंमत कमी होते.

दृष्टांतालंकार.

दिंडी-**सात बंकाही पलीकडे होते ।**
**राजकन्येची भेट कसी होते ॥**
**त्यजुनि राज्य त्वद्दूतता कसी ते ।**
**धरावी म्या हृदयासि जे कसीते ॥ १६३ ॥**

हो, सात बंकाही पलीकडे ते, ( त्या ) राजकन्येची भेट कसी होते ? ( शिवाय ) जे हृदयासी कसीते ते त्वद्दूतता म्या राज्य त्यजुनी कसी धरावी ?

बंका—बंक ह्म० पहारा, चौकी. ( पलीकडे या शब्दयोगी अव्ययामुळें सामान्यरूप. ) ते—राजकन्या दमयंती. प्रथमा विभक्ति कर्ता 'आहे' या अध्याहृत क्रियापदाचा. कसी होते—कसी व्हावी किंवा कसी होणार. जे—त्वद्दूतता. कसीते—आंवळते, पीडा देते. त्वद्दूतता—तुझा दूत तो त्वद्दूत त्याचा भाव ती—तुझें दौत्य. तुझा दूत होण्याचें काम. धरावी—पत्करावी. मी राजा असतां निरोप घेऊन जाणाऱ्या सामान्य दूताचें काम करावें, व तो निरोपही माझ्या मनाला तापदायक असतां, हें मला शोभत नाहीं असा भाव.

व.ति.—**बोले सुरेंद्र नृपसौध सुखें फिराया ।**
**आकार गुप्त वर देइन देवराया ॥**
**जाई विदर्भवसुधेस सुतेस शोधी ।**
**आह्मासि ते तरि वरील तुझ्याच बोधीं ॥ १६४ ॥**

सुरेंद्र बोले " देवराया, नृपसौध सुखें फिराया ( तुज ) गुप्त आकार वर देइन. ( मग ) विदर्भवसुधेस जाई ( आणि ) सुतेस शोधी. ते आह्मांस वरील तरी तुझ्याच बोधीं ( वरील, नाहीं तर नाहीं ).

नृपसौध-नृपाचा सौध ह्म०. वाडा तो नृपसौध. सुखें-सुखानें, अनायासें, कांहीं कष्ट न होतां. फिराया-हिंडतां यावें ह्मणून. गुप्त आकार वर-असा वर देइन कीं त्याच्या योगानें तुझा आकार गुप्त राहील ह्म० तूं कोणास दिसणार नाहींस. बोधीं-सांगण्यानें. तात्पर्य-तिचें मन जर कोणी वळवूं शकला तर तो तूंच वळवूं शकसील, दुसरा त्या कामीं शक्त नाहीं.

ओंवी—**इंद्र त्रैलोक्यनायक । तोही झालासे याचक ॥**
**दाक्षिण्यानें भूपाळक । यांच्या वाक्यें गुंतला ॥ १६५ ॥**

इंद्र त्रैलोक्य-नायक ( असून ) तोही याचक झालासे. भूपालक दाक्षिण्यानें त्यांच्या वाक्यें गुंतला.

त्रैलोक्यनायक—तीन लोकांचा जो समुदाय तें त्रैलोक्य ( द्विगु ) त्रैलोक्याचा नायक तो त्रैलोक्य नायक. याचक—मागणारा; भिक्षेकरी. झालासे—झाला असे. भूपाळक—भू ला ह्म. जमीनीला किंवा पृथ्वीला पाळणारा तो भूपाळक ह्म. राजा, नळ. दाक्षिण्यानें—औदार्यानें, वाक्यें गुंतला—बोलण्यांत सांपडला. बोलण्यानें फसला. आपल्या अंतःकरणाच्या उदारपणामुळें नळ त्यांचे बोलण्या प्रमाणें वागण्यास तयार झाला हा अर्थ.

ओंवी—**बरें ह्मणोनि उत्तरें । रथावरोनि ऊतरे ॥**
**तया राजपुरीं शिरे । शोभा तेथील पहातो ॥ १६६ ॥**

( तो ) बरें ह्मणोनि उत्तरें ( आणि ) रथावरोनि ऊतरे ( नंतर ) तया राजपुरीं शिरे ( व ) तेथील शोभा पहातो.

उत्तरे–उत्तर देता झाला. ऊतरे–खालीं आला. राजपुरीं–राजाची पुरी ह्म० नगर ती राजपुरी तिजमध्यें ( षष्ठी तत्पु. ) शिरे–शिरला. आंत गेला.

व. ति.—**प्राणांपरीच हृदयीं नगरांतरीं तो ।**
**गुप्त स्वरूप नळ भूप तदा धरीतो ॥**
**बंकी रिघे तंव तया दिसताति बंके ।**
**पंकेरुहास्य न दिसेचि तया न शंके ॥ १६७ ॥**

तदा हृदयीं प्राणापरीच तो नळभूप नगरांतरीं गुप्त स्वरूप धरीतो. ( तो ) बंकीं रिघे ( तदा ) तया बंके दिसताति ( परंतु त्याचें ) पंकेरुहास्य ( कोणालाही ) न दिसे. ( कोणी ) तया न शंके.

प्राणापरी हृदयीं–ज्या प्रमाणें हृदयांत प्राण गुप्तस्वरूप असतात त्याप्रमाणें. नळभूप–नळ हाच भूप ह्म० राजा तो नळभूप–( कर्मधारय ). नगरांतरीं–नगरांत ( अंतर–आंतील भाग. ह्म० नगरांतरीं ह्म० नगराच्या आंतल्या भागांत अर्थात नगरांत ). रिघे–जाई, शिरला. तया–नळराजास. पंकेरुहास्य–पंकांत ह्म० चिखलांत रुजतें तें कमल. ( अलुक समास ) पंकेरुहाप्रमाणें जें आस्य ह्म० मुख, तोंड तें पंकेरुहास्य ह्म० कमलासारखें ( सुंदर ) मुख ( कर्मधारय ). तया

न शंके–कोणालाही त्याच्या तेथल्या अस्तित्वाचा संशय देखील आला नाहीं ( अर्थात इंद्राच्या वरामुळें ). बँके पाहरेकरी.

ओंवी—**तया राजसौधांतरीं । शोभा पाहे परोपरी ॥**
**कोठें आहे ते सुंदरी । शोधावया लागला. ॥ १६८ ॥**

अन्वय आहे तसाच.

राजसौधांतरीं—राजाच्या सौधाच्या अंतरांत ह्म० मध्यभागांत. परोपरी–नानाप्रकारची. ते सुंदरी–दमयंतीला उद्देशून हे शब्द आहेत.

ओंवी—**कोणी एक दोघी दूती । तेथें अन्योन्य बोलती ॥**
**"एथें आहे दमयंती" । जाई बोलोनि "येई" ॥ १६९ ॥**

तेथें कोणी एक दोघी दूती अन्योन्य बोलती ( कीं ) "एथें दमयंती आहे, येई" ( असें ) बोलोनि जाई.

तेथें–त्या राजवाड्यांत जेथें नळराजा दमयंतीला शोधीत फिरत होता तेथें. कोणी एक–कोणत्या तरी. दूती–संदेश पोंचविणाऱ्या. ह्या ठिकाणीं सामान्यतः दासी या अर्थी शब्द योजिला आहे. अन्योन्य–परस्पर, आपसांत.

ओंवी—**तीजसवें सौधांतरीं । राजा जाय अंतःपुरीं ॥**
**तेथें देखिली सुंदरी । जैसा पूर्ण चंद्रमा ॥ १७० ॥**

तीजसवें राजा सौधांतरीं अंतःपुरीं जाय ( आणि ) तेथें जैसा पूर्ण चंद्रमा ( तैसी ) सुंदरी देखिली.

तीजसवें–तिच्याबरोबर, त्या दासीच्या पाठोपाठ. अंतःपुरीं–बायका वसण्याच्या जागेंत, राणीवशांत, जनानखान्यांत.

ओंवी—**सुमनसेजेच्या पलंगीं । बैसलीसे तन्वंगी ॥**
**सख्या खेळताति संगीं । बहु अप्सरा त्या जैशा ॥ १७१ ॥**

तन्वंगी सुमनसेजेच्या पलंगीं बैसलीसे, जैशा बहु अप्सरा ( तैशा ) त्या सख्या संगीं खेळताति.

तन्वंगी–तनु ह्म० बारिक, कृश सडपातळ असें आहे अंग जीचें ती तन्वंगी

( बहुव्री ) सडपातळ अंगाची. सुमनसेजेच्या–सुमनाची ह्म० पुष्पाची सेज ह्म० शय्या, बिछाना, ती, तिच्या संगी–बरोबर ( अर्थात दमयंती बरोबर ).

मालिनी—**प्रगट तिज पुढारां जाहला राजमौळी ।**
**पदर वरि न घेता हार जैसा झळाळी ॥**
**निजहृदयनिवासी काय बाहेर आला ।**
**निरखुनि दमयंती तेविं मानी तयाला ॥ १७२ ॥**

, जैसा पदर वरि न घेतां हार झळाळी तेवीं राजमौळी तिजपुढारां प्रगट जाहला; तयाला निरखुनी निजहृदयानिवासी बाहेर आला काय ? ( असें ) दमयंती मानी.

राजमौळी–राजा मध्यें मौली प्रमाणें ह्म० मुकुटा प्रमाणें अर्थात श्रेष्ठ तो राजमौळी ( कर्मधारय. ) पुढारां–समोर. झळाळी–चमकतो. निजहृदयनिवासी–निज आपल्या हृदयांत निवास करणारा ह्म० रहाणारा ( उपपद. ) मानी–समजे. उत्प्रेक्षालंकार. ज्याप्रमाणें पदराखालीं झांकलेळा दैदीप्यमान हार पदर दूर केला म्हणजे एकदम झळकूं लागतो तसा तो तेजस्वी राजा एकदम प्रगट झाला; दमयंती रात्रंदिवस त्याचेंच चिंतन करीत असल्यानें त्याची मूर्ति तिच्या अंतःकरणांत होती. ती मूर्तिच बाहेर आली कीं काय असें तिला त्यावेळी वाटलें असा अर्थ.

द्रु. वि.—**गजबजोनि समस्त तिच्या सख्या ।**
**गजगमा उठल्या तिजसारख्या ॥**
**पदर सांवरितां नृपबाळिका ।**
**झळकती हृदयीं मणिमाळिका ॥ १७३ ॥**

तिच्या समस्त गजगमा सख्या तिजसारख्या गजबजोनी उठल्या. नृपबाळिका पदर सांवरितां हृदयीं मणिमाळिका झळकती.

समस्त–सगळ्या, सर्व. गजगमा–गजाचे गमनाप्रमाणें आहे गमन ह्म० चालणें ज्यांचे त्या ( बहुव्री ). तिजसारख्या–ती जशी गजबजली व उठून उभी राहिली त्याचप्रमाणें. गजबजोनि–गजबजून, चमकून, चकित होऊन. उठल्या–उठून उभ्या राहिल्या. नृप-बाळिका–नृपाची बालिका ती ह्म० राजकन्या ( दमयंती ) [ कर्ता सांवरितां या धातुसाधिताचा ]. मणिमाळिका–मण्यांच्या ह्म० रत्नांच्या माळिका

ह्म० माळा, हार त्या. झळकती–चकाकतात. स्त्रिया कोणी परपुरुष एकदम आला असतां आपला पदर वगैरे सांवरून शरीराचा भाग उघडा न दिसेल असें करतात त्याप्रमाणें दमयंतीनें केलें.

शा. वि.—**रामातें जनकक्ष्मापतिसुता रामा जसी रेवती ।**
**कामारीस नगाधिराजतनया कामासि जैसी रती ॥**
**या मानूनि तसी विदर्भदुहिता रामा मनीं भाविते ।**
**हा माझा हृदयाब्जसूर्य ह्मणुनी त्या मानिनी बोलते ॥ १७५॥**

जसी जनकक्ष्मापतिसुता रामातें, रेवती रामा, नगाधिराजतनया कामारीस, ( किंवा ) जैसी रती कामासि ( मानिते ) तसी विदर्भदुहिता रामा या मानुनी हा माझा हृदयाब्ज सूर्य ( आहे ) ह्मणुनी मनीं भाविते ( आणि ) ( ती ) मानिनी त्या बोलते.

जनकक्ष्मापतिसुता–जनक हाच क्ष्मापति ( क्ष्मेचा पति ) ह्म० राजा तो त्याची सुता ह्म० मुलगी ती ह्म० जनक राजाची कन्या जानकी, सीता. रामाते–रामाते, दाशरथि रामाला. ( दशरथाचा मुलगा जो राम त्याला. ) रामा–बलरामाला. नगाधिराजतनया–नगांचा पर्वतांचा जो अधिराज स्वामी त्याची तनया मुलगी ह्म० पार्वती. कामारीस—काम मदन त्याचा अरि शत्रु त्यास ह्म० शंकराला ( शंकरानें मदनाला जाळून टाकिलें असी पौराणिक कथा सुप्रसिद्ध आहे ). रती–मदनाची बायको तिचें नांव. विदर्भदुहिता–विदर्भ राजाची दुहिता मुलगी दमयंती. रामा–बायको स्त्री. या–नळाला. हृदयाब्जसूर्य—हृदय हेंच कोणी अब्ज ह्म० कमल. त्याचा सूर्य–असें भाविते—मानिते समजते. कमळांना सूर्यापासून त्याप्रमाणें माझ्या हृदयाला नळापासूनच आनंद होणारा आहे असें दमयंतीला वाटत होतें हा अर्थ. मानिनी—मान ह्म० अभिमान, अहंकार, आहे जिला ती. त्या–नळाला. अलंकार–उपमा, व रूपक,

साकी.

**कोण तुह्मी कवणाचे कोठुनि एथें कां आलां हो ।**
**काय निमित्तें दिधला मजला हा निज–दर्शन–लाहो ॥१७५॥**

हो, तुह्मी कवणाचे कोण ( अहांत ) ? एथें कोठून ( व ) कां आलां ? ( आणि ) काय निमित्तें हा निजदर्शनलाहो मजला दिधला ?

कवणाचे कोण–कोणाचे कोण. काय निमित्तें–काय कारणानें, कशासाठीं. निजदर्शन लाहो–निज आपलें दर्शन त्याचा लाहो लाभ ह्म० आपली भेट. आपला दर्शनलाभ.

साकी.

**अटक न केली तुह्मासि येतां त्या सातांही बंकी ।**
**ही माझ्या नयनांचीं सुकृतें विशेष मी हें शंकी ॥ १७६ ॥**

येतां त्या सातांही बंकी तुह्मांसि ( कोणी ) अटक न केली हीं माझ्या नयनांचीं विशेष सुकृतें ( होत ) हें मी शंकी.

येतां–येत असतांना, येतांना. सुकृतें–सु ह्म० सुष्ठु, चांगलीं कृत्यें ह्म० कर्में तीं सुकृतें ह्म० पुण्यें. ( अनेकवचन ). शंकी–समजतें, शंकिते. तुमचें सुंदर दर्शन घडावें असें कांहीं पूर्वपुण्य माझ्या डोळयांनीं केलें असावें, म्हणूनच पाहरेकऱ्यांनीं येतांना तुम्हाला बंदी केली नाहीं असें मला वाटतें असा अर्थ.

साकी.

**संभवलां कवणाचे वंशीं सांगा हो अकलंकी ।**
**उभे असां कां भागतसां हो या बैसा पर्यंकी ॥ १७७ ॥**

हो अकलंकी, कोणाचे वंशीं संभवलां ? सांगा. उभे कां असां ? ( तेणें करून ) हो, भागतसां. या पर्यंकीं बैसा.

अकलंकी–कलंक ह्म०दोष, डाग, अपकीर्ति इ० आहे ज्याला तो कलंकी. कलंकी नाहीं तो ह्म० निर्दोष. बिनडाग ( नयतत्पु. ) वंशीं–कुलांत. संभवलां–जन्मला. भागतसां–थकतां अहां, तुह्मांस श्रम होत आहेत, कष्टतसां. पर्यंकीं–पलंगावर. बैसा–बसा.

व. ति.—**राजे असाल तरि धन्य वसुधरा हे ।**
**शोभाल देव तरि नाक यथार्थ आहे ॥**
**भोगी तुह्मी उपजलां जरि नागलोकीं ।**
**खालीं असोनि सकळांवरि होय तो कीं ॥ १७८ ॥**

( जर तुह्मी ) राजे असाल, तरि हे वसुंधरा धन्य ( आहे ); देव शोभाल तरि नाक यथार्थ आहे; ( आणि ) जरि तुम्ही नागलोकीं भोगी उपजलां ( तरी ) तो खाली असोनि सकळांवरि होय कीं.

( वसुंधरा—वसु धरिते ती वसुंधरा ) ( वसु ह्म० द्रव्य संपत्ति ): नाक स्वर्ग ( देव स्वर्ग लोकांत रहातात ). नाक...आहे नाक आपल्या अर्थाला धरून आहे. ह्म० स्वर्गलोक सर्व भुवनाचें केवळ नाक आहे. ( नाकाच्या योगानें तोंडाचें सौंदर्य खुलतें, उलट पक्षी तोंड कितीही सुंदर असून नाक नकटें असलें तर तोंडाची सर्व शोभा जाते त्यावरून ' नाक असणें ' याचा अर्थ ' श्रेष्ठ असणें ' असा होतो जसें:—अहो हा दरवाजा तर त्या इमारतीचें नाक आहे. तो नाहींसा झाला तर त्या इमारतीची शोभा ती काय ? " इ० ). नागलोकीं–नागांचा ह्म० सर्पांचा ( अर्थात सर्पांच्या राहण्याचा ) जो लोक तो ह्म० पाताळलोक ( नाग पाताळांत रहातात असें पुराणांतरीं वर्णन आहे. ) भोगी–भोग ह्म० शरीर, देह. आहे. ज्याला तो ह्म० सर्प, ( नागलोक ). सकळांवरि होय–सर्वांत श्रेष्ठ होय. पाताळ हे त्रैलोक्यांत सर्वांत खालीं आहे. पण तुम्ही तेथें असला तर त्या योगानें त्याला इतकें महत्व येईल कीं त्या दृष्टीनें तें सर्वांत वर ह्म. श्रेष्ठ होईल. ( वर होणें ह्म० श्रेष्ठ असणें ). दमयंतीचे ह्मणण्याचा सारांश. तुह्मी मृत्युलोकीं राजे असाल तर मृत्युलोक धन्य आहे, देव असाल तर स्वर्ग श्रेष्ठ आहे आणि नाग असाल तर पाताळ श्रेष्ठ. ह्म० तुमच्या योगानें त्रैलोक्यही श्रेष्ठ होणार आहे.

साकी.

**दुग्धपूर नसतां निजरूपीं क्षीरसिंधु तो जैसा ।**<br>
**वसंत आला नाहीं तरि तो उद्यानभाग जैसा ॥ १७९ ॥**

**अमृतकराचा उदय न होतां रजनीसमयो जैसा ।**<br>
**तुमच्या विरहें आजि जाहला कवण देश तो ऐसा ॥ १८० ॥**

जैसा दुग्धपूर नसतां तो क्षीरसिंधु निजरूपीं ( किंवा ) जैसा वसंत आला नाहीं तरि तो उद्यानभाग ( किंवा ) जैसा अमृतकराचा उदय न होतां रजनी–समयो; ऐसा तो कवण देश तुमच्या विरहें आज जाहला ?

जैसा–जसा. दुग्धपूर-दुग्धाचा ह्म० दुधाचा पूर (षष्ठी तत्पु.). तो–तो जो प्रसिद्ध आहे. क्षीरसिंधु–क्षीराचा ह्म० दुधाचा सिंधु ह्म० समुद्र तो. (क्षीरसिंधु हा विष्णुचें निवासस्थान असल्याचें पुराणांतरीं वर्णन आहे. येथें श्रीविष्णु शेष सर्पावर शयन करतात असें सांगितलें आहे). वसंत......तरि–वसंत ऋतु नसला तर. (वसंत ऋतूंत सर्व झाडांना नवी पालवी फुटून झाडें शोभिवंत दिसतात हें प्रसिद्धच आहे. अर्थात वसंत ऋतु नसला तर झाडें विशोभित दिसून बागबगीच्याची शोभा जाणार आहे). उद्यानभाग–उद्यानाचा ह्म० बागेचा भाग ह्म० प्रदेश तो ह्म० सामान्यतः बाग, उपवन. (षष्ठी तत्पु.) अमृतकराचा–अमृत आहे कराचे ह्म० किरणाचे ठायीं ज्याच्या तो त्याचा ह्म० चंद्राचा (बहुव्री.) रजनीसमयो–रजनीचा ह्म० रात्रीचा समयो–समय, वेळ विरहें–वियोगानें. भावार्थ–दुधाचा पुरवठा नसला तर जसा क्षीरसिंधु किंवा वसंत ऋतु नसता बागवगीचे किंवा चंद्र उगवला नाहीं तर रात्र विशोभित दिसते तसी तुह्मी विद्यमान नसल्यानें कोणता देश विशोभित दिसतो तात्पर्य तुह्मी कोणत्या देशाहून आलां ?

उपमा अलंकार. ललित अलंकार.

व. ति.—**भूपाळ जो मम मनोमुकुरीं उभासे ।**
**तो नैषधेंद्र तुमचा अनुबिंब भासे ॥**
**रूपें तशींच दिसतात दिगंतराळीं ।**
**तीं हीं कशीं ह्मणवतील तुह्मानिराळीं ॥ १८१ ॥**

जो नैषधेंद्र भूपाळ मम मनोमुकुरीं उभासे तो तुमचा अनुबिंब भासे. (आणि) तशींच दिगंतराळीं हीं रूपें दिसतात तीं तुम्हां निराळीं कशीं म्हणवतील ?

मनोमुकुरीं–मन हाच मुकुर ह्म. आरसा त्यांत (कर्मधारय). उभासे–उभा आहे; हजर आहे. अनुबिंब–प्रतिबिंब. भासे–वाटते. तशींच–मनोमुकुरीं भूपाळ उभासे त्याच्या रूपा प्रमाणें. रूपें–स्वरूपें. दिगंतराळीं–सभोंवती. दिक ह्म. दिशा त्यांच्या अंतराळीं ह्म. अवकाशांत पोकळींत. (षष्ठी तत्पु.) तुम्हानिराळीं–तुमच्या शिवाय अन्य. म्हणवतील–शक्यार्थीं तृतीय पुरुषीं अनेक वचनी रूप.

साकी.

**सरसद्युतिपद फुल शिरसांचें फुललें मृदुस्वभावें ।**
**चालवाल किति दूर तयातें अदय हृदय मज भावे ॥ १८२ ॥**

सरसद्युतिपद ( असें जणूं ) शिरसांचें फूल मृदुस्वभावें फुललें ( आहे ) तयातें किती दूर चालवाल ? ( यावरून ) हृदय अदय ( आहे असें ) मज भावे.

सरसद्युतिपद–रसा सहित तें सरस ( सुंदर ) अशी द्युति ह्म. शोभा त्याचें पद ह्म. स्थान सुंदरशोभास्थान ( सामान्यतः ) शोभिवंत. शिरस–एक प्रकारचा वृक्ष आहे त्याची फुलें केशरयुक्त अत्यंत शोभिवंत व लाल रंगाचीं असतात व तीं अत्यंत नाजुक असून थोड्याशा हवेच्या फेरफारानें कोमेजतात. मृदुस्वभावें–मृदु असा स्वभाव तो मृदुस्वभाव त्यानें, नाजुकपणामुळें. सरस... फुललें–तुमचें मुखकमल तुमच्या नाजुकपणानें, इकडे येण्याच्या श्रमानेंच शिरसाच्या फुला प्रमाणें लाल झालें आहे. तें आणखी किती दूर चालवाल. त्याची तुम्ही कांहींच दया घेत नाहीं यावरून तुमचें अंतःकरण निर्दय, कठोर आहे असें मला वाटतें. अदय–दयारहित. भावें–वाटतें.

रूपकातिशयोक्ति अलंकार चरण १.

साकी.

**कर्णयुगुल हे धन्य करावें सांगुनिया निज नावें ।**
**स्तवन करी रघुनाथ तयाचें कवन स्वीकारावें ॥ १८३ ॥**

निज नावें सांगुनिया हे कर्णयुगल धन्य करावें ( आणि ) रघुनाथ स्तवन करी तयाचे कवन स्वीकारावें.

कर्णयुगल–युगल ह्म. जोडपें, युग्म. आणि कर्ण ह्म. कान कर्णाचें युगल ते कर्णयुगल ह्म. दोनी कान. ( षष्ठी तत्पु. ) अर्थ सरळ व सोपा आहे. दुसऱ्या ओळींतला मजकूर हें कवीचें श्रोत्यांना उद्देशून बोलणें आहे. त्याचा वरच्या ओळीशीं कांहीं संबंध नाहीं.

व. ति.—**आहेस कीं सुखवती कमनीयलीळे ।**
**निश्चिंत कीं हृदय होय तुझे सुशीळे ॥**
**आतां नकोच अवलंब विलंबनाचा ।**
**हेजीव मी समज मुख्य सुराधिपाचा ॥ १८४ ॥**

( हे ) कमनीयलीळे, सुखवती आहेस कीं ? हे सुशीळे तुझें हृदय निश्चित

होय कीं ? आतां विलंबनाचा अवलंब नकोच. मी मुख्य सुराधिपाचा हेजीब ( आहे, असें ) समज.

नळ ह्मणतो—कमनीयलीळे—मनोहर, नेत्रास आनंद देणारी लीला बोलणें चालणें जीचें ती. सुखवती ( सुख आहे जीस ती ) सुखी. सुशीले—( सु ह्म० चांगलें आहे शील ह्म. स्वभाव जिचा, ती.बहुव्री. ) हे सुस्वभावे ( संबोधन ) निश्चिंत—निस् नाहींसी झाली आहे चिंता ह्म० काळजी ज्या पासून तें निश्चिंत ( बहुव्री. ) निष्काळजी. विलंबनाचा—उशीर, खोळंबा. वेळ लावणें वगैरेचा. अवलंब—आश्रय. आतां...नकोच—उगाच पाल्हाळ सांगून तुला खोळंबऊन उशीर करीत नाहीं, थोडक्यांत सांगतो. सुराधिपाचा—इंद्राचा ( सुर ह्म० देव त्यांचे अधिप त्याचा सुराधिपाचा ). हेजीब—दूत.

स्वागत.

**जो धरी निजकरीं शतकोटी । ज्यासि नम्र सुमनःशतकोटी ॥**
**तो सुरेंद्रहि तुला नत याची । हा असो वर तुला न तयाची १८५॥**

जो निजकरीं शतकोटी धरी, ज्यासि सुमनःशतकोटी नम्र ( आहेत ) तो सुरेंद्रही तुला नत ( होऊन ) "हा ( तुला ) वर असो, ( असें ) याची." तयाची तुला न.

निजकरीं—आपल्या हातांत. शतकोटी—वज्र. सुमनःशतकोटी—सुमनांच्या ह्म. देवाच्या शत ह्म० शंभर कोटी ह्म. कोटि संख्या, त्या सुमनः शतकोटी ह्म. कोट्यावधि देव. नम्र—विनीत. सुरेंद्र—इंद्र, नत—नम्र विनीत. वर—नवरा. तुळा—तुलना. याची—याचना करितो भिक्षा मागतो. तयाची तुला न—त्या इंद्रासारखा दुसरा कोणी नाहीं.

पर्यायोक्त अलंकार.

घनाक्षरी—**तया इंद्रा करीं धरी । अथवा तयाचे शेजारी ॥**
**नांदे जो तेजोनिधी भारी । तया वरी राजसे ॥**
**तोही येईना जरी मना । तरी वरावें शमना ॥**
**अथवा करूनी करुणा । त्या वरुणा वरीं कीं. ॥**
**ऐसें बोलतां भूपाळ । काय बोले ते वेल्हाळ ॥**
**कांहो बोलतां पाल्हाळ । नाम कुळ सांगावें ॥ १८६ ॥**

राजसे तया इंद्रा करीं धरी, अथवा तयाचे शेजारी जो भारी तेजोनिधी नांदे तया वरी; जरी तोही मना येईना तरी शमना वरावें अथवा करुणा करूनी त्या वरुणा वरी कीं.

ऐसें भूपाळ बोलतां ते वेल्हाळ काय बोले ( कीं ) हो, पाल्हाळ कां बोलता ? ( तुमचें ) नाम, कुळ, सांगावें.

तेजोनिधि—तेजाचा निधि ह्म. खजिना तो तेजोनिधि ह्म. अत्यंत तेजस्वी असा जो अग्नि. भारी—अत्यंत. मना येईना—आवडत नसेल तर. शमना—यमाला. करुणा करुनी—दया करून. कीं—निश्चयबोधक अव्यय. वेल्हाळ—सुंदरी; येथें दमयंती. पाल्हाळ—भाकडकथा; वायफळ बोलणें. नाम—नाव, कुळ—वंश.

व. ति.—**बोले नृपाळ पुससी मज वंश नामें ।**
**यावीण सांग तटलीं तुझि काय कामें ॥**
**आलों सुधांशुमुखि जे घटना कराया ।**
**तीतें विचारुनि वरी सुरलोकराया ॥ १८७ ॥**

नृपाळ बोले " मज वंश नामें पुससी ( परंतु ) यावीण तुझि काय कामें तटलीं ? सांग. ( हे ) सुधांशुमुखि, जे घटना कराया आलों तीतें विचारुनी सुरलोकराया वरी.

नृपाळ—राजा ( नळराजा ) पुससी—विचारितेस यावीण—ह्यावांचून. तटलीं—खोळंबलीं आहेत. सुधांशुमुखि—सुधा ह्म० अमृत आहे अंशुंच्या ठायीं ह्म० किरणांत ज्याच्या तो ह्म० चंद्र. त्याप्रमाणें आहे मुख जिचें ती, तिचें संबोधन ह्म० हे चंद्रवदने. ( बहुव्री. ) घटना कराया—घडविण्यास, ठरविण्याकरितां. विचारुनी—विचार करून ( ह्या शब्दाचा प्रयोग लक्षांत ठेवण्यासारखा आहे. कवीनें हा शब्द नेहमीच्या परिचयांतील अर्थानें न योजितां मूळ धात्वर्थानें योजिला आहे ). सुरलोकराया—सुरांचा जो लोक ह्म० रहाण्याचें स्थान त्याचा राय ह्म० राजा तो त्याप्रत ( षष्ठी तत्पु. ).

धनाक्षरी—**बोले सुंदरी तयाशीं । स्ववंशनाम न सांगसी ॥**
**तरी आह्मी परपुरुषासीं । वदणें मर्यादा नोहे ॥**

**तिचा पाहूनिया कोप । काय बोले नळभूप ॥**
**चंद्रवशाचें हें रोप । माझे जाण राजसे ॥**
**महाजनाचा आधार । निजनामाचा उच्चार ॥**
**करूं नये हें साचार । शास्त्राधार आहे कीं ॥**
**पुन्हा बोलते सुंदरी । चंद्रवंशी महीवरी ॥**
**बहु आहेत ते परी । नामें घेतां जाणवें ॥ १८८ ॥**

सुंदरी तयाशीं बोले " स्ववंशनाम न सांगसी तरी आह्मी परपुरुषासी बोलणें ( हें ) मर्यादा नोहे. " तिचा कोप पाहूनिया नळभूप काय बोले ( कीं ) " ( हे ) राजसे, हें माझें चंद्रवंशाचें रोप ( आहे असें ) जाण. महाजनाचा आधार ( आहे कीं ) निज नामाचा उच्चार करूं नये हें साचार ( आहे ). ( यास ) शास्त्राधार आहे कीं, " सुंदरी पुन्हा बोलते ( कीं ) " ते चंद्रवंशी महीवरी बहु आहेत, परी नामें घेतां जाणवें. "

सुंदरी—दमयंती. स्ववंशनाम—आपलें नांव व कुळ. परपुरुषासी—परक्या पुरुषाशीं. वदणें—बोलणें. हे मर्यादा नोहे—हें मर्यादेचें लक्षण नाहीं. शास्त्रानें स्त्रियाकरितां जी नियम मर्यादा घालून दिली आहे त्याचें बाहेरील हें काम आहे. तिचा... पाहुनिया—ती रागावली असें पाहून. राजसे—हे राजकन्ये. चंद्रवंशाचे—चंद्राचा वंश तो त्यांचे. महाजनाचा—महा ह्म० मोठे असे जे जन ह्म० लोक ते त्यांचा ( कर्मधारय ). साचार—आचारासहित तें साचार. साचार आहे—आचारास धरून ( अनुसरून ) आहे. असी वहिवाट आहे. शास्त्राधार—शास्त्राचा आधार ( षष्ठी तत्पु. ). जाणवे—जाणतां येतील ओळखतां येतील.

गीति—**मी वासुदेव ऐसें स्वनाम मुरहर वदे सकळ-वेदी ।**
**आधार तोचि मानुनि निजाभिधानासि कवण न निवेदी १८९**

मुरहर सकळवेदी ( असतां ) ' मी वासुदेव ' ऐसें स्वनाम वदे. तोचि आधार मानुनी कवण निजाभिधानासी न निवेदी ?

दमयंती म्हणते. मुरहर—मुरनांवाच्या दैत्याला हरण करणारा ह्म० नाश करणारा तो मुरहर ह्म० श्रीकृष्ण भगवान. सकळवेदी—सकळ ह्म० सर्व वेदी ह्म० जाणणारा तो ( उपपद ). निजाभिधानासी—निज ह्म० आपलें अभिधान ह्म० नांव तें त्याप्रत.

दमयंती म्हणते कीं आपलें नांव सांगुं नये अशी मोठ्या लोकांची चाल व शास्त्राची आज्ञा असल्याचें तुम्ही सांगतां. परंतु श्रीकृष्ण जाणता असून त्यानें आपलें नांव सांगितलें तेव्हां तुम्हाला नांव सांगण्यास हरकत नसावी.

ओंवी—**बोले नैषधेंद्र वाचा । नाम हेजीव इंद्राचा ॥**
**किती साक्षेप नांवाचा । काय तेणें करिसी तूं ॥ १९० ॥**
**केला काय अंगीकार । बोलूं इंद्रासी निर्धार ॥**
**तंव ते बोले सुकुमार । चंद्राकारवदनातें ॥ १९१ ॥**

नैषधेंद्र वाचा बोले " नाम इंद्राचा हेजीव ( हें आहे ) नांवाचा साक्षेप किती! तेणें तूं काय करिसी ? अंगीकार केला काय ? इंद्रासीं ( काय ) निर्धार बोलूं ? तंव ते सुकुमार चंद्राकारवदनातें बोले.

वाचा बोले—भाषण बोलता झाला. ' नाम...हेजीव—माझें नांव पुसतेस तर इंद्राचा दूत हेंच माझें नाव आहे. साक्षेप—आग्रह. अत्युत्कंठा. कोणेक कामाविषयींचें अगत्य. तेणें...करिसी—तें समजून तुला काय करावयाचें आहे, तें समजल्यानें तुला काय फायदा. अंगीकार करणें—स्वीकारणें, मान्य करणें. निर्धार—निश्चय. सुकुमार—नाजुक कोमल. चंद्राकारवदनातें—चंद्राचा आकार तो चंद्राकार त्याप्रमाणें आहे वदन ज्याचें तो त्याप्रत ( बहुव्री. ) नळाला.

व. ति.—**ऐरावतावरि बसोनि विमानदेशीं ।**
**जो संचरे सुरपती सुखसंपदेशीं ॥**
**मी भूमिकेवरि असोनि तयास कांहीं ।**
**मागावया तरि कशी मज लाज नाहीं ॥ १९२ ॥**

मी भूमिकेवरि असोनि जो सुरपती ऐरावतावरि बसोनी विमानदेशीं सुखसंपदेशीं संचरे तयास मज मागावया कांहीं लाज तरि कशी नाहीं ?

भूमिकेवरि—पृथ्वीवर. असोनि—रहाणारी असून. सुरपती—इंद्र ( सुराचा स्वामी ) ऐरावतावरि—ऐरावत नांवाच्या श्रेष्ठ हत्तीवर. विमानदेशीं—विमानाचा देश ह्म० प्रदेश तो ह्म० ज्या ठिकाणीं विमानांची गती आहे, असा ( अर्थात् ) आकाश—( येणेंकरून श्रेष्ठत्व दाखविलें आहे. इंद्राची सर्व विशेषणें श्रेष्ठत्व दाखविणारीं कवीनें योजिलीं आहेत व तेणेंकरून अशा श्रेष्ठ इंद्रानें मानानें लघु अशा दमयंतीस

याचना करावी हें लाजिरवाणें आहे असें दाखविलें आहे. ) सुखसंपदेशीं–सुख आणि संपदा, ( द्वंद्व ) तिच्यासह संचरे–जातो. वास्तव्य करतो.

घनाक्षरी—**नळा वेगळा भ्रतार । नलगे स्वप्नीं हें साचार ॥**
**ऐसा निश्चय विचार । तंव राजेंद्र बोलतो ॥**
**टाकुनि इंद्राचा संभ्रम । धरिसी कां तूं नळभ्रम ॥**
**जाईल विश्रामविभ्रम । नसता श्रम होईल ॥**
**तुझें सौंदर्य पहावया । धरी सहस्राक्ष काया ॥**
**तया वरी देवराया । नळमाया टाकुनी ॥**
**अथवा तुज तो मोहला । होऊं नेदी नैषधाला ॥**
**यास्तव त्याच इंद्राला । माळ गळां घालावी ॥ १९३ ॥**

' नळा वेगळा भ्रतार स्वप्नीं नलगे–' हें साचार ( आहे ) ऐसा निश्चय विचार. तंव राजेंद्र बोलतो ( कीं ) तूं इंद्राचा संभ्रम टाकुनी नळभ्रम कां धरिसी ? ( तेणें ) विश्राम–विभ्रम जाईल ( आणि ) नसतां श्रम होईल. तुझें सौंदर्य पहावया सहस्राक्ष काया धरी, नळमाया टाकुनी तया देवराया वरी अथवा तो तुज मोहला ( ह्मणून तो ) नैषधाला होऊं नेदी. यास्तव त्याच इंद्राला ( त्वां ) माळ गळां घालावी.–'

नळावेगळा–नळाशिवाय दुसरा. भ्रतार–नवरा. नलगे–नको. साचार–खास. निश्चय विचार–निश्चित बेत निर्धार. तंव–तों. राजेंद्र–नळराजा. नळभ्रम–नळाचा भ्रम–नळ मिळावा असा चुकीचा समज, आग्रह. ( षष्ठी तत्पु. ). विश्रामविभ्रम–विश्रांतिविषयींचा चुकीचा समज. नळ मिळाल्यानें आपणांस विश्राम मिळेल असा चुकीचा समज. जाईल–नाहींसा होईल. नसतां–आपल्याला नको तो. सहस्राक्ष—सहस्र ह्म० एक हजार आहेत आक्षि ह्म० डोळे ज्याला तो इंद्र ( बहुव्री. ). काया धरीं–देह धारण करतो. नळमाया—नळाची माया प्रेम ( षष्ठी तत्पु. ). होऊं नेदी–मृत्युलोकीं नांदू देणार नाहीं. अथवा–नाहींतर. इंद्राचें तुझ्यावर प्रेम बसलें असल्यानें तूं नळाला वरलें तर तो आपल्या सामर्थ्यानें नळाला पृथ्वीवर राहूंच देणार नाहीं. हा अर्थ.

व. ति.—**एणेंपरीच अनळासि यमाधिपासी ।**
**पाशीस ही तरि वरी ह्मणता नृपासी ॥**

**आधार लेश न वदे नवसारसाक्षी ।**
**होते तयासि सुरनायक गुप्त साक्षी ॥ १९४ ॥**

एणेंपरीच अनळासि ( किंवा ) यमाधिपासी ( किंवा ) पाशीसही तरी वरि ( म्हणून ) म्हणतां नवसारसाक्षी आधार लेश न वदे. सुरनायक तयासि गुप्त साक्षी होते.

एणेंपरिच–इंद्रासंबंधानें बोलला त्याप्रमाणेंच. अनळासि–अग्नीस तरि. यमाधिपासी–यमधर्मास तरी. किंवा पाशीस–पाश आहे ज्या जवळ तो ह्म० वरुण त्यास पाशीस तरी. वरि–नवरा ह्मणून पसंत कर. असें ह्मणतां. नवसारसाक्षी–नव ह्म० नूतन नवें असें जें सारस ह्म० कमल त्या प्रमाणें आहेत अक्षि ह्म० नेत्र जीचे ती नवकमललोचना दमयंती. नृपासी–राजाला ( नळाला ) आधार ... वदे–आधार मानायाला लेशमात्र जागा सांपडेल असें बोलेना, बोलली नाहीं. सुरनायक–सुरांचे नायक. सुर...होते–या गोष्टीस देवांचे नायक ( इंद्र, अग्नि, यम वरुण ) हे गुप्तपणें साक्षी होते. ह्म० लपून पहात होते.

व. ति.—**ऐसा अवंचक वदोनि नृपाळ आला ।**
**इंद्रादिकासहि निवेदितवृत्त झाला ॥**
**पाचारिले मग महींद्र विदर्भभूपें ।**
**आले समस्तहि सभेसि सहर्षरूपें ॥ १९५ ॥**

ऐसा अवंचक नृपाळ वदोनि ( परत ) आला ( आणि ) इंद्रादिकांसहि निवेदितवृत्त झाला. मग विदर्भभूपें महींद्र पाचारीले ( व ) समस्तही ( महींद्र ) सहर्षरूपें सभेसि आले.

अवंचक–वंचक नाहीं तो, न फसविणारा. आला–दमयंतीकडून इंद्रादिकांकडे परत आला. इंद्रादिकांस–इंद्र आहे आदि ह्म. प्रारंभी ज्यांच्या ते त्याप्रत ह्म० इंद्र, अग्नि, वरुण, यम ह्यांस. निवेदितवृत्त–निवेदिलें ह्म० कळविलें आहे वृत ह्म० हकीकत ज्यानें तो ( बहुव्री ). सहर्षरूपें–हर्षासहित तें सहर्ष असें आहे रूप ज्याचें त्याप्रमाणें सहर्षरूपें ( अव्ययीभाव. क्रियाविशेषण. )

ओंवी—**इंद्रादिक ते ही अधिप । धरून आले नळरूप ॥**
**सभे बैसले अमूप । जेथें भूप शोभती ॥ १९६ ॥**

**आला नळही भूपाळ । कीर्तिरूपें जो विशाळ ॥**
**तदा दमयंती वेल्हाळ । सखियांसीं बोलते ॥ १९७ ॥**
**नळराजहिरा वरिला । तोचि मनीं म्या धरिला ॥**
**सुर किंवा नर भला । न वरी अन्यातें निश्चयें ॥१९८ ॥**

ते इंद्रादिक अधिपही नळरूप धरून आले ( आणि ) जेथें अमूप भूप शोभत ( त्या ) सभे बैसले.

जो कीर्तीरूपें विशाळ ( तो ) नळभूपाळही आला तदा, वेल्हाळ ( असी ) दमयंती सखियासीं बोलते '–म्या नळराजहिरा वरिला ( आणि ) तोचि मनीं धरिला अन्यातें ( मग तो ) सुर किंवा भला नर ( असो ) निश्चयें न वरी.'

इंद्रादिक–इंद्र आदिकरून. अधिप–स्वामी ( एथें दिक्पाळ ) नळरूप–नळाचे रूप तें ( षष्ठीतत्पु. ) अमूप–पुष्कळ. कीर्तिरूपें–कीर्ति हेंच रूप तेणेंकरून ( क्रियाविशेषण 'विशाळ' या विशेषणाचें केलें तरी चालेल ). ( कर्मधारय ) नळराजहिरा–नळराज हाच हिरा तो नळराजहिरा ( कर्मधार ) भला–सज्जन, चांगला.

ओंवी–**ऐसें बोलोनी सुंदरी । बैसे शिबिकेभीतरीं ॥**
**आली राजसभांतरीं । बरोबरी शारदा ॥ १९९ ॥**
**बोले शारदा तियेला । ऐके राजांच्या नामाला ॥**
**मना येईल तयाला । माळ गळां घाली तूं ॥ २०० ॥**

सुंदरी, ऐसें बोलोनी, शिबिकेभीतरीं बैसे ( आणि ) शारदा बरोबरी राजसभांतरीं आली. तियेला शारदा बोले " राजांच्या नामाला ऐकें ( आणि मग ) तूं मना येईल तयाला माळ गळां घाली."

शिबिकेभीतरीं–मेण्यांत किंवा पालखींत ( शिबिका ह्म० मनुष्यांनीं खांद्यावर घेऊन वाहून नेण्याचें वहान आणि भीतरीं–शब्दयोगीं अव्यय– ) राजसभांतरीं–राजाच्या सभेचें अंतर ह्म० आंतला भाग तो त्यांत ( षष्ठी तत्पु. ) गळां घाली हें संयुक्त क्रियापद केलें पाहिजे.

स्वयंवराच्या वेळीं वधू ( नवरी ) राजसभेमध्यें वर निवडण्याकरितां जाऊं लागली म्हणजे जिला तेथें जमलेल्या राजांची चांगली माहिती असून जी मोठी

चतुर आहे अशा प्रकारची एक स्त्री तिच्या बरोबर असे अशी वहिवाट होती. तशी ही एथें शारदा आहे. ( नवनीत ५ वी आवृत्ति पान ४०७ ).

शा. वि.—**हा राजा ऋतुपर्ण नाम धरिता हारावली कंधरीं ।**
**हा राहे शरयूसमीप नगरीं हा राजसे आदरी ॥**
**हा राजीवदलाक्ष सद्गुणनिधी फारा जनांचा महा ।**
**थारा हाच वरी रिपूंशि परते सारावयाचा पहा ॥ २०१ ॥**

हा राजा ऋतुपर्ण नाम धरिता ( आहे ) कंधरीं हारावली ( धरिता आहे ) हा शरयूसमीप नगरीं राहे. ( हे ) राजसे, हा आदरी. हा राजीवदलाक्ष ( आहे ) हा सद्गुणनिधी ( आहे ) हा फारा जनांचा महा थारा ( आहे ) ( आणि ) हा रिपूंशि परते सारावयाचा ( आहे ) पहा.

धरिता—धारण करणारा. कंधरीं—गळ्यांत. हारावली—हारांची आवली ह्म० पंक्ति ओळ अर्थात अनेक हार ( षष्ठी तत्पु. ) शरयूसमीप—शरयूसमीपची शरयू नदीच्या जवळ ( काठांवर ) बसलेल्या ( विशेषणासारिखा उपयोग केला आहे तो लक्षांत ठेवण्यासारखा आहे ). नगरीं—पुरींत. आदरी—स्वीकारी, स्वीकार कर, ( मूळचा सन्मान करणें असा धात्वर्थ आहे ) राजीवदलाक्ष—राजीवाचें ह्म० कमलाचें दल ह्म० पान त्याप्रमाणें आहेत अक्षि ज्याचे तो ( बहुव्री. ) मोठ्या व सुंदर डोळ्याचा. सद्गुणनिधी—सत ह्म० चांगले जे गुण ते त्यांचा निधि ह्म० समुद्र तो सद्गुणनिधी. फारा—पुष्कळ ( जनांचा या विभक्त्यंत नामामुळें सामान्य रूप ). महा—मोठा. थारा—आश्रयस्थान. परते—दूर पलीकडे. सारावयाचा—सारणारा. ( कर्तरी षष्ठी दामल्यांचें व्याकरण पान ६७६ पहा ). पहा—समज.

व. ति.—**एणेंपरीच बहु भूप निवेदिजेले ।**
**हीच्या मनासचि न येति उगेचि ठेले ॥**
**जेथें वळी धरुनि पंचनळी बसे ते ।**
**तेथें विरिंचितनये समवेत येते ॥ २०२ ॥**

एणें परीच बहु भूप निवेदिजेले ( परंतु ते ) हीच्या मनासचि न येति ( म्हणून ) उगेचि ठेले. जेथें ते पंचनळी वळी धरुनि बसे तेथें विरिंचितनये समवेत येते.

भूप-राजे ( मूळचें कर्म असून कर्मणी प्रयोगामुळें प्रथमांत कर्ता, निवेदिजेले या क्रियेचा ). निवेदिजेले-सांगितले गेले. मनास न येति-पसंत पडले नाहींत. उगेच-चुपचाप. ठेले-बसले. पंचनळी-पांच नळांचा समुदाय ती पंचनळी ( द्विगु. ) नळी-ओळ याचा अपभ्रंश. विरिंचितनये समवेत-विरिंचिची ह्म॰ ब्रह्मदेवाची तनया ह्म॰ मुलगी ती तिजसमवेत ह्म॰ बरोबर. शारदा हें ब्रह्मदेवाच्या मुलीचें नांव आहे. म्हणून दमयंतीच्या सखी शारदेलाही विरिंचितनया म्हटलें आहे.

ओंवी—**बोलें शारदा वचन । एथें बाई सावधान ॥**
**बरें घालूनिया मन । वर-लाभें सुखी हो ॥ २०३ ॥**

शारदा वचन बोले " बाई, एथें बरें ( आणि ) सावधान मन घालूनिया वरलाभें सुखी हो. "

बरें-नीट विचार करून. सावधान-अवधाना सहित तें. अवधान ह्म॰ लक्ष-पूर्ण लक्ष देऊन. वर-लाभें-वर ह्म॰ नवरा. त्याचा लाभ-ह्म॰ प्राप्ति त्यानें (षष्ठी तत्पु.) तुझ्या मनांतला नळराजा येथें आहे असें या रीतीनें शारदेनें सूचित केलें आहे.

व. ति.—**ज्याचीं पदें धरिति देव शिरोललामीं ।**
**स्वाराज्य जो मिरवितो गजराजगामी ॥**
**जो वज्रपाणि बहुलोचन कांतिधारी ।**
**हा पाहिजे तरि वरी नळरूपधारी ॥ २०४ ॥**

ज्याचीं पदें देव शिरोललामीं धरिती, जो गजराजगामी ( असून ) स्वाराज्य मिरवितो, जो वज्रपाणी बहु-लोचन ( व ) कांतिधारी ( आहे ) ( असा ) हा नळरूपधारी पाहिजे तरि वरी.

ज्याचीं पदें-ज्याचे पाय देव शिरोललामीं-शिराच्या ह्म॰ मस्तकाच्या ललामीं ह्म॰ भूषणाचे ठिकाणीं धरिति ह्म॰ ज्याचे पाय देव भूषणाप्रमाणें मस्तकावर धारण करितात. गजराजगामी-गजांचा राजा तो गजराज ह्म॰ ऐरावत, त्यावर बसून गमन करणारा तो ( मध्यमपदलोपी ). वज्रपाणि-वज्र आहे पाणिच्या ठायीं ह्म॰ हातांत ज्याच्या तो ह्म॰ वज्र धारण करणारा इंद्र. ( बहुव्री. ) स्वाराज्य-स्वर्+राज्य, स्वर्गाचें राज्य. बहुलोचन-बहु ह्म॰ पुष्कळ आहेत लोचन ह्म॰ डोळे ज्याला तो ( पूर्वी एकदां इंद्रानें अहल्या सतीसंबंधानें लंपट होऊन तिचा नवरा जो गौतम ऋषि त्याचें रूप

धारण करून तिला भ्रष्ट केलें. त्यावरून गौतम ऋषींनीं त्याला १००० एक हजार भगें पडतील असा शाप दिला. परंतु इंद्रानें व देवांनीं त्यांची प्रार्थना करून उ:शाप मागितल्यावरून भगांचे डोळे होतील असा उ:शाप मिळाला. त्यावरून इंद्रास सहस्राक्ष असें अन्वर्थक नांव आहे. नवनीतांत बहुलोचन या विशेषणानें इंद्राचें कुरूपत्व दर्शवून तो वरण्यास अयोग्य असल्याचें शारदेनें व्यंगानें सुचविलें अशी टीप दिली आहे त्यापेक्षां याच विशेषणानें त्याचें कपटाचरण व जारकर्म सुचवून त्यावरून तो वरण्यास अयोग्य आहे ही सूचना केली असें ह्मणणें ज्यास्त सयुक्तिक दिसतें ). नळरूपधारी—नळाचें रूप धारण करणारा तो नळरूपधारी ( उपप. ) अर्थात् खरा नळ नव्हे असा भाव.

श्लेष अलंकार.

व. ति.—**साहील कोण सजणे बहु तेज याचें ।**
**मध्यस्थरूप धरितो हरिचे यमाचें ॥**
**स्नेहा धरी अधिक होय तमासि वारी ।**
**हा पाहिजे तरि वरी नळरूपधारी ॥ २०५ ॥**

सजणे याचें बहु तेज कोण साहील ? ( हा ) हरिचे ( आणि ) यमाचें मध्यस्थरूप धरितो. ( हा ) अधिक स्नेहा धरी. ( पक्षीं, स्नेहा धरी अधिक होय. ) ( आणि ) तमासि वारी होय. हा नळरूपधारी पाहिजे तरी वरी.

सजणे—हे सखे. याचें...साहील—याचें हें तेज इतकें उग्र आहे कीं तें कोणासही सहन करवणार नाहीं. (ही त्याच्या तेजाची उग्रता सुचवून तो वरण्यास अयोग्य आहे असें शारदेनें सुचविलें. नवनीत पान ४८० ) हरिचे...धरितो—हरि ह्म० इंद्र हा पूर्व दिशेचा अधिपति व यम हा दक्षिण दिशेचा अधिपति व अग्नि हा पूर्व व दक्षिण या दिशांच्या मध्यें असलेल्या आग्नेय दिशेचा अधिपति आहे म्हणून, किंवा अग्नि नळरूप धारण करून यमाच्या व इंद्राच्या मध्यें बसला म्हणून 'मध्यस्थ रूप धरितो ' वगैरे कवीनें लिहिलें आहे. स्नेह—प्रीति, पक्षीं, तेल. स्नेहा...होय—हा तुझ्यावर फार प्रीति करतो असा बाह्यार्थ. दूसरा अर्थ तेल मिळालें म्हणजे हा अधिक होतो म्ह. प्रज्वलित होतो. ही गोष्ट रोजच्या अनुभवाचीच आहे. वारी—निवारण करतो.

श्लेष अलंकार.

च. ति.—**संपूर्ण ते समज यास्तव दक्षिणाशा ।**
**पाप्यास दंड धरितो करितो विनाशा ॥**
**देहीं जया मिरवते घनकांति भारी ।**
**हा पाहिजे तरि वरी नळरूपधारी ॥ २०६ ॥**

ते संपूर्ण दक्षिणाशा यास्तव ( आहे, असें ) समज. हा पाप्यास दंड धरितो, विनाश करितो. जया देहीं भारी घनकांति मिरवते, तो हा नळरूपधारी पाहिजे तरी वरी.

ते-ती. संपूर्ण-सगळी, समग्र. दक्षिणाशा-दक्षिण नांवाची आशा ह्मo दिशा ती. यास्तव-याच्याच करितां आहे. ते संपूर्ण...समज-जो यम सर्व दक्षिण दिशेचा मालक, स्वामी आहे. दंड धरितो-शिक्षा करितो. देहीं-शरीरीं. मिरवते-शोभते, ( आहे. ) घनकांति-घन पुष्कळ अशी कांति ती; पक्षीं घनाच्या कांती सारखी कांति ती, ( कर्मधा. ) मेघा सारखा काळा रंग. भारी-पुष्कळ, दाट ( रंगानें काळा सबब वरण्यास अयोग्य-व्यंग्यार्थ-नवनीत ).

श्लेष अलंकार.

च. ति.—**आधार हाच सजणे बहु जीवनाचा ।**
**रक्षी दयेंकरुनि मान ऋषीजनाचा ॥**
**यादांस फार ह्मणती जन सौख्यकारी ।**
**हा पाहिजे तरि वरी नळरूपधारी ॥ २०७ ॥**

सजणे, हाच बहु जीवनाचा आधार ( आहे ) ( हा ) दयेंकरुनि ऋषीजनांचा मान रक्षी. ( हा ) यादांस फार सौख्यकारी ( आहे असें ) जन ह्मणती. हा नळ-रूपधारी पाहिजे तरि वरी.

जीवनाचा-पाण्याचा ( पक्षीं ) प्राणांचा अर्थात् प्राणधारी मनुष्यांचा व इतर प्राण्यांचा. आधार-आश्रय, थारा. वरुण हा पाणी देतो व पाणी हें सर्व प्राण्याचें जीवन, म्हणून वरुण हा प्राण्यांचा आधार आहे असें म्हटलें आहे. ( हा ) दयेंकरुनि...रक्षी-पूर्वी एकदां वरुणानें यज्ञ केला तेव्हां त्याला ऋत्विज पाहिजे होते. ह्मणून वरुणाचा मुलगा बंदी यानें वादांत कहोड वगैरे ऋषींचा पराजय करून त्यांस समुद्रांत बुडविलें आणि अशा रीतीनें आपल्या

बापास ( वरुणास ) ऋत्विज पाहिजे होते ते दिले. पुढें यज्ञ संपल्यावर वरुणानें त्यांचा मोठा आदर सत्कार करून परत पाठविलें अशी कथा आहे ( भारत व. प. अ. १३२ ) तिला अनुलक्षून हें लिहिलें असावें ( नवनी. ५ वी आवृत्ती पान ४०८ ). यादांस ह्म० माशांस, मीनांस. सौख्यकारी–सुखाचा भाव तें सौख्य. सौख्य करणारा तो सौख्यकारी–( उपप. ). हा–वरुण. ह्या श्लोकांत जीं विशेषणें आहेत तीं सर्व, वरुण इतरांचें बरें करण्यांत सर्वदा गुंतलेला असतो, त्यास स्वस्त्रीशीं बोलण्याचालण्यालाही वेळ होत नाहीं असें सुचवितात, ह्यावरून तो वरण्यास अयोग्य आहे हें उघड आहे ( नवनीत ५ वी आ. पान ४०९ ).

वरील चारी श्लोकाचा अर्थ नळाकडेसही लागू शकतो. इंद्रादि देवांनीं नळाचें रूप धारण केलें होतें, म्हणून शारदेनें चातुर्यानें त्यांचें वर्णनही असें केलें आहे कीं तें खुद्द त्या देवाला व नळाला दोघांनाही लागू शकावें. म्हणूनच या श्लोकांत वर्ण्य देवाचें नांव कोठेंही न देतां फक्त वर्णनावरून तो अमुक देव असल्याचें सुचविलें आहे. ज्या नैषध काव्याचें अनुकरण करण्याचा प्रयत्न कवीनें येथें केला आहे त्यांतील पंच नळांच्या वर्णनाचे श्लोक फार प्रसिद्ध असून त्यांतील प्रत्येकाचा अर्थ चारी देव व नळ यांना लागू होतो. नळपक्षीं वरील श्लोकांचा अर्थ खालीं दिला आहे. श्लोक २०४–ज्या नळराजाचे पायीं देव देखिल नमन करतात, ज्याचें राज्य स्वर्गांतल्या राज्यासारखें समृद्ध आहे, जो नेहमीं मोठ-मोठ्या हत्तीवर बसतो, ज्याचे भुज वज्राप्रमाणें दृढ व सामर्थ्यवान् आहेत, जो अनेक डोळे असल्याप्रमाणें अत्यंत दक्षतेनें वागतो, जो तेजस्वी आहे, त्या सुंदर रूपवान् नळाला तूं वर.

श्लोक २०५ ज्याचें तेज कोणाला सहन करण्यासारखें नाहीं, ज्यानें इंद्र यम इ० तर्फे तुझी मागणी करण्यासाठीं मध्यस्थी केली म्ह० जासूदगिरी पतकरली, जो अत्यंत प्रेमळ आहे, जो अज्ञानरूपी तमाला दूर करतो म्ह. स्वतः ज्ञानी असून दुसऱ्याचें अज्ञान दूर करतो अशा ह्या सुंदर नळाला तूं वर.

श्लोक २०६ ज्याच्या योगानें दक्षिणारूप धन मिळण्याची याचकांची आशा चांगल्या रीतीनें पूर्ण होते, म्ह० जो धनदानानें याचकांची आशा पूर्ण करतो, जो पाप्यांना म्ह. अपराध्यांना दंड म्ह. शासन करतो व शत्रूंचा विनाश करतो ज्याच्या शरीरावर अत्यंत कांति आहे, त्या सुंदर नळाला तूं वर.

श्लोक २०७ जो पुष्कळ प्राण्यांना जीवनाधार आहे, म्ह० ज्याच्यावर पुष्कळ लोक अवलंबून आहेत, जो ऋषिजनांचा आदर सत्कार करून त्यांचा दयेनें सांभाळ करतो, ज्या नळाला दास म्ह० सेवक व जन म्ह० प्रजाजन " हा फार सौख्य देणारा आहे " असें म्हणतात, म्ह० जो त्यांना फार सौख्य देतो, त्या सुंदर नळाला तूं वर.

श्लेष अलंकार.

व. ति.—**होतील नंदन विलास जयास तो हा ।**
**आहे धनंजयहि धर्महि जाणतो हा ॥**
**रत्नाकरीं तुज विराजवितां विहारी ।**
**हा पाहिजे तरि वरीं नळ रूपधारी ॥ २०८ ॥**

जयास नंदनविलास होतील तो हा, धनंजयहि आहे ( व ) धर्महि जाणतो हा, ( जो ) विहारी ( असून ) तुज रत्नाकरीं विराजविता ( आहे ) तो हा रूपधारी नळ पाहिजे तरी वरीं.

नंदनविलास—नंदनांतील ह्म० नंदनवनांतील विलास ह्म० सुखसोहळे ते ( इंद्राचें उपवनास नंदनवन असें अन्वर्थक नांव आहे. या उपवनांत सर्व प्रकारचें सौख्य भोगतां येतें असी प्रसिद्धी आहे. ) धनंजय—धनातें जिंकतो तो धनंजय. ह्म० संपत्तिमान, पक्षीं, अग्नि. रत्नाकरीं—रत्नाचा आकर ह्म० खाण तो ( ष. त. स. ) त्या ठिकाणीं; पक्षीं, समुद्रांत. तुज...विराजविता. जो तुला जणुं काय रत्नांचे खाणींतच ठेवील. ह्म० तुला रत्नांनीं मढवून काढील; नाना प्रकारचीं रत्नजडित भूषणें अलंकार लेववील. विहारी—नानाप्रकारचे सुखविलास करणारा. ह्या श्लोकानें हा नळराजा तुला वरील चारी देवांनीं जें सुख दिलें असतें तें सर्व एकटा देऊं शकेल असें सुचविलें आहे. इंद्राप्रमाणें हा नंदनवनाचे म्ह. उत्तमोत्तम आनंददायक वनाचे विलास देईल. हा अग्नीप्रमाणें धनंजय म्हणजे अपार धन मिळविणारा आहे म्ह. संपत्तीचें सर्व सुख तुला देईल. हा यमाप्रमाणें धर्म म्ह. शास्त्रधर्म जाणतो. म्ह. धर्मानें वागून तुला सुख देईल. हा वरुणाप्रमाणें रत्नाकरीं म्ह. रत्नाच्या सांठ्यांनीं तुला विराजवील म्ह. शोभिवंत करील. म्हणून तूं यालाच माळ घाल असा भाव.

स्वागता.

**शारदेस मग राजसुता हे । शारदेंदुवदना वदता हे ॥**
**शेवटील नळ हा मज बाई । मानला बहु मनीं सुखदाई ॥ २०९ ॥**

मग हे शारदेंदुवदना राजसुता शारदेस वदताहे ( कीं ) " बाई, हा शेवटील सुखदायी नळ मज मनीं बहु मानला. "

मग—तदनंतर; तेव्हां. शारदेंदुवदना—शरत्काळसंबंधी तो शारद ह्म० शरद् ऋतूंतील, अर्थात् ढग नसल्यामुळें पूर्ण दैदीप्यमान असा, जो इंदु ह्म० चंद्र त्याप्रमाणें आहे वदन ह्म० तोंड जीचें ती; निर्मल अशा चंद्राप्रमाणें तोंडाची. राजसुता—राजाची सुता ह्म० कन्या ती. वदताहे—वदत आहे, बोलती झाली. सुखदाई—सुख देणारा तो सुखदाई. मानला—आवडला, पसंत पडला.

ओंवी—**तेव्हां दमयंती सुंदरी । इंद्रादिकांना नमस्कारी ॥**
**तया बोलली उत्तरीं । अमृतापरीस मधुर ॥ २१० ॥**
**माझा भीम जैसा पिता । तैसे तुह्मी जी तत्वतां ॥**
**करा कन्यादान आतां । नळनाथाचें करीं ॥ २११ ॥**

तेव्हां दमयंती सुंदरी इंद्रादिकां नमस्कारी ( आणि ) तया उत्तरीं अमृतापरिस मधुर बोलली ( कीं ) " जी, जैसा भीम माझा पिता ( आहे ) तैसे तत्वतां तुह्मी ( अहां ) ( यास्तव ) आतां नळनाथाचे करीं कन्यादान करा.

अमृतापरीस मधुर—अमृताहून गोड. तत्वतां—खरोखर. नळनाथाचे—नळ हाच नाथ ह्म० पति त्याच्या. करीं—हातीं, हातावर. कन्यादान—कन्येचें दान तें.

द्रु. वि.

**सुर समस्त इच्या वरनिश्चयें । सुरस-मस्त असें वदले स्वयें ॥**
**नळवरासि वरोनि सुखी असे । तुज नको जन कोण ह्मणे असें ॥ २१२ ॥**

इच्या वरनिश्चयें सुरसमस्त ( असे ) समस्त सुर स्वयें असे वदले ( कीं ) " नळवरासि वरोनि सुखी असे. तुज ' नको ' असें कोण जन म्हणे ? "

इच्या—दमयंतीच्या. वरनिश्चय—वर ह्म० नवरा त्याचा निश्चय तो ह्म० कोणता नवरा वरावयाचा याजबद्दलचा तिचा निश्चय त्या योगानें, सुरसमस्त—सु ह्म०

चांगला जो रस त्यानें मस्त ह्म० माजलेले; कैफांत धुंद झालेले ते ह्म० तिच्या मधुर बोलण्यानें आनंदांत गुंग झालेले. समस्त—सर्व. सुर-देव ( इंद्र, अग्नि, वरुण, यम. ) स्वयें—स्वतः आपण होऊन. नळवरासि—नळ हाच वर त्यासि ( कर्मधार० स. ) तुज नको...ह्मणे—नळाला माळ घालूं नको ( वरूं नको ) असें कोणता मनुष्य म्हणेल ? अर्थात् कोणीही तसें म्हणणार नाहीं.

प्रश्नालंकार.

व. ति.—**मावेचना सुख मनीं कमनीय बाला ।**
**मायेसही विसरली न पुसेचि बाला ॥**
**दूर्वादळीं कदलिबंधमधूकमाळा ।**
**तीनें अलंकृत करी नळकंठनाळा ॥ २१३ ॥**

( जिच्या ) मनीं सुख मावेचना ( अशी ) कमनीय बाला मायेसही विसरली बाला न पुसेचि ( आणि ) दूर्वादळीं• कदलिबंधमधूकमाळा, तीनें नळकंठनाळा अलंकृत करी.

मावेचना—मावत नाहीं. कमनीय—मनोहर. बाला—युवती, तरुणी, अल्पवयस्का. मायेस—आईस. बाला—बापाला. दूर्वादळीं—दूर्वांकुरांनीं युक्त. कदलिबंधमधूकमाला—कदलीचे ह्म० केळीचे बंध ह्म० बांधण्याचें साधन तें कदलिबंध ह्म० केळीचें सोपट. त्यांनीं युक्त अशी मधुकाची ह्म० दुपारीची माला ह्म० हार ती. तीनें—त्या माळेनें. नळकंठनाळ—नळाचा कंठ हाच नाळ कमळाचा देंठ तो. कमळाच्या देंठाप्रमाणें बारीक व सुंदर असा नळाचा कंठ. अलंकृत करी—शोभिवंत करी. तीनें...करी—त्या माळेनें नळाचा कंठ शोभिवंत करी ह्म० ती माळ नळाचे गळ्यांत घाली. ( माळ गळ्यांत घालणें हें नवरा पसंत केल्याचें लक्षण आहे. )

ओंवी—**चौघे श्रेष्ठ सुरेश्वर । देते झाले अष्ट वर ॥**
**मस्तकीं ठेवोनी कर । दोन दोन एकेकें ॥ २१४ ॥**
**देऊनिया तया वर । स्वर्गभुवना गेले सुर**
**निराश होऊनी नरेश्वर । जाते झाले स्वस्थाना ॥ २१५ ॥**

चौघे श्रेष्ठ सुरेश्वर मस्तकीं कर ठेवोनी एकेकें दोन दोन ( असे ) अष्ट वर देते

झाले. तया वर देऊनि सुर स्वर्गभुवना गेले ( आणि ) निराश होऊनि नरेश्वर स्वस्थाना जाते झाले.

सुरेश्वर–सुरांत ईश्वर म्ह० मुख्य ते. एकेकें–एक एकानें. स्वर्गभुवना–स्वर्ग हेंच भुवन त्याप्रत ( क. धा. ) नरेश्वर–नळाशिवाय इतर जमलेले ( स्वयंवराला आलेले ) राजे. स्वस्थाना–आपआपल्या नगरास.

शिख.—**नृपाळाचे मांडीवरि बसुनि मांडी हरिख ते ।**
**तया पाहों आले जन सकल झाले हरिखते ॥**
**महावाद्यें नाना निनदहि तनाना मग घडे ।**
**पिता तीचा पाटींभर धनहि वांटी बहु विडे ॥ २१६ ॥**

ते नृपाळाचे मांडीवर बसुनि हरिख मांडी, तयां पाहों आले ( ले ) सकळ जन हरिखते झाले. मग नाना महावाद्यें तनाना निनदहि घडे ( आणि ) तिचा पिता बहु विडे ( व ) पांटीभर धनहि वांटी.

ते–दमयंती. नृपाळाचे–नळराजाच्या. हरिख मांडी–हर्ष मांडिती झाली, हर्ष पावली. आनंदित झाली. तयां–त्या उभयतांस, नळदमयंतीस. पाहों आले–पहाण्यास आलेले. हरिखते–हर्षित, आनंदित. नाना महावाद्यें–नाना प्रकारच्या महावाद्यानीं ( महावाद्यें–तृतीया. ) तनाना–अनुकरणवाचक. निनद–गोंगाट, मोठा शब्द, मोठ्या आवाजाचा गजर. पांटीभर–( सामान्यतः ) पुष्कळ या अर्थी. वांटी–देता झाला.

ओंवी—**राजा निरोपातें घेत । मग दमयंती समवेत ॥**
**आपल्या नगरातें जात । नांदे आनंदभरें ॥ २१७ ॥**
**नानापरीचें मिष्टान्न । चारी दिवस भोजन ॥**
**वधूवरें मिरवून । घरभरणी करविली ॥ २१८ ॥**

चारी दिवस नानापरीचें मिष्टान्न भोजन ( देऊन ) वधूवरें मिरवून घरभरणी करविली. मग राजा निरोपातें घेत दमयंती समवेत आपल्या नगरातें जात. ( आणि ) आनंदभरें नांदे.

चारी दिवस–लग्नसोहाळा साधारणपणें चार दिवस होत असतो त्या रूढीस

अनुसरून. नाना परीचें—नाना प्रकारचे ( पर—तऱ्हा, प्रकार, स्त्रीलिंगी ) मिष्टान्न—मिष्ट ह्म॰ गोड असें अन्न आहे ज्यांत तें ( बहुव्री. ) विशेषण भोजन याचें. वधूवरें—वधू नवरी मुलगी आणि वर नवरा मुलगा तीं ( द्वंद्व ) नवरानवरी. घरभरणी—गृहप्रवेश. ( लग्न लागल्यावर नवरा मुलगा आपल्या नवपरिणीत वधूला प्रथम आपल्या गृहीं मोठ्या थाटानें आणतो त्या सोहाळ्यास घरभरणी ह्मणतात. ) राजा—नळराजा. निरोपातें घेत—निरोप घेऊन, भीमक राजापासून जाण्याची परवानगी घेऊन. आनंदभरें—आनंदाचा भर तो त्यानें ह्म॰ सुखानें, आनंदानें. नांदे—रहाता झाला.

---

# परिशिष्ट १ लें.

टीप:–मूळांतील ज्या श्लोकांच्या नंतर खालील श्लोक नवनीताच्या जुन्या प्रतींत दिलेले आहेत. त्यांचा अनुक्रम नंबर त्या त्या श्लोकांपुढें देऊन पुढें ' अ ' ' आ ' असें लिहलें आहे.

व. ति.—द्वारीं झुलोत गजसंघ हिंसोत वाजी
गाजी तुला सकल लोक असोत राजी
सोमाभिरामवदना सदनांतरंगीं
क्रीडा करो तुजसवें ललना पलंगीं ॥ ११ अ ॥

द्वारीं गजसंघ झुलोत ( आणि ) वाजी हिंसोत. गाजी अशा तुला सकल लोक राजी असोत. सोमाभिरामवदना ललना सदनांतरंगीं पलंगीं तुजसवें क्रीडा करो.

गाजी–शूर, बहादर. राजी–खुष. सोमाभिरामवदना–सोमाप्रमाणें ह्म. चंद्राप्रमाणें अभिराम आनंद देणारें वदन ह्म. तोंड आहे जिचें ती सोमाभिरामवदना ( बहुव्री. ). सदनाचे ह्म. घराच्या अंतरंगांत अंतःपुरांत सदनांतरंगीं.

आशीरलंकार.

दिंडी—नैषधी ते मोहिली गुप्तरूपें ॥
मनीं लावियला वेध कुसुमचापें ॥
असो गौरविले विप्र तिच्या बापें ॥
धनें वसनें त्यां दीधलीं अमूपें ॥ १९ अ ॥

ते नैषधी गुप्तरूपें मोहिली. कुसुमचापें मनीं वेध लावियला. असो. तिच्या बापें विप्र गौरविले ( आणि ) त्यां अमूपें धनें वसनें दीधलीं.

कुसुमचापें मनिं वेध लावियेला—मदनबाधेमुळें मनांत सतत चिंतन ( अर्थात नळाचें ) सुरू झालें. वेध लागणें ह्म० सतत छंद लागणें, उ० ' हरीचा वेध लागला गो बाई ।' कुसुमचापें–मदनानें ( कुसुम ह्म० पुष्प हेंच आहे चाप ह्म० धनुष्य ज्याचें तो–बहुव्री. ) गौरविले–आदर सत्कार करून सन्मानिले.

व. ति.—**मानी मनोजशर हार तुरे फुलांचे ।**
**कंदर्पकोपवचनें ध्वनि कोकिलांचे ॥**
**राकाशशी मदनदर्पण भाविला हे ।**
**नेघेचि तो न परिसे न तयासि पाहे ॥ २४ अ ॥**

फुलांचे हार तुरे मनोजशर मानी, कोकिलांचे ध्वनि कंदर्पकोपवचनें ( मानी ). राकाशशी मदनदर्पण भाविलाहे. तो नेघेचि. ( तया ) न परिसे. तयासि न पाहे.

मनोजशर–मदनाचे बाण. कंदर्पकोपवचनें–मदनाचीं कोधयुक्त भाषणें. राकाशशी–पौर्णिमेचा चंद्र. मदनदर्पण–मदनाचा तोंड पाहण्याचा आरसा. भाविलाहे–मानिला आहे. तो–हार. तया–ध्वनीस. तयासि–राकाशशीस. उपमा व यथासंख्य अलंकार.

भावार्थ—फुलांचे हार, कोकिलांचा ध्वनी व पौर्णिमेचा चंद्र हे स्वभावतः अत्यंत नाजुक व चित्तास आनंद देणारे आहेत; परंतु नळाला विरहबाधा झाली असल्यानें फुलांचे हार बाणासारखे त्रास देऊं लागले, कोकिलांचे ध्वनी मदनाच्या कोपयुक्त भाषणासारखे वाटले व चंद्र वैऱ्याच्या पाहण्याच्या आरशासारखा तिरस्करणीय वाटला. ह्मणून नळ हार घेईनासा झाला, ध्वनी ऐकेनासा झाला व चंद्र पाहीनासा झाला.

शा. वि.—**छायानायकसा निदाघसमयीं छाया करी तो विधू ।**
**वायां या हृदया श्रमासि करितो दायदसा हा मधू ॥**
**जाया जे रुचली मनीं तिजकडे जाया नये कीं पहा ।**
**रायाला न गमे न जाय रजनी आयास होती महा ॥ २५ ॥ अ**

तो विधू निदाघसमयीं छायानायक ( करितो अ ) सा छाया करी. हा मधू दायादसा या हृदया श्रमासि वायां करितो. पहा कीं जे जाया मनीं रुचली तिजकडे जाया न ये. रायाला न गमे, रजनी न जाय ( आणि ) महा आयास होती.

विधू–चंद्र. निदाघसमयीं–उन्हाळयांत. छायानायक–सूर्य, छाया नांवाची सूर्याची बायको आहे ( पौराणिक कथा ). छाया–तेज, कांति; " छाया सूर्यप्रिया कांतिः " इत्यमरः । मधु–वसंत ऋतु. दायादसा–भाऊबंदासारखा, वैऱ्यासारखा.

हृदया श्रमासि करितो–हृदयास क्लेश देतो. वायां–व्यर्थ; विनाकारण. जाया–बायको. जाया नये–जातां येत नाहीं. न गमे–करमत नाहीं. आयास–श्रम.

भावार्थ—सूर्य जसा आपल्या उन्हानें लोकांना त्रास देतो त्याचप्रमाणें हल्लीं चंद्र मला ताप देत आहे. वसंत ऋतु वैऱ्याप्रमाणें हृदयाला श्रम देत आहे. जी तरुणी बायको व्हावी ह्मणून मनाला आवडली तिजकडे लोकलज्जेमुळें जातां येत नाहीं. यामुळें नळ राजाला करमेनासें होऊन झोंप न आल्यानें रात्र कंटाळवाणी झाली व शरिराला अत्यंत श्रम झाले.

द्रु. वि.—**विरहिसा दिसतोसि महा नळा ।**
**परि हरीन तुझ्या विरहानळा ॥**
**चतुर जे तरुणी हृदयंगमा ।**
**करवितों तिजशीं तुज संगमा ॥ ५६ अ ॥**

( हे ) नळा, महा विरहीसा दिसतोसि, परि तुझ्या विरहानळा हरीन. जे चतुर तरुणी हृदयंगमा ( आहे ) तिजशीं तुज संगमा करवितों.

हृदयंगमा–हृदयांत राहिलेली, बिंबलेली.

भावार्थ—हंस ह्मणतो नळा तुला, विरहबाधा झाल्यासारखें दिसतें. परन्तु मी तुला आवडलेल्या तरुणीशीं तुझा संगम होईल असें करून तुझ्या विरहबाधेचा परिहार करीन.

व. ति.—**तीं डोंगरीं उपजलीं पिंवळीं विशाळें ।**
**निंबें तसीं नवघनस्तनचक्रवाळें ॥**
**त्या पंकजांत मिनला अलि सक्त तो कीं ।**
**जो नीलिमा सुनयनीं सुजना विलोकी ॥ ६१ अ ॥**

तीं डोंगरीं उपज ( ले ) लीं पिंवळीं विशाळें निंबे तसीं ( तिच्चीं ) नव घनस्तनचक्रवाळें ( आहेत ). ( त्यांचा ) जो नीलिमा सुजना सुनयनीं विलोकी तो त्या पंकजांत ( जणुं ) सक्त अलि ( च ) मिनला कीं.

घन–घट्ट. कठीण. स्तनचक्रवाळें–स्तनांचीं वर्तुळें अर्थात् वर्तुलाकार स्तन. नीलिमा–स्तनाचे अग्रांचा काळा भाग. मिनला–संयोग पावला ( धात्वर्थ त्यावरून )

( कमला ) वर बसलेला. सक्त–गुंग झालेला. भावार्थ—डोंगरातल्या पिंवळ्या जर्द रंगाच्या लिंबा प्रमाणें तिचे वर्तुळ व पीन स्तन आहेत व त्यांचे काळे अग्रभाग कमलावर गुंजारव करित असलेल्या भ्रमरा प्रमाणें दिसतात.

व. ति.—**जों जों घन स्तन भरूं अवकाश देतो ।**
**तों तों तिचा उर भरीव दिसोनि येतो ॥**
**जों जों दिसे उर भरीव तयासि तों तों ।**
**राया उरोजमय रूप असें पहातों ॥ ६१ आ ॥**

जों जों तिचा घन स्तन अवकाश भरूं देतो तों तों ऊर भरीव दिसोनि येतो. जों जों ऊर भरीव दिसे तों तों ( हे ) राया, उरोजमय रूप असें तयासि पहातों.

अवकाश—पोकळ जागा. भरीव–भरलेला. रूप–स्वरूप. उरोज—स्तन. ( उरसि ह्म० छातीवर जातः ह्म० जन्म पावलेला तो उरोज—उपप. ) सर्व रूप लावण्य ह्या उरोजांच्या ठिकाणींच सांठविलें आहेसें वाटूं लागतें.

व. ति.—**विस्तीर्ण वर्तुळ उदग्र कठोर भारी**
**वर्धिष्णु ते स्तन तिचे कनकानुकारी**
**ज्याचे उरीं उमटतील ठसे तयांचे**
**बोलों किती सुकृतसंघ सख्या तयाचे. ॥ ६१ अ ॥**

तिचे ते स्तन विस्तीर्ण, वर्तुळ, उदग्र ( हे ) भारी कठोर आणि कनकानुकारी ( असून ) वर्धिष्णु ( आहेत ). हे सख्या तयांचे ठसे ज्याचे उरीं उमटतील तयाचे किती सुकृतसंघ बोलों ?

उदग्र—अणकुचीदार. कनकानुकारी–कनकाचें अनुकरण करणारे ह्म० त्या-प्रमाणें पिंवळे. वर्धिष्णु–वाढण्याचें आहे शील ह्म० स्वभाव ज्याचे तसे. ठसे–सांचे खुणा. सुकृतसंघ–पुण्याच्या राशी.

व. ति.—**नोहेचि नाभि तरि काय सुरुंग आहे ।**
**रोमावळी गमतसे मज शृंखळा हे ।**
**राया असे स्तन तिचे गड घ्यावया तो ॥**
**राजा मनोभव उपाय जणो करीतो ॥ ६१ ई ॥**

( तिची ती ) नाभी नोहेचि ( तर ) मज गमतसे ( कीं ) सुरुंग आहे. राया, तो मनोभव राजा तिचे स्तन गड घ्यावया हे रोमावळी शृंखळा ( करून ) जणो उपाय करितो ( असें मज गमतसे ).

सुरुंग—कठीण खडक वगैरे फोडण्याकरितां बंदुकीची दारू भरण्यासाठीं जें बारीक व खोल भोंक करतात तें.

शा. वि.—**रंभा काय तिच्यापुढें विगतभा रंभा दिसे मेनका**
**जंभारातिनितंबिनी परि तदा हंभाव ते हीनका**
**कुंभाकारकुचा महावरवधू संभावनागाहिनी**
**रंभादंभजया समोरुसरलस्तंभा मनोमोहिनी** ॥ ६२ अ. ॥

तिच्यापुढें रंभा काय? रंभा मेनका विगतभा दिसे ( तीं ) जंभारातिनितंबिनी ( च कीं काय? ) परी ते तदा हंभावहीनका, ती कुंभाकारकुचा ( असून ) महावरवधूसंभावनागाहिनी ( आहे ) ( आणि ) रंभादंभजया मनोमोहिनी ( आणि ) समोरु सरलस्तंभा आहे.

विगतभा—विगता ह्म० गेली आहे भा ह्म० कांति, स्वरूप ज्यांचे त्या विगतभा—( बहुव्री. ) निस्तेज. जंभारातिनितंबिनी—जंभा ( राक्षस ) त्याचा आराति ह्म० शत्रु तो इंद्र त्याची नितंबिनी ह्म० स्त्री, बायको. इंद्राणी. अहंभावहीनका अहंभाव ह्म० गर्व हीनका—त्यानें उणी ( ह्म० तो नाहीं जिला असी. इंद्राणीला रूपाचा गर्व होता परंतु दमयंतीला नव्हता ). कुंभाकारकुचा—कुंभाच्या आकारा सारखे आहेत कुच ह्म० स्तन जीचे ती ( बहुव्रीहि ). महावरवधूसंभावनागाहिनी—महा ह्म० मोठमोठ्या आणि वर ह्म० श्रेष्ठ अशा ज्या वधू ह्म० स्त्रिया त्यांचे संभावनेंत ह्म० कल्पनांत गाहिनी ह्म० बुडणारी ह्म० जिचें चिंतन मोठ्यामोठ्या श्रेष्ठ बायका करतात असी. रंभेचा दंभ ह्म० गर्व त्यातें जया ह्म० जिंकणारी ती रंभादंभजया. समोरुसरलस्तंभा—सरल स्तंभासारखे, सम ह्म० सरळ असे ऊरु ह्म० मांड्या जीच्या ती.

दिं.—**कसें नांदे तारुण्य तुझ्या देहीं ॥ बाल्य गेलें तें नेणसीच कांहीं**
**उगवतांही सहस्रभानु पाहीं॥काय नलिनी संकोच जात नाहीं॥** ९३अ.

तुझ्या देहीं तारुण्य नांदे, बाल्य गेलें, तें कांहींच कसें नेणसी ? पाहीं, ( कीं ) सहस्रभानु उगवतांही नलिनी संकोच जात नाहीं काय ?

नेणसी—जाणत नाहींस. सहस्रभानु—सूर्य. नलिनीसंकोच—नलिनीचा ह्म० कमलाचा संकोच–मिटणें.

**पाशानरूप हातें भ्रमवि तयातें धरूनि तद्देहातें**
**जीवंतही गवसला समज तियेचे गृहींच मग वसला ॥ ९४ अ. ॥**

पाशानरूप हातें तद्देहातें धरुनि तयातें भ्रमवी ( तो ) जीवंतहीं गवसला, मग तियेचे गृहींच वसला ( असें ) समज.

पाशानरूप—पाशान ह्म० फांसा, त्याच्यासारखा तो पाशानरूप त्यानें.

**गंगोदकीं घडिघडीस बुडीस देतों ॥**
**पंखासि शीतळ करून तसाच येतों ॥**
**तेणें नळासि करितों मग वीजनातें ॥**
**बाळे तसा न धरितो सुरतश्रमातें ॥ १०२ अ. ॥**

घडिघडीस गंगोदकीं बुडीस देतों ( तसें करून ) पंखासि शीतल करून तसाच ( परत ) येतों ( आणि ) तेणें मग नळासि वीजनातें करितों. बाळे, तसा तो सुरतश्रमातें न धरी.

तेणें–तशा शीतळ पंखांनीं. वीजनातें करितो–वारा घालतो. सुरतश्रम–विरह बाधा. तुझ्या वियोगाची नळाला इतकी बाधा होत आहे कीं मी माझे पंख गंगोदकानें थंड करून त्याला वारा घालतों तेव्हां त्यास किंचित् बरें वाटतें. हा भाव.

**आरामीं विरहोत्करें तरुतळीं थारा करोनि स्वयें**
**वारा घेत बसे तपे तपनसा तारापती निश्चयें**
**माराचा शरमार नावरि ह्मणे दारा घडे ती कसी ॥**
**हा राजीवदलाक्ष माधव जनोद्धारा कृपा हो असी ॥ १२२ अ. ॥**

हा राजीवदलाक्ष विरहोत्करें आरामीं तरुतळीं स्वयें थारा करोनी वारा घेत बसे तारापति निश्चयें तपनसा तपे. माराचा शरमार नावरि, ती दारा कसी घडे ( असें म्हणे. ) आणि ( हे ) माधव, जनोद्धारा असी कृपा हो ( वो, असें म्हणे ).

विरहोत्करें–विरहाधिक्यानें. आरामी–बागेंत. तारापती–चंद्र. तपनसा–सूर्यासारखा. माराचा–मदनाचा. जनोद्धारा–जनाचे उद्धारा करितां. किंवा, जनाचा उद्धार होईल असी.

**कोणी एक सखी विलोकुनि नळक्षोणीश्वरा मोहिली**
**कोणी तत्तनुकांतिसिंधुपतित द्रोणीपरी पोंहली**
**कोणी हा मजला न नाथ झणुनी लोणी परी पाझरे**
**कोणी एक तयास लाजुन विरे कोणी वियोगें झुरे ॥ १७३अ. ॥**

नळ क्षोणीश्वरा विलोकुनी कोणी एक सखी मोहिली, कोणी तत्तनुकांतिसिंधु पतित द्रोणी परी पोंहली, कोणी हा मजला नाथ नाहीं झणुनी लोणी परी पाझरे, कोणी तयास लाजुन विरे ( आणि ) कोणी वियोगें झुरे.

तत्तनुकांतिसिंधुपतित—त्याच्या तनुची शरीराची कांति सौंदर्य हाच कोणी सिंधुपति समुद्र त्यांत; द्रोणी—नांव. तत्तनु...पोंहली—जशी नांव समुद्रांत तरंगते, त्याप्रमाणें नळांच्या सौंदर्यसागरांत कोणी सखी पोहूं लागली, त्या सौंदर्याचा सौख्यानुभव घेऊं लागली. विरे—विरणें विरघळणें, प्रेमानें आर्द्र होणें.

**तुजवरि मन ईचे यापरी कां इयेला**
**त्यजसि सुमशरानें हा असा बोध केला**
**तृणकण गणि जैसें त्यासि धैर्यें गणीतो ॥**
**युवतिसि मग बोले राजचूडामणी तो ॥ १८३ अ. ॥**

ईचें मन तुजवरि. यापरी इयेला कां त्यजसी ? असा हा बोध सुमशरानें केला. ते धैर्य जैसें तृणकण ( तैसें ) त्यास गणी. मग तो राजचूडामणी युवतिसि बोले.

भावार्थ—दमयंतीचें हें भाषण ऐकून नळाच्या अंतःकरणांतील मदन, अर्थात् दमयंती विषयींचा प्रेमभाव त्याला असें झणूं लागला कीं तुझ्यावर ईचें मन बसलेलें असतां, तूं देवांची मध्यस्थी करून, ईला व्यर्थ कां सोडतोस ? परंतु नळानें इंद्रादि देवांना वचन दिलेलें असल्यानें त्यानें हें अंतःकरणांतील विकारांचें भाषण धैर्यानें तृणाप्रमाणें निःसार मानलें, अर्थात् त्याच्याकडे लक्ष दिलें नाहीं. व लागलीच दमयंतीशीं बोलण्यास प्रारंभ केला.

**होणार जो वर तदीय वियोग दाही**
**सांगावयास न ये लपवावयाही**
**या सांगवी मदन लाज न सांगवीतें**
**कीं या दुहींत शिणलें मन रंगवीतें ॥ १३२ ॥ अ. ॥**

जो वर होणार तदीय दाही वियोग सांगावयास न ये लपवावयाही ( न ये ) मदन त्या सांगवी ( परंतु ) लाज न सांगवीते. या दुहींत मन शिणलें ( तें ) रंगवीतें कीं.

तदीय—त्याचा. दाही–दाह करणारा तो, जाळणारा, सांगावया न ये लपवावयाही—सांगतां येत नाहीं किंवा लपवितां ही येत नाहीं.

लज्जावती युवति हे वडिलासि धाके
झांकीतसे विरहपावक तो न झांके
जो पंजरीं लपविला वसनांतराळीं
तो झांकिला गगनदीप तरी झळाळी ॥ १३३ अ. ॥

हे लज्जावती युवति वडिलासि धाके ( आणि ) विरहपावक झांकीतसे ( परंतु ) तो न झाके. जो गगनदीप पंजरीं ( किंवा ) वसनांतराळीं लपविला, तो झांकिला तरी झळाळी.

धाके—भीत होती. दमयंती लज्जाशील असल्यानें आपल्या अंतःकरणांतील नळाविषयींचें प्रेम तिला वडिलांना सांगण्याचा धीर होईना. तरी पण तिच्या वर्तनावरून इला कोणाच्या तरी विरहाची बाधा होत आहे असें दिसून येत होतें.

तीचे मनीं नळमनोभव वीर होते
होतां जयासि कथिलें जथिलें अहो ते
त्यांहींच ते दुखविली सुतनू निजेली
मूर्च्छावती निजजनीं अवलोकिजेली ॥ १३३ अ. ॥

**टीप**—या श्लोकाचा अर्थ स्पष्ट व समाधान कारक असा लागत नसल्यानें तो दिला नाहीं.

तो जाहला नृपवर स्थिर दूतभावीं
मानीच ना युवतिच्या विरहास भावी
कुंभोद्भवें तरि महोदधिपान केलें
दुर्वार वाडवशिखेस न मानिजेलें ॥ १६६ अ. ॥

तो नृपवर दूतभावीं स्थिर जाहला. युवतिच्या भावी विरहास मानीच ना. कुंभोद्भवें महोदधिपान केलें तरि दुर्वार वाडवशिखेसि न मानिजेलें.

श्री.

# परिशिष्ट २ रें.

## सामासिक शब्द अथवा समास.

मराठी भाषेंत दोन किंवा दोहोंहून अधिक शब्दांमधील परस्पर संबंध दाखविणाऱ्या विभक्तिप्रत्ययांचा लोप करून, त्या शब्दांना एके ठिकाणीं जोडून त्यांचा नवीन शब्द करण्याचा प्रघात आहे. अशा साधित शब्दास सामासिक शब्द असें ह्मणतात. संस्कृतांत हा प्रघात फार असून, मराठी भाषाही संस्कृतापासूनच निघाली असल्यानें तिच्यांतही तो रूढ झाला आहे. ह्या सामासिक शब्दासच समास असेंही सामान्यतः ह्मणतात. समासाच्या योगानें थोडक्यांत पुष्कळ अर्थ आणण्याची फार चांगली सोय होते. अशा प्रकारचे निवळ मराठी समास मराठी भाषेंत जरी थोडे आहेत तरी संस्कृतांतील पुष्कळ सामासिक शब्द मराठींत रूढ असून कारणपरत्वें नवीन नवीन सामासिक शब्द तयार केले जात आहेत.

बोलण्यांत सामासिक शब्द फारसे येत नाहींत तरी लिहिण्यांत त्याचा उपयोग फार होतो. त्यांतल्या त्यांत गद्यापेक्षां पद्यांत त्यांचा उपयोग विशेषें करून फार चांगला होतो. कारण पद्यांत कवींना आपल्या मनांतील भाव थोडया व मोजक्या शब्दांत व्यक्त करावयाचा असतो. तो त्यांचा हेतु सामासिक शब्दानें फार चांगल्या रितीनें साधतो. उदाहरणार्थ "या स्त्रीचे डोळे मृगाच्या डोळ्याप्रमाणें आहेत." असें जर कोणा कवीला एखाद्या स्त्रीसंबंधानें सांगावयाचें असेल तर इतके लांबलचक वाक्य न लिहितां ' ती मृगनयना आहे ' असें साधे तीन शब्दांचें वाक्य लिहून तो आपला भाव व्यक्त करील. यास्तव कविलोक आपल्या कवितेंतून समासाची योजना विशेष करितात. त्यांतही मोरोपंत, वामनपंडित, रघुनाथपंडित इ० संस्कृतज्ञ कवींनीं तर आपल्या कवितेंतून लांब लांब समास पुष्कळच योजिले आहेत. उदाहरणार्थ रघुनाथपंडिताचें कुंडनपुरीचें वर्णन पहावें. मोरोपंताची तर ह्यासंबंधाची आख्या आबालवृद्धांस माहितच आहे.

सामासिक शब्दाचा उपयोग वाक्यांत फक्त तीनच प्रकारानें केला जातोः— १ नामाप्रमाणें, २ विशेषणाप्रमाणें, आणि ३ क्रियाविशेषणाप्रमाणें. सामासिक

क्रियापद कोठें कोणी योजिलेलें आजपावेतों पहाण्यांत आलेलें नाहीं. तसेंच सामासिक सर्वनामही पहाण्यांत नाहीं; व विचारांती सामासिक सर्वनाम असणें ही अवश्य नाहीं. कारण भाषेंत सर्वनामाला आपला स्वतःचा असा कांहींच अर्थ नसतो. तें सर्वनाम ज्या नामाकरितां येतें त्या नामाचा जो अर्थ असेल तोच त्या सर्वनामाचा अर्थ असतो. नामें अनेक असून त्यांचे अर्थही अनेक आहेत. परंतु सर्वनामें नियमित असून तींच तीं सर्वनामें सर्व प्रकारच्या नामांकरितां योजिलीं जातात. तेव्हां अर्थात एकाच सर्वनामाचे बोलणाराच्या योजनेप्रमाणें अनेकार्थ असूं शकणारे आहेत. ह्मणून सर्वनामाची जी नियमित संख्या भाषेंत प्रचलित आहे ती कामापुरती पूर्ण असल्यानें जास्त वाढविण्याची आवश्यकता नाहीं व अर्थाच्या-संबंधानें भानगड ही पडत नाहीं. तेव्हा सामासिक सर्वनाम होण्याची आवश्यकताच नाहीं. म्हणून योजिलेला सामासिक शब्द स्वतः नाम असेल किंवा क्रियेशीं संबंध असल्यास क्रियाविशेषण व नामाशीं संबंध असल्यास विशेषण असेल हें उघडच आहे. व म्हणून वर सांगितल्या प्रमाणें तीनच प्रकारानें सामासिक शब्दाचा उपयोग होऊं शकतो.

समासांत येणाऱ्या दोन किंवा अधिक पदांपैकीं केव्हां एखादें पद प्रधान असून बाकीचीं पदें गौण असतील, कधीं सर्वच पदें गौण असतील किंवा कधीं सर्वच पदें प्रधान असतील. सर्व पदें प्रधान असलेल्या समासाला " द्वंद्व " समास म्हणतात. सर्व गौण पदाच्या समासाला " बहुव्रीहि " समास म्हणतात, आणि ज्या समासांत एक पद प्रधान असून बाकीचीं पदें गौण असतात अशा समासांपैकीं ज्यांत पूर्वपद प्रधान असून बहुधा क्रियाविशेषण असतें त्यास अव्ययीभाव समास म्हणतात, व उत्तरपद प्रधान असलेला तत्पुरुष समास असें सामान्यतः नाम आहे. यावरून समासाचे मुख्य चार भेद होतात, १ द्वंद्व २ बहुव्रीहि ३ अव्ययी भाव आणि ४ तत्पुरुष. यांतून द्वंद्व, बहुव्रीहि आणि तत्पुरुष हे सविभक्तिक असून अव्ययीभाव समास हा क्रियाविशेषणात्मक आहे. सविभक्तिक समासाचे आणखीही पोटभेद आहेत ते क्रमानें पुढें सांगतों.

यापैकीं तत्पुरुष समासाचा विस्तार फार मोठा आहे म्हणून त्या संबंधानें प्रथम सांगून नंतर बाकीचे समासाचा विचार करूं.

उत्तर पदप्रधान समासांत, विग्रह करते वेळेस जी विभक्ती लावावी लागते त्यावरून त्याचे मुख्य दोन भेद होतात. १ ज्या समासांत प्रधान व गौण पदांची

एकच प्रथमा विभक्ति असते त्यास समानाधिकरण किंवा ' कर्मधारय ' समास म्हणतात व २ ज्या समासांत प्रधान व अप्रधान पदाच्या भिन्न विभक्त्या असतात त्यास 'व्यधिकरण तत्पुरुष ' किंवा केवळ " तत्पुरुष " समास म्हणतात.

व्यधिकरण तत्पुरुषांतील पहिल्या गौण पदाची विभक्ति दुसऱ्या प्रधान पदाच्या विभक्तीहून भिन्न असते आणि प्रधान पदाची विभक्ति प्रथमा असते. म्हणून व्यधिकरण तत्पुरुषांतील प्रथम पदाची जी विभक्ति लुप्त झाली असते त्या विभक्तीच्या नांवानें तो तत्पुरुष ओळखला जातो. जसें १ तृतीया तत्पु. २ चतुर्थी तत्पु. ३ पंचमी तत्पु. ४ षष्ठी तत्पु. आणि ५ सप्तमी तत्पुरुष. द्वितीया विभक्तीचा अंतर्भाव चतुर्थींत होतो व संबोधन कोणत्याच समासांत कधीं येत नाहीं. कित्येक तत्पुरुष समासांत विभक्ति कायम रहाते तो ६ अलुक् समास. कित्येकांत दुसरें पद हें स्वतंत्रपणें प्रचारांत नसलेलें असें धातुसाधित असतें तो ७ उपपद तत्पु. समास. कित्येक समास अलुक् असून उपपदही असतात तो ८ उभय तत्पुरुष. कित्येक तत्पुरुष समासांत प्रथम पदांत अभाव किंवा निषेध या अर्थी अ किंवा अन् अव्यय येऊन समास होतो तो ९ नञ तत्पुरुष व कित्येकांत प्रथम पदीं उपसर्ग येतात तो प्रादिसमास. याप्रमाणें या तत्पुरुषाचे १० पोटभेद करितां येतात.

समानाधिकरण तत्पुरुषालाच कर्मधारय समास ह्मणतात. ज्या कर्मधारयसमासानें विशेष्य विशेषण भाव दाखविला जातो तो विशेषणत्वसूचक व ज्यानें उपमानोपमेय भाव सुचविला जातो तो उपमासूचक असे याचे मुख्य दोन भेद आहेत. समासांतील पूर्व व उत्तर पदावरून विशेषणत्वसूचकाचे ७ व उपमासूचकाचे ४ असे आणखी ११ पोटभेद आहेत त्यांचीं नांवें १ विशेषण पूर्वपद. २ विशेषणोत्तरपद ३ विशेषणोभयपद ४ विषयपूर्वपद ५ अव्यय पूर्वपद ६ संख्या पूर्वपद किंवा द्विगु ७ मध्यमपदलोपी किंवा लुप्तपद असे ७ विशेषणत्व सूचकाचे भेद आहेत व १ उपमानपूर्वपद २ उपमानोत्तरपद ३ अवधारणापूर्वपद व ४ अवधारणोत्तरपद असे ४ उपमासूचकाचे भेद आहेत.

द्वंद्वाचे एकंदर ३ भेद करतां येण्याजोगे आहेत. १ इतरेतर द्वंद्व. २ समाहार द्वंद्व व ३ वैकल्पिक द्वंद्व. तिसरा भेद संस्कृत व्याकरणांत सांगितला नाहीं परंतु तो मराठींत रूढ आहे. उदाहरणार्थ—चार पांच आंबे. ह्मणजे चार आंबे

किंवा पांच आंबे. असा प्रकार संस्कृतांत नसून मराठीचा तो विशेष असल्यानें तसा निराळा भेद करणें भाग झालें आहे.

बहुव्रीहि समासाचे निरानिराळ्या तीन दृष्टीनें तीन प्रकारचे पोटभेद करून दाखविले आहेत परंतु तसे पोटभेद समास सोडवून दाखविते वेळेस सांगण्याची वहिवाट नाहीं. मोघम " बहुव्रीहि समास " ह्मणून सांगितल्यानें साधारणपणें सर्वांचें समाधान होतें परंतु व्याकरण शास्त्राचे विशेष लक्ष लावून निरीक्षण करणारे जे कोणी विचक्षण असतील त्यांच्या सोई करितां कोणकोणत्या दृष्टीनें कसकसे पोट भेद करतां येण्या सारखे आहेत तें दाखविलें आहे.

समासा संबंधानें साधारण दिशा वर दाखविण्यांत आलीच आहे. आतां त्या समासाच्या व्याख्या किंवा याहून जास्त विवेचन पाहिजे असल्यास त्यानें रा. रा. दामले यांचें शास्त्रीय व्याकरण पहावें किंवा दादोबांचें थोरलें व्याकरण पहावें.

या इतक्या लिहिण्यावरून कोणाच्याही ध्यानांत सहज येण्यासारखें आहे कीं कोणा एखाद्या सामासिक शब्दांत कोणता समास आहे हें आपण त्या सामासिक शब्दांचा जसा विग्रह करूं किंवा वाक्यांत अर्थाच्या अनुरोधानें जसा विग्रह करणें इष्ट असेल त्यावर अवलंबून असणारे आहे. उदाहरणार्थ " सत्यव्रत " यांतील विग्रह तीन प्रकारानें सोडवितां येणारा आहे. तो असा. ( १ ) सत्याचें व्रत–षष्ठी तत्पुरुष. ( २ ) सत्य असें व्रत-कर्मधारय ( ३ ) सत्य हेंच आहे व्रत ज्याचें–बहुव्री.

कित्येक वेळेस अर्थांत फरक न होतांही अनेक रितीनें विग्रह करतां येण्यासारखा असतो. अशा वेळेस आपणास वाटेल त्या रीतीनें विग्रह केला तरी चालेल परंतु जसा विग्रह केला असेल त्यास अनुसरूनच समास सांगितला पाहिजे हें उघड आहे. जसें:—लक्ष्मीकांत. याचा विग्रह जर लक्ष्मीचा कांत असा केला तर होणारा आहे परंतु त्या वेळेस षष्ठी तत्पुरुष समासच सांगितला पाहिजे. २ रा. विग्रह. लक्ष्मी आहे कांता ज्याची असा ही विग्रह अर्थभेद न होतां होऊं शकणारा आहे परंतु ह्या वेळेस बहुव्रीहि समास ह्मटला पाहिजे. सारांश अर्थाच्या अनुरोधानें विग्रह केला पाहिजे व जो विग्रह केला असेल त्यास अनुसरून त्या समासास नांव दिलें पाहिजे.

- तत्पुरुषसामान्य — उत्तरपद प्रधान
  - कर्मधारय
    - उपमासूचक
      - १ उपमान पूर्वपद
      - २ उपमानोत्तरपद
      - ३ अवधारणापूर्वपद
      - ४ अवधारणोत्तरपद
    - विशेषणसूचक
      - १ विशेषणपूर्वपद
      - २ विशेषणोभयपद
      - ३ विशेषणोत्तरपद
      - ४ विषयपूर्वपद
      - ५ अव्ययपूर्वपद
      - ६ संख्यापूर्वपद
      - ७ लुप्तपद मध्यमपदलोपी
  - तत्पुरुषविशेष
    - १ उपपद तत्पुरुष
    - २ उभय तत्पुरुष
    - ३ तृतीयांतत्पुरुष
    - ४ चतुर्थीतत्पुरुष
    - ५ पंचमीतत्पुरुष
    - ६ षष्ठीतत्पुरुष
    - ७ सप्तमीतत्पुरुष
    - ८ अलुकृतत्पुरुष
    - ९ नञ्तत्पुरुष
    - १० प्रादिसमास

नं. १

समास

- उभय पद गौण ( बहुव्रीहिः )
- उभयपदप्रधान ( द्वंद्व )
- एकपदप्रधान
  - उत्तरपद प्रधान तत्पुरुष
  - पूर्वपद प्रधान अव्ययी भाव

---

नं. २

द्वंद्व

- इतरेतर
- समाहार
- वैकल्पिक

---

नं. ४

उभयपद गौण अथवा बहुव्रीहिः

- समानाधिकरण बहुव्रीहिः
- व्यधिकरण बहुव्रीहिः

---

**नं. ५ प्रकार २ रा.**

बहुव्रीहि

- १ विशेषण पूर्वपद बहुव्रीहिः
- २ विशेषणोत्तरपद बहुव्रीहिः
- ३ उपमान पूर्वपद बहुव्रीहिः
- ४ विषय पूर्वपद
- ५ अवधारणा पूर्वपद
- ६ लुप्तपद ( अथवा ) मध्यम-पदलोपी बहु०
- ७ नञ्बहुव्रीहिः अ
- ८ संख्यापूर्वपद बहु०
- ९ संख्योत्तरपद बहु०
- १० सह बहु०
- ११ दिगंतराल बहु०
- १२ व्यतिहार बहु०
- १३ प्रादि बहुव्रीहि०

---

**नं. ६ प्रकार ३ रा.**

बहुव्रीहि

- १ तृतीयाबहु.
- २ चतुर्थीबहु.
- ३ पंचमीबहु.
- ४ षष्ठीबहु.
- ५ सप्तमीबहु..

---

# परिशिष्ट ३ रें.

## वृत्तें.

काव्याची व्याख्या साहित्य ग्रंथकारानें दोन चार प्रकारानें केली आहे. त्या सर्वांत ' रसात्मकं काव्यं ' ही व्याख्या बहुतेक सर्व ग्रंथकारांनीं मंजूर केल्या सारखी आहे. ' चमत्कृतिजनक कर्णमधुर अशा रचनेला काव्य ह्मणावें ' ही दुसरी ही व्याख्या करितां येण्यासारखी आहे.

काव्य दोन प्रकारचें १ गद्यात्मक व २ पद्यात्मक. जसें आपण नेहमीं व्यवहारांत बोलतों त्याचप्रमाणें सरळपणें केलेल्या रचनेला गद्य ह्मणावें व अक्षराच्या किंवा मात्रांच्या गणाच्या कांहीं एका नियमांस अनुसरून गातां येईल अशा प्रकारें केलेल्या रचनेस पद्य ह्मणावें.

यावरून पद्यास अक्षरगण किंवा मात्रागण अवश्य आहेत हें उघड झालें. अक्षर-गण तीन अक्षरांचा होतो. या तीन अक्षरांचे संयोग ऱ्हस्व दीर्घांच्या अनुरोधानें आठच प्रकार होणें गणितानें शक्य आहे. त्याचीं नांवें व लक्षणें खालीं लिहिल्या-प्रमाणें. १ आद्य लघु तो यगण जसें यमाचा २ मध्यलघु तो र गण जसें राधिका. ३ अंत्यलघु तो तगण जसें ताराप. ४ सर्व लघु तो नगण जसें नमन. ५ आद्य गुरु तो भगण जसें भास्कर. ६ मध्य गुरु तो जगण जसें जनास. ७ अंत्य गुरु तो सगण जसें समरा. व ८ सर्व गुरु तो मगण जसें मानावा. मात्रा गणांत अक्षराचा नियम नाहीं परंतु मात्रांचा नियम आहे. एक गण चार मात्रांचा होतो. ह्मणून एका मात्रा गणांत लघु गुरु भेदानें दोन तीन किंवा चार अक्षरें येऊं शकतील. व ह्मणूनच त्यांचे प्रकार केवळ पांचच असणें शक्य आहे. त्यांचीं लक्षणें व नांवें उदाहरणासह येणेंप्रमाणें आहेत.

दोन्हीं अक्षरें गुरु तो मगण जसें मेघा.
अंत्य गुरु तो सगण जसें सविता.
मध्य गुरु तो जगण—जसें. जनास.
आद्य गुरु तो भगण जसें. भाजन.
सर्व लघु तो नगण—जसें नवरस.

कोणत्या तरी एका नियमानें अक्षरगण किंवा मात्रागण यांस अनुसरून केलेल्या रचनेस छंद किंवा वृत्त असें ह्मणण्याचा प्रघात आहे. त्या संबंधाचे नियम पिंगलादि ग्रंथकर्त्यांनीं संस्कृत भाषेंत सांगितले आहेत. त्या पैकींच कांहीं वृत्तें मराठींत प्रचलित आहेत. निवळ मराठी वृत्तें फारच थोडीं आहेत. त्या पैकीं अक्षरगणाच्या किंवा मात्रागणाच्या नियमानें बद्ध असीं दोनच आहेत. एक दिंडी व दुसरें साकी वृत्त. बाकी, अभंग ओंवी किंवा चूर्णिका या वृत्तांत अक्षरगणाचा नियम नसून फक्त अक्षराचा नियम आहे परंतु तो तितका जाचक नसल्यानें अनेक कवींनीं अनेक प्रकारें नियमभंग केलेला आहे. व तसा नियमभंग करणें एके प्रकारें रूढ झाल्यासारखें ही आहे. या सर्वांचें वर्णन परशुरामपंत तात्या गोडबोले यांनीं आपल्या वृत्तदर्पणांत केलेंच आहे. त्यांतून ज्या वृत्तांची योजना कवीनें सदरच्या काव्यांत केलेली आहे त्यांचीं लक्षणें पुढें दिलेलीं आहेतच. सबब त्या संबंधानें येथें अधिक सांगण्याची आवश्यकता नाहीं.

या वृत्ताशिवाय मराठी भाषेंत ‘ पद ’ ह्मणून निरनिराळ्या प्रकारें गायनाच्या चालीवर रचिलेली एक विशिष्ट प्रकारची पद्यरचना आहे. तींतही अक्षरगणाचा नियम नसून फक्त मात्रांचा मात्र नियम आढळून येतो. परन्तु तो प्रकार इतका विविध आहे कीं त्या प्रत्येकाचें वर्णन व नियम देणें दुरापास्त आहे तरी पण कांहीं कांहीं अक्षरवृत्तें ही पदाच्या चालीवर सुंदर रितीनें यत्किंचित ही स्वरांची ओढाताण न करतां ह्मणतां येतात. उदाहरणार्थ पंच चामर वृत्त सवईवृत्त हरिणीवृत्त. वगैरे. यावरून २६ अक्षरांहून जास्त अक्षरांच्या अक्षर वृत्तास दंडक ह्मणून जी सर्व साधारण संज्ञा संस्कृत ग्रंथकर्त्यांनीं दिली आहे तींच मुळचीं पदें असावींत व त्या नंतर गायनाच्या स्वराचे ऱ्हस्व दीर्घत्वाप्रमाणें त्यांचे निरनिराळे भेद झाले असावे असें वाटतें. अशा प्रकारची कांहीं पदें आमच्या प्रस्तुत कवीनें आपल्या सदरच्या काव्यांत रचिलीं आहेत परन्तु त्याच्या अक्षर किंवा मात्राच्या नियमा संबंधानें वृत्तदर्पणांत कांहींच उल्लेख नसल्यानें दोन शब्द लिहिणें भाग पडलें.

प्रस्तुत आमच्या वर्ण्य कवीनें निवळ मराठी व संस्कृत मिळून २१ प्रकारच्या छंदाचा आपल्या काव्यांत उपयोग केला आहे. त्यांत ६ मराठी

छंद असून १५ संस्कृत छंदापैकीं जीं वृत्तें मराठींत अत्यंत प्रचलित आहेत असे छंद आहेत. त्यांची नांवें. १ प्रमाणिका २ उपेंद्रवज्रा ३ स्वागता ४ भुजंगप्रयात ५ द्रुतविलंबित ६ वंशस्थ, ७ स्रग्विणी ८ वसंततिलका ९ मालिनी १० शिखरिणी ११ शार्दूलविक्रीडित आणि १२ मदिरा. अशीं असून अर्धसम वृत्तापैकीं १३ माल्यभारा वृत्त व मात्रावृत्तापैकीं आर्या व २ गीति हीं दोन वृत्तें आहेत निवळ मराठी. वृत्तापैकीं १ साकी २ दिंडी, ३ ओंवी ४ चूर्णिका ५ घनाक्षरी व ६ पद या वृत्तांचा कवीनें उपयोग केला आहे. त्यांचीं लक्षणें वगैरे खालीं दिलीं आहेत.

## समवृत्तें.

१ प्रमाणिका.

प्रमाणिका तिला ह्मणा । ज रा ल गा असे गणा ॥
पदांत आठ अक्षरें । वदाल सत्यतें बरें ॥

२ उपेंद्रवज्रा.

उपेंद्रवज्रा ह्मणतात तीला ॥ जताजगागा गण येति जीला
पदास होणें शिव अक्षरानीं ॥ पहा मनीं धुंडिशि काय रानीं

३ स्वागता.

स्वागता ह्मणति सुज्ञ तयाला ॥ रा न भा ग ग असे गण ज्याला
अक्षरें हि अकरा पदिं येति ॥ धन्य ते हरिपदीं मन देती

४ भुजंगप्रयात.

भुजंगप्रयाता ह्मणावें तयाला ॥ क्रमानेंच येती य चारी जयाला
पदीं ज्याचिया अक्षरें येति बारा ॥ रमानायका दुःख माझें निवारा

५ द्रुतविलंबित.

द्रुतविलंबित वृत्त घडे तिथें ॥ न भर भर क्रम हाच गणी जिथें
रविमितें चरणांतिल अक्षरें ॥ त्वरित धर्म करा अपुल्या करें ॥

६ वंशस्थ.

जयास वंशस्थाचि नाम ठेविती ॥ जयास जा ता ज र संघ सेविती
पदांत मासांइतकींच अक्षरें ॥ पहा विचारानें असत्य कीं खरें ॥

७ स्रग्विणी.

स्रग्विणी वृत्त हें नांव देती तया ॥ पादिं येती र हे संघ चारी जया
होति बारा पदीं अक्षरें मोजितां॥सौख्य होतें मना ईश्वरीं योजितां

८ वसंततिलका.

जाणा वसंततिलकाव्हय तेंच वृत्त ॥
येती जिथें त भ ज जा ग ग हे सुवृत्त
संख्या चतुर्दश पदांतिल अक्षरांची ॥
होते जनांत अपकीर्ति निरक्षराची ॥

९ मालिनी.

ह्मणति कवि तयाला मालिनी वृत्त तेव्हां
न न म य य असे हे संघ येतात जेव्हां
प्रति चरणिं हि पंध्रा अक्षरें हीं तयाचीं
हरि-हर-चरणांला आपुलें हीत याची

१० शिखरिणी.

तया वृत्ता देती विबुध जन संज्ञा शिखरिणी
जया मध्यें येती य म न स भ ला गा गण गणीं
दहा आणि सात प्रतिचरणिं हीं अक्षरमिती
विसावा तो ध्यावा गुरुचरणिं सांगू तुज किती ॥

११ शार्दूलविक्रीडित.

आहे वृत्त विशाल त्यास ह्मणती शार्दूलविक्रीडित
मा सा जा स त ता ग येति गणहे पादास की जोडित
एकोणीस पहा गणून चरणीं येतात हीं अक्षरें
तेजःपुंज नभोंगणीं पसरली रत्नें पहा नक्षरें ॥

१२ मदिरा.

ती मदिरा कवि बोलति जी मन मोहुनिया जन लाविल नादीं
ज्या गण सात भ नामक आधिच दोन गुरू मग येतिल पादीं
अक्षरसांमिति पाहसि तूं जरि तेविस होतिल नेमचि याचा
साधुनि सत्वर घ्या स्वहिता तुह्मि कांहिंच नेम नसे स्ववयाचा ॥

## अर्ध सम वृत्त.

१३ माल्य भारा

विषमींच पदीं स सा ज गा गा ॥ सम पदीं सभराय येति भागा
विषमीं अकरा समींच बारा ॥ तरि संज्ञा तिस होय माल्यभारा ॥

## मात्रा वृत्तें.

१४ आर्या

आर्येच्या प्रथम पदीं द्वादश मात्रा तशाच तिसऱ्याला
अष्टादश दुसऱ्याला आणिक चवथ्यास पंचदश ॥

१५ गीति

गीतीच्या प्रथम पदीं द्वादश मात्रा तशाच तिसऱ्याला
दुसऱ्या पादीं अठरा, मात्रा असती तशाच चवथ्याला ॥

## निवळ मराठी वृत्तें.

१६ दिंडी

दिंडीला चार चरण असतात आणि चरणाच्या शेवटीं अनुप्रास किंवा यमक असतें. त्यांत तीं कोठें दोन दोन चरणांचीं सारखीं, कोठें चारी चरणांची सारखी अशीं असतात. ह्या छंदास अक्षराचा नियम नाहीं पण मात्रांचा नियम आहे. प्रत्येक चरणास एकोणीस मात्रां असतात आणि नवव्या मात्रेवर अवसान असतें ह्मणून नऊ मात्रांचा एक व दहा मात्रांचा एक असे दोन भाग होतात.

त्याच्या मात्रांची रचना अशी असावी कीं, पहिल्या भागांत प्रथम तीन मात्रांचा एक गण ह्मणजे गुरु लघु किंवा लघु गुरु किंवा तीनही लघु असा असावा त्यापुढें तीन गुरु किंवा सहा लघु किंवा लघुगुरु मिळून सहा मात्रांचा गण असावा. दुसऱ्या भागांत पहिल्याप्रमाणें प्रथम तीन मात्रांचा एक गण, मग पुन्हा तसाच आणखी तीन मात्रांचा गण व त्यांच्यापुढें दोन गुरु असावे.

### १७ साकी.

प्रत्येक साकीला दोन चरण किंवा दोन अर्धें असतात; आणि दोहोंच्या शेवटीं यमक असतें. प्रत्येक अर्धांत चार मात्रांचा एक गण असे सात गण ह्मणजे अठ्ठावीस मात्रा असतात. चौथ्या गणाच्या अंतीं ह्मणजे सोळाव्या मात्रेवर अवसान असतें. पूर्वीं मात्रावृत्तांत मात्रागण पांच प्रकारचे सांगितले आहेत त्यांपैकीं कोणतेहिं गण असले तरी चिंता नाहीं; पण गण निरनिराळे मोजतां येतील असे असावे आणि शेवटीं गुरु अक्षर यावें.

### १८ ओंवी.

ओंवीला चार चरण असतात. तीन चरणाच्या शेवटीं यमक असतें. चौथ्याला नसतें. पहिल्या तीन चरणास आठ आठ अक्षरें आणि शेवटच्या चरणास सात अक्षरें असावीं हा मुख्य नियम. परंतु शब्द व अर्थ ह्यांच्या अनुरोधानें कवि अधिक उणीं अक्षरें घालतात.

### १९ घनाक्षरी.

घनाक्षरी छंद ओंवीप्रमाणेंच आहे. ह्मणजे तशा चार ओंव्याची एक घनाक्षरी होते.

### २० चूर्णिका

चूर्णिकेचें लक्षण वृत्तदर्पणांत दिलेलें नाहीं. परंतु तिच्यांत व घनाक्षरींत नामभेदापेक्षां अन्य भेद असल्याचें दिसून येत नाहीं व असला तरी तो विशेष लक्षांत घेण्यासारखा नाहीं.

### २१ पद.

पदासंबंधानें पूर्वीं लिहिलें आहेच. सबब आतां जास्त लिहिण्याचें कारण नाहीं. येणेंप्रमाणें वृत्तांचीं लक्षणें आहेत.

# परिशिष्ट ४ थें.

## अलंकार.

अलंकारासंबंधानें लिहावयाचें ह्मणजे इतकेंच कीं, जशीं सुवर्णादिकांचीं नाना प्रकारचीं भूषणें शरीरास शोभा देतात त्याचप्रमाणें चमत्कृतिजनक शब्दरचना काव्यास शोभा देतात ह्मणून अशा प्रकारच्या शब्दरचनांसही लक्षणेनें अलंकारच साहित्यशास्त्रकार ह्मणतात. अलंकाराचे मुख्य दोन भेद आहेत १ शब्दालंकार व २ अर्थालंकार.

शब्दालंकारांत मुख्यत्वें वर्णांची कांहीं नियमानें पुनरावृत्ति, किंवा फूल. पान, खड्ग, मुरज, इत्यादिकांच्या आकृति सारखी आकृति काढितां येईल अशा प्रकारची शब्दरचना असते. ह्या दुसऱ्या प्रकारास ‘ चित्रकाव्य ’ ह्मणण्याचा परिपाठ आहे. कारण तशा शब्दरचनेनें कागदावर आपण इच्छिल्या प्रकारचें चित्र काढितां येतें; किंवा ‘ चित्र ’ ह्मणजे ‘ विलक्षण, चमत्कारिक, ’ या अर्थानें ही अशा प्रकारच्या बंधमय शब्दरचनेस ‘ चित्रकाव्य ’ हें अन्वर्थकच नांव आहे.

दुसरा प्रकार अर्थालंकाराचा आहे. त्याचे मुख्यत्वें ४ पोटभेद करतां येण्या सारखे आहेत. १ वास्तव २ औपम्य ३ अतिशय ४ श्लेष.

१ वास्तव ह्मणजे केलेलें वर्णन खरें, वास्तविक असून चमत्कृतिजनक असतें.

२ औपम्य यांत वर्ण्य वस्तुची दुसऱ्या कोणत्यातरी प्रसिद्ध वस्तुशीं तुलना केलेली असते.

३ अतिशय यांत वर्ण्य वस्तूचें वास्तविक पेक्षां जास्त आधिक्यानें वर्णन केलेलें असतें.

४ श्लेष. यांत वर्ण्य वस्तूच्या वर्णनांत अशा प्रकारची शब्दरचना केलेली असते कीं त्यापासून दुसऱ्याच एकाद्या चमत्कारिक अर्थाची प्रतीति अंतःकरणास होते. हा चौथा प्रकार शब्दालंकारांतही घालतां यावया सारखा आहे; परंतु जरी या प्रकारांत वर्णरचनेचेंच कौशल्य असलें तरी त्याच्या अर्थापासूनच अंतःकरणास

आनंद होणारा असल्यानें ह्या प्रकारास शब्दलंकारांत न घालतां अर्थालंकारांतच घालण्याचा प्रघात पडला आहे.

अर्थालंकाराच्या ह्या मुख्य चार भेदाचे आणखी पोटभेद अनेक आहेत व त्यापैकीं जे जे अलंकार ह्या पुस्तकांत आले आहेत ते सर्व त्यांच्या त्यांच्या व्याख्येसह पुढें दिले आहेत. त्यांचीं नावें व व्याख्या मुख्यत्वें 'अलंकारदर्पण' नांवाच्या पुस्तकांतून घेतल्या आहेत.

हे अलंकाराचे सर्व प्रकार ध्यानांत रहाण्यास सुलभ पडावें ह्मणून वृक्षाच्या आकारानें पुढें दाखविले आहेत. व प्रस्तुत नलदमयंती स्वयंवरांत कवीनें कोणकोणत्या अलंकाराचा उपयोग केला आहे त्याची यादी श्लोकांच्या अनुक्रम नंबरासह अलंकाराच्या व्याख्येखालीं दिली आहे.

# अलंकार

- शब्दालंकार
- अर्थालंकार
  - वास्तव
  - औपम्य
  - अतिशय
  - श्लेष

**वास्तव**

१ सहोक्ति
२ समुच्चय
३ जाति
४ यथासंख्य
५ भाव
६ पर्याय
७ विषम
८ अनुमान
९ दीपक
१० परिकर
११ परिवृत्ति
१२ परिसंख्या
१३ हेतु
१४ कारणमाला
१५ व्यतिरेक
१६ अन्योन्य
१७ उत्तर
१८ सार
१९ सूक्ष्म
२० लेश
२१ अवसर
२२ मीलित
२३ एकावली

**औपम्य**

१ उपमा
२ उत्प्रेक्षा
३ रूपक
४ अपन्हुति
५ संशय
६ समासोक्ति
७ मत
८ उत्तर
९ अन्योक्ति
१० प्रतीप
११ अर्थांतरन्यास
१२ उभयन्यास
१३ भ्रान्तिमत्
१४ आक्षेप
१५ प्रत्यनीक
१६ दृष्टांत
१७ पूर्व
१८ सहोक्ति
१९ समुच्चय
२० साम्य
२१ स्मरण

**अतिशय**

१ पूर्व
२ विशेष
३ उत्प्रेक्षा
४ विभावना
५ तद्गुण
६ अधिक
७ विरोध
८ विषम
९ असंगति
१० पिहित
११ व्याघात
१२ हेतु

**श्लेष**

१ अविशेष
२ विरोध
३ अधिक
४ वक्र
५ व्याज
६ उक्ति
७ असंभव
८ अवयव
९ तत्व
१० विरोधाभास

प्रस्तुत काव्यांत कोणकोणत्या ठिकाणीं कोणता अलंकार असून त्याचें लक्षण काय याविषयीं थोडक्यांत माहिती पुढें दिली आहे.

१ उपमा.

कवी दोन पदार्थांचें ॥ चमत्कारिक साम्य जें ॥
वर्णी ते उपमा लेख ॥ चंद्रासम वधूमुख ॥ १ ॥

प्रस्तुत काव्यांतील पद्यें ७, २२, २४, २६, ३६, १८, ५९, ६५, १३२, १३३, १५८, १६०, १७४, १७९, १८० परि. २४ अ, ३७, ३८, ३९, ८०, ८१, ८६, ८८, ९०, १५९, इत्यादि पहा.

२ पूर्णोपमा.

जेथें या उपमान आणि उपमेय स्वादु काव्यीं तसें
तत्साधारणधर्म शब्द उभया जो साम्यदर्शी असे
या चौघांस कवी करी ग्रहण तैं पूर्णोपमा होतसे
नीलत्वें घन विष्णुसा दिसतसे त्या पुष्करीं जो वसे ॥ २ ॥

प्रस्तुत काव्यांतील पद्य १६ पहा.

३ प्रतीप.

प्रसिद्धोपमाना कवी देति जेथें ॥
प्रसिद्धोपमेयाचिया ऊपमेतें ॥
प्रतीपाख्य होतो अलंकार कांते ॥
दिसे त्वन्मुखासारिखा चंद्र माते ॥ ३ ॥

उदाहरणार्थ पद्य ६८ पहा.

४ रूपक.

उपमानोपमेयांचें अभेदें जेथ वर्णन
तेथें रूपक जाणा हें शास्त्र तत्वार्थदर्पण ॥ ४ ॥

पद्यें २१, ४९, ५२, ५५, ६५, ८०, १३२, १४२, १५४, १७४, पहा.

५ भ्रांतिमान.

एका वस्तूच्या स्वरूपा प्रमाण ॥
दूजी वस्तू पाहतां भीति होणें ॥
होते भ्रांती नामकालंकृती ते ॥
घेतो सर्पा रज्जु मानूनि हाते ॥ ५ ॥

पद्यें ६७, ६८, ७७, पहा.

६ संदेह.

वस्तू पहातांचि मना येतो संशय जेथ तो
संदेहाख्य कळेना हे पद्म कीं शशि दीसतो ॥ ६ ॥

पद्य पहा.

७ अपन्हुति.

आरोपाते कराया कविजन उपमानाचिया ऊपमेयीं
धर्माच्या निन्हवातें प्रवदति उपमेयाचिया तेथ पाहीं
सा भेदांनीं अपन्हुत्यभिध बुध अलंकार तो होय " ना हे
इंदू तो स्वर्णदीच्या मधिल कमल हें नाक तो भृंग आहे" ॥ ८ ॥

पद्य २२ पहा

८ उत्प्रेक्षा.

आहे कीं उपमानची जणु असी संभावना जे करी
काव्यीं कोमल वाग्विलास कवि तो त्या ऊपमेयावरी
उत्प्रेक्षाभिध बोलतात जन हो शास्त्रीं अलंकार हा
"प्राची पुत्राचि कीं जणु प्रसवली भानु प्रभातीं अहा" ॥ ८ ॥

पद्य ३५ पहा

९ रूपकातिशयोक्ति

सुज्ञ हो उपमेय जेथ न सांगतां कवनांत तें
वर्णिती उपमानवाचक सत्पदेंचि घडे जिथें

रूपकातिशयोक्ति ती " ह्मणती नृपाळवधूकुशी
रत्न हेंचि खरोखरी निपजे नृपाळ बहू यशी ॥ ९ ॥
पद्य १८२ पहा.

१० संबंधातिशयोक्ति.

संबंधातिशयोक्तीतें ॥ संबंध नसतां हि तो
वर्णिती " कौशिक तपे ॥ कांपे तैं भूमि गोल तो ॥ १० ॥
पद्यें २७, ३२, ३३, ३४, १४१ पहा.

११ तुल्ययोगिता.

वर्ण्यांच्या अथवा विवर्णिति अवर्ण्यांच्या गुणैक्या जिथें
साहित्यज्ञ सुधी अलंकृति गणा बा तुल्ययोगित्वतें
अब्जें संकुचती हि पुंश्चलिमुखें पारुष्य कोणा मनीं
येना जाति-शशीकला-कदलिचें त्वत्कोमलांगे क्षणीं ॥ ११ ॥
पद्य ९३ पहा.

१२ दृष्टांत.

बिंब प्रतिबिंबत्वें जें उपमानोपमेय वाक्यांचे
वर्णन दृष्टांत नृपा तूंचि यशस्वी विधूच तेजस्वी ॥ १२ ॥
पद्ये २४, ५७, १६२ पहा.

१३ सहोक्ति.

सहभाव चमत्कारिक वर्णी कवि तो सहोक्त्यलंकार
त्याची कीर्ति दिगंतीं गेली शत्रू समेत अतिदूर ॥ १३ ॥
पद्यें ३०, ३७ पहा.

१४ परिकर

साभिप्राय विशेषणें परिकरालंकार बा होतसे
साभिप्राय विशेष्य हो परिकरांकूराख्य जाणा जसे
सत्तापासि हरो सुधांशु-शिरतो श्री सांब सर्वेश्वर
देवो तोचि चतुर्भुजाज पुरुषांचे अर्थ चारी मला ॥ १४ ॥
पद्यें १४, ५७ पहा

१५ श्लेष

श्लेषालंकार तो होत अनेकार्थ विवक्षित
शब्दाचे " पूर्ति भजना श्रवणाविण होय ना ॥ १५ ॥

पद्यें ५, ७, १९, ५५, ६५, ८८, ११०, ११२, १३५, १५६, २०४,
२०५, २०६ पहा

१६ व्याजस्तुति

निंदेनें जें स्तोत्र जनाला दिसतें ती
स्तोत्रें निंदा वा उघडी होय तिथें ती
जाणावी हो व्याजस्तुति " हा अविचार
गंगे, पाप्याला हि समुद्धरिसी पार " ॥ १६ ॥

पद्य ४३ पहा.

१७ विभावना.

विरुद्ध कारणें कार्य उद्भवे ती विभावना
" प्रिये सद्वृत्त कुच हे दुर्वृत्त करिती जना ॥ १७ ॥

पद्य ५४ पहा.

१८ विरोधाभास.

विरोध नसतां होतो विरोधाभास जाणतो
विरोधाभास " कठिण मंद हा अज्ञानी गण ॥ १८ ॥

पद्य ३१ पहा.

१९ यथासंख्य.

पदें ज्या क्रमें उक्त त्याची क्रमें जो ।
कथी अन्वयाला पदांशीं दुजातो ॥
यथासंख्य " ईशस्मृतिस्तोत्रसेवा ।
करी चित्तवागंगशुद्धी नृदेवा ॥ १९ ॥

पद्य "परि. २४ अ" पहा.

२० विकल्प.

घडे विकल्पाख्य समप्रमाण ॥ विरुद्ध गोष्टी वदतांच दोन
करीति एकत्र तिथे विकल्प ॥ मनीं धरा निश्चय वा विकल्प ॥२०॥

पद्यें ४९, ९७ पहा.

२१ कारकदीपक.

एका कर्तृपदाचा होय अनेक क्रियांवरी जेथ
अन्वय कारकदीपक " नाशी तम साधु दाखवी सुपथ " ॥ २१ ॥

पद्यें ८५, ९७ पहा.

२२ काव्यार्थापत्ती.

जेथें कैमुतिक न्यायें ॥ अर्थाची सिद्धि बोलती
काव्यार्थापत्ति ती सुज्ञ ॥ गूढ मूढास हे किती ॥ २२ ॥

पद्य ११७ पहा.

२३ अर्थांतरन्यास.

सामान्य आणीक विशेष अर्थ ॥ यांची असे जेथ सहोक्ति तेथ
अर्थांतरन्यास "अशक्य काय ॥ थोरा तरे मारुति अब्धि तोय" २३

पद्य ४० पहा.

२४ ललित

वर्ण्य अर्थ तत्कथन सोडुनी ॥ तत्समान तो वर्णिती जनीं
तेथ होय वा ललित " ते गृहा ॥ अग्नि लागतां खणाति कूप हा " २४

पद्यें १७९, १८० पहा.

२५ प्रहर्षण

यत्नाविणें जेथ अभीप्सितार्थ ॥ सिद्धी कवी वर्णिति जाण तेथ
प्रहर्षणालंकृति "कामुकाला ॥ रामा मिळे त्या सहजीं सुशीला" २५

पद्य ६५ पहा.

२६ अनुगुण

जो पूर्व सिद्ध असतो गुण त्यास जाण ॥
उत्कर्ष अन्य गुण सन्निध ते करून
त्या वर्णिती अनुगुणाख्य " तुझ्या कटाक्षीं ॥
नीलोत्पलें अति निळीं दिसतीं मृगाक्षी " ॥ २६ ॥

पद्य ५४ पहा.

२७ स्वभावोक्ति

जात्यादिकांचा कथिती स्वभाव ॥ कवी स्वभावोक्ति महानुभाव
तेथें ह्मणा " पक्षि पदा धरीतां ॥सुटावया टोंचिति चंचु हाता " २७

पद्यें ३७, ३८, ३९, ८०, ८१, ८६, ९०, १५९ पहा.

२८ पर्यायोक्त

पर्यायोक्त ह्मणति त्या वर्णिति रूपांतरें कथानक जें
" दे मत्कंदुक राधे वसनीं जो लपविलास गे तूझें " ॥ २८ ॥

पद्य १८५ पहा.

२९ आशीः

होवो अभीष्ट वस्तु प्राप्ति असें जेथ वर्णिलें जातें
आशीरलंकृती ते " देवो विश्वेश सौख्य तुह्मातें " ॥ २९ ॥

पद्यें ७१, ११५, परि. ११ अ, पहा.

# परिशिष्ट ५ वें

## रघुनाथ पंडितांविषयीं माहिती व त्यांचीं इतर काव्यें.

मद्रास इलाख्यांत आरणी ह्मणून जें शहर आहे तें रघुनाथ पंडितांचें रहाण्याचें मूळ ठिकाण होय. आरणीचे महाराष्ट्र ब्राह्मण धिप्पाडपणा, राकटपणा व शूरपणा या तीन गुणांबद्दल प्रसिद्ध आहेत.

रघुनाथ पंडितांचीं दमयंतीस्वयंवराखेरीज रामदासवर्णन व गजेंद्रमोक्ष अशीं दोन काव्यें तंजावरास भाऊस्वामीच्या मठांत सांपडलीं आहेत. हीं दोन्हीं काव्यें पुढें निराळीं दिलीं आहेत. तीं बरीच सरस आहेत.

रामदासवर्णनांत कवीनें आपणा स्वतःस रामदासाच्या शिष्यवर्गांत गणून वर्तमानकाळाचा उपयोग करून वर्णनसमयीं समर्थ जिवंत होते असें दर्शविलें आहे. ह्यावरून रघुनाथ पंडितांचा समय शक १५८२ पासून १६४२ पर्यंत असावा असें निश्चयानें विधान करणें शक्य आहे.

रघुनाथ पंडितांचा ह्मणून एक श्लोक तंजावरांतील बहुश्रुत लोक सांगतात तो श्लोक असाः—

ह्मातारा बहु जाहलों, कवण ही त्राता नसे भेटला
भाताची तजवीज तेच उदरीं भाता गमे पेटला
हातामाजि नसेच एक कवडी हा ताप आतां हरी
दातारा मज वांचवी सदय हो माता पिता तूं हरी

ह्या श्लोकावरून हा कवि इतर कविप्रमाणें द्रारिद्र्यानें पीडित होऊन उतार वयांत वारला असावा असें अनुमान होतें. ह्याचा मृत्युकाल सुमारें शक १६४२ मानण्यास हरकत नाहीं.

पंडितांचीं दोन काव्यें रामदासवर्णन व गजेंद्रमोक्ष वाचकांच्या रंजनार्थ येथें देतों.

रामदास वर्णन.

आम्हां तुम्हांस भववारिधिमाजि तारू ॥
जे वाचितां परिसतां मग होय तारू
जे दासबोध रचना घडली जयाला ॥
वंदूं निरंतर तया गुरुराजयाला ॥ १ ॥

वैराग्य भाग्य भरलें असतां अनन्या ॥
आल्या जयाप्रति चतुर्विध मुक्ति धन्या ॥
चौथी तयांत वरिली उरल्या न पाहे ॥
तो आमचा गुरु समर्थ समर्थ आहे ॥ २ ॥

श्रीरामदास गुरु शांतिवधूस अंगी ॥
अंगीं करून मिरवे स्वसुखांत रंगी
रंगी उभा कर उभारुन वंदनाचे ॥
नाचे मुखीं गुण वदे रघुनंदनाचे ॥ ३ ॥

खेळावयास हनुमंत गडी जयाचा ॥
जो या महीवरि वतंस जितेंद्रियांचा
ज्याचीं पदें प्रणमितात कवींद्र राजे ॥
श्रीरामदास गुरु तो अमुचा विराजे ॥ ४ ॥

जो डोंगरीं गिरीदरी फिरतां न भागे ॥
ज्याची पवित्र घन कीर्ति जनीं विभागे
जो तत्वबोध कविता करितां न मोजी ॥
तो रामदास गुरुवर्य नमो नमोजी ॥ ५ ॥

शोभे शतद्वय समास समास भारीं ॥
जो दासबोध निजबोध सुखा उभारी
त्या सेवटीं दशक जोडित जो विसावा ॥
श्री रामदास गुरु तो अमुचा विसावा ॥ ६ ॥

चिद्बोध सेज अरुवार नव्या फुलांची ॥
सायुज्यमुक्ति ललना असतां जयाची
तो रामदास अकलत्र असें गणावें ॥
अज्ञान होत जन, काय तयां म्हणावें ॥ ७ ॥

जो लेखणी सहित कागद दौति वाहे ॥
तो दंड सद्गुण उदंड जयांत आहे ॥
हस्ती तयासि मिरवी फिरवी विनोदें ॥
श्रीरामदास गुरु तो नमिला प्रमोदें ॥ ८ ॥

जो भर्जरी सरस पाटल वर्ण चेलें ॥
शोभे जयास लघुसें निढळीं अबाळें
बोले समर्थ रघुवीर समर्थ ऐसें ॥
तो मी स्तवीन निजसद्गुरु वाग्विलासें ॥ ९ ॥

जेणें प्रशिष्य निजशिष्य अनेक केले ॥
देतां प्रसाद कफनी कफ नीट झाले
लोकाभिराम गुण बोलत रामकर्ता ॥
साष्टांग वंदन करीन तया समर्था ॥ १० ॥

श्रीरामदास-गुरु-वर्णनरूप पद्यें ॥
वृत्तें वसंततिलका सुजनैकहृद्यें ॥
संख्या करूनि दशकावरि एकतेनें ॥
केली अपूर्व रघुनायक पंडितानें ॥ ११ ॥

---

गजेंद्र मोक्ष.

कोठें वैकुंठ कोठें गजपतिस बळें नक्र वोढी तटाकीं
तेथें जो लाग वेगें करुनि पवनसा धावला पावला कीं ॥
तो स्वामी स्मर्तृगामी निरवधिकरुणासिंधु बंधु प्रणामी
लक्ष्मीवत्सें ललामीं स्मरुनि निजमनामाजीं गायीन नामी ॥१॥

कैसा तोयचरें गजेंद्र धरिला तो ही तया माधवें
कैसा सोडविला करून करुणा भक्तैकहृद्बांधवें
हें आम्ही परिसूं परीक्षिदवनीनाथें असें बोलता
झाला श्रीशुक बोलता परिसता राजा सुखें डोलता ॥ २ ॥

उंच योजनशतें शत साजे ॥ लांब रुंद हि तसाच विराजे ॥
तो त्रिकूट शिखरी वरि तुंगें ॥ स्वर्ण लोह रजतात्मक शृंगें ॥ ३ ॥

शृंगाभिधानक विशाळ धरून भाला
तेणें करून गिरि तो गिरितो नभाला ॥
जोपा झरे-जल-तृणें करितो मृगांची
जो पाझरे निजतटाक तटांत सांची ॥ ४ ॥

जयावरी होय निगा नगांची ॥ सदैव विश्रांति खगामृगांची ॥
जागे जयाचे उदरी दरीचे ॥ विलास तेथें सुरसुंदरीचे ॥ ५

नदीनद तयावरी सजल जे तयांचे तटीं
पटीर निकटीं वटीं जटिल तांदलांचे पुटीं
कटीं धरुन गोमटीं हरिवधूटिका लेंकरें
फलें भरुनि तन्मुखें करिति सन्मुखें ही करें ॥ ६ ॥

उद्यान एक ऋतुपाख्य तया त्रिकूटीं ॥
केलें स्वतंत्र वरुणें निज केलिसाठीं
नाना फुलीं विकसतां सकळास भासे ॥
हें या मिसें करुनि चैत्ररथास हांसे ॥ ७ ॥

चिगुलरे फुलले, फळले तसे ॥
तरुच भूषण तें वन लेतसे
सकळिकां कळिकांस विकासवी ॥
मधु सुवास निवास विकासवी ॥ ८ ॥

लते तळीं रुंदानिरुंद कालवे
गळोनि तेथें मकरंद कालवे

पराग ही सांद्र तयांत रंगती ॥
फुलासवें भृंगतती तरंगती ॥ ९ ॥ *

रुचति मधुर जैसीं चांगलीं तूप केळें
सुरुचिर रुचि तैसीं लागलीं तूपकेळें
शिवति गगन तैशा नारिकेळी रसाळें
सहित फळकदंबें सांद्र केळी रसाळें ॥ १० ॥

उपरि सकंटक साचे परंतु सांचे जयांत सुरसांचे
घोंस तसे फणसांचे षण्मासांचे तसेच वरसाचे ॥ ११ ॥ *

विख्यात नामें लवलीलता जे ॥ फलावलीनें लवली विराजे ॥
चंद्रोदयीं घोंस तिचे फुलांचे ॥ होती विसांवे अलिनीकुलाचे ॥१२॥

दाळिंबें स्वादु लिंबें कुरबक-बदरी-वृक्ष सीताफळीचे
जेथें जंबू फळांचे समुदय पिकले घोंस ही श्रीफळाचे ॥
वेळाचे वेल वाचे न वदवति जसे ते तसे वेलवांचे
शाखीं वायू जयांचे विवर रव करी जोड जे पावयांचे ॥१३॥

तया वनीं एक तटाक तोयें ॥ तुडुंबले तामरसानपायें ॥
निरंतरा मंद मरंद वाहे ॥ तपांत ही वास्तव रिक्त नोहें ॥ १४ ॥ *

वीतां मरंद उदरंभर बंभराचे ॥
जें होय मंदिरहि सुंदर इंदिरेचें ॥
तें पद्म जेथिल सहस्र दलां धरीतें ॥
प्रत्यक्ष सूर्य किरणास विसांववीतें ॥ १५ ॥ *

तया वनसरोवरीं उमलतां सरोजें रजें
मिळोनि मिरवे दळीं सलिल मौक्तिकाकार जें ॥
तयास सम आणिकें कवण माणिकें मोकळीं
असोत जरि पोंवळीं दिसति कोवळीं कोवळीं ॥ १६ ॥

मधुपाचीं खिल्लारें सरोवरामाजि कुमुदकल्हारें
इंदु विकास विलासें होतीं सकळा समान सोल्लासें ॥ १७ ॥

अमृतही पयही ह्मणवीतसें ॥ मधुर सारस तें जल गातसें ॥
मधुरसा रस यास्तव गातसे ॥ उभय होय तसी रुचि वीतसें ॥१८॥*

राजहंसा तया तोयीं राजहंस विसावती ॥
चक्रें हीं चक्रवाकाची चक्राकार विराजती ॥ १९ ॥

ऐसे तटाक वरुणोपवनांत जेथें ॥
पूर्वोक्त पर्वतवनस्थ गजेंद्र तेथें ॥
येतो कुटुंबसमवेत तृषार्त झाला ॥
मार्तंड चंडकिरणीं अतितप्त केला ॥ २० ॥

सखे मामे भाचे चुलतपुतणे आणि चुलते
सखे ही सांगातें सळमिसळ जाले सकळ ते
स्त्रिया ही जावांयी तनुज निज सायींत दडती
सतीचे बोलावे कळतिल गजेंद्रास पुडती ॥ २१ ॥

जो काननीं विचरला चरला तृणातें ॥
धुंडीतसे तृषित चिल्लर थिल्लरातें ॥
तो श्रीगजेंद्र जललोभ मनीं धरोनी ॥
दानांबुपान करवी मधुपाकरोनी ॥ २२ ॥

फिरत फिरत ऐसा येत होता पुढारीं
तंव वन वरुणाचें लक्ष जालें निडारीं
त्वरित शिरुनि तेथें उंच वाहेस वाहे
तृषित गज तटाकीं तुंबळें अंबु पाहे ॥ २३ ॥

तटाकाचे तोयीं हळुच उतराया चतुर तो
पुढारीं दो पायीं तनुभर उपायीं उतरतो
जलातें आरंभीं स्वकरविवरामाजि भरितो
मुखापासी नेतो गजवर पितो तैं वरपितो ॥ २४ ॥

धाला जलें करुनि सिंपितसे कपाळीं ॥
दानोदकावरिल भृंगकुलें उडालीं ॥
आले सर्व निजकुलोद्भव जे तिहीशीं ॥
क्रीडा करूं उतरला गज निम्न देशीं ॥ २५ ॥

वोढी सनाळ कमळांसि तटीं झुगारी ॥
हस्तींद्र शैवललतेस उरें विदारी ॥
माथां निमग्न करितां उदकीं उदेले ॥
दानांबुतैलज तवंग सवंग जाले ॥ २६ ॥

ऐसा करी जलविहार करी तटाकीं ॥
बाहेर सत्वर मदांध निघे च ना कीं ॥
नक्रें तया अवचितेंचि धरोनि पायीं ॥
आकर्षिलें करुनि शक्ति अगाध तोयीं ॥ २७ ॥

गजबजोनि घनध्वनिभैरवें ॥
गरजला गजराज घनारवें ॥
निजबळें पद वोढुनि झाडि तो ॥
प्रबळ नक्र मिठीस न सोडि तो ॥ २८ ॥

जें ग्रस्त तें पद सुटूं गज युक्ति दावी ॥
नक्रावरी पद दुजे उचलोनि रोवी ॥
तें कंटकौघ रुपतांच तळांतरंगी ॥
माथा करी चपळ तोयतरंग संगी ॥

सोंडेनें सुसरीस वोढुनि जळाबाहेर काढूं तटीं
पाषाणावरि आपटूनि रगडूं पाहे धरी सेपुटी ॥
तेथें कंटक टोंचले सिरकले पानीयनासापुटीं
श्वासोच्छ्वास न होयसा गवसला हस्ती तशा संकटीं ॥३०॥

गजेंद्राचे बंधू कवळुनि गजेंद्रा निजकरीं
कडे काढूं वोढूं सकळ सिणले ही बहुपरी
तया नाटोपसें करुनि सुसरीनें बळ तसें
दिले झाले नेला गजवर जळीं जेविं न दिसे ॥ ३१ ॥

कांहींसा उफळे जळीं गजबळें कांहीं तळा लागतो
हा बाहेर निघोनि येईल असा लागेच ना लाग तो ॥

वर्षांचीं शतकें दहा ढकललीं तीरस्थ होते करी
जे ते ही सुसरीस तो निरखितां गेले क्षणाभीतरी ॥ ३२ ॥

विचारी तैं हस्ती दृढ मज जयांचे भरवसे
तसें हि गेलें कीं विषम समयीं सोडुनि कसें
असो आपद्बंधू-यदुपतिकृपेचा जलनिधी
स्मरूं बाहूं पाहूं धणि वरि उभा राहिल कधीं ॥ ३३ ॥

पद विदार विलास विशारदें ।
क्रकच दारुण नक्र तशा रदें ॥
चगळितो गिळितो घन वेदना ।
न वदवे मज एक मधुसूदना ॥ ३४ ॥

श्रुतिपुटीं नयनीं नयनांतरीं ।
मज करीं जल हें भरलें तरी ॥
भरतसे वरिचेवरि नावरे ।
जलचरें धरिलें हरि धांव रे ॥ ३५ ॥

पुच्छ कंटक कठोर सुरीनें ।
घोर घाय रचिलें सुसरीनें ॥
तोविं तीस हिं करी करवाळी ।
श्रीहरी मज करीं कुरवाळी ॥ ३६ ॥

वोणवा करुनि घास गिळीसा ।
वोणवा गिळिसि गोपविलासा ॥
जो मदीय विपदग्नि उभा रे ।
तो तसा गिळि तसा न उभारे ॥ ३७

ज्यांत कालिय विषौघ उदेले ।
तोय तें पिउनि गोप निजेले ॥
ते हरि तव कृपारस सेखीं ।
वांचले त्रिजग ही परिसे कीं ॥ ३८ ॥

११

नाच काळियफणावरि टाचें ।
कीं जसा न माणि ते पिल टोचे
तद्वधू तुज असे विनवीतसे ।
नाचलास यदुराज विलासे ॥ ३९ ॥

माधवा मृदुरवें भरलीनें ॥
मोहिले जग तुवां मुरलीनें ॥
ते उगाचि अधरीं न धरावी ॥
एक वेळ मज ते विकरावी ॥ ४० ॥

चोज काय भुवनत्रयपोटीं ॥
वाहसी नग तसा नग बोटीं ॥
तें असो अणुसमान मनाया ॥
वागवी निजपदीं यदुराया ॥ ४१ ॥

हे रजोयुत इला न शिवावें ॥
हेम मानुनि तुवां निजभावें
द्रौपदी पटशतावृत केली ॥
बा तुझी अतुल कीर्ति उदेली ॥ ४२ ॥

पद ४३

प्राणविसाव्या रामा येसील कधीं निरखिति जें तुज डोळे ॥ विश्रांति तयी ॥ध्रु०॥ कोणी रामरघूत्तम राघव वदतां ऐसी वाणी ॥ गमतें मजला आला कार्मुकपाणी ॥ निरखुं तुजला हृदयीं धरुनि सिराणी ॥ धांवे उगला ॥ १ ॥

निटिल तटीवरि ठेउनि बाहे भरल्या नेत्रनिडारें ॥ मी वाट तुझी पाहतसे अविचारें ॥ ये राघवजी तुजविण असुनिहि सारे ॥ हा जीव न जी ॥ २ ॥

रघुपति पंडित भज अखंडित असतां नुसतां रुससी ॥ या कोपभरें किति मान वरवत अससी हें सांग खरें ॥ भावें धरितां विससी हे काय बरें ॥ प्राणविसाव्या रामा ॥ ३ ॥

श्लोक.

देवेंद्र जैं रिचवला च बलाहकातें ॥
तैं गोकुळावरि तुवां धरिलें नगातें ॥
केले सुखी सकळ गोकुळ गोप पाहीं ॥
भक्तैकबांधव हरी तुजवीण नाहीं ॥ ४४ ॥

पोहे पसाभर करी तुज दे सुदामा ॥
पोहे तयास्तव तया सदनीं सदा मा ॥
तो नांदला सम जया सुरराज कांहीं ॥
भक्तैकबांधव हरी तुजवीण नाहीं ॥ ४५ ॥

वांचावया विजयवीर उपाय केला ॥
भीष्मा समीप पणही तृणतेस नेला ॥
सारथ्य सांग रचिलेंच रथीं तुवां ही ॥
भक्तैकबांधव हरी तुजवीण नाहीं ॥ ४६ ॥

नाटोपतां मगधराज वृकोदरानें ॥
पाहून खूण समजून तुझ्या करानें ॥
केली पदीं मग धरूनि विदीर्ण देही ॥
भक्तैकबांधव हरी तुजवीण नाहीं ॥ ४७ ॥

जागा तुवां करविला मुचकुंद तो कीं ॥
काळास ही करूनि भस्म निजावलोकीं ॥
राहे सुखी तुज विलोकुनि मुक्ति गेहीं ॥
भक्तैकबांधव हरी तुजवीण नाहीं ॥ ४८ ॥

पद ४९

घोर हे उपेक्षा माझी आदरिली काय मुकुंदा ॥ ध्रु० ॥

धांवलासि सजणा स्मरतां संकटीं प्रल्हादासाठीं ॥
पावलासि पांचाळीतें नेसविल्या अंशुककोटी ॥
न दिसे ते तांतडि मोठी ॥ करुणा ये ना कां पोटीं ॥
करुणा वरुणालय हे गोविंदा ॥ १ ॥

इंदिराकलत्रा इंद्रें वर्षतां घनघनधारा ॥
गोवर्धन उचलुनि केला त्वां गोकुळलोकां थारा ॥
रजनीनायककुलहीरा ॥ रजनीदिन मी यदुवीरा ॥
भजनीं तव तत्पर टाकुनि धंदा ॥ २ ॥

जेवढीं अगण्यें दुरितें म्यां केलीं प्रतिफळ घटिका
तेवढीं हि जरि भोगविसी तरि कैसी गा मज सुटका
कमलासन मन्मथजनका ॥ कमलानन यादव तिलका ॥
विमला परि पालित मुचकुंदा ॥ ३ ॥

वंचनाचि अवघी मजसी करिसी तुं सुरवरवरदा ॥
कांचनांबरा हरि आतां येरेवा नवकुंदरदा ॥
दीनोद्धारक या बिरदा ॥ राखी गतिविजित द्विरदा ॥ रघुनायक पंडित चित्सुखकंदा ॥ ४ ॥

श्लोक.

नाहींस काय मजमाजि जगन्निवासा ॥
हा मान तो तुज अलिप्तपणें समासा
येणें परी परिसतां अतिदीन वाणी ॥
भक्ता पुढें प्रगट होय रथांगपाणी ॥ ५ ॥

लक्ष्मीतें हृदयीं धरी तिजसवें श्रीवत्सही श्रीहरी
हस्तीं कंबुसुदर्शनांबुजगदा हे आयुधें स्वीकरी
शोभे विष्टुर थावरी निवसला सोनेसळा नेसला
आला नीरधराभिराम निकटीं हस्तींद्र उल्हासला ॥ ५१ ॥

माथां दिव्यीं ( व्य ? ) करीर निटळीं कस्तुरि विस्तारली
कंठीं कौस्तुभकांति शिर्ङ्गलतिका अंशस्थलीं थारली
सांगाती चतुराननादि बिरुदें गाती असा भासला
आला भक्तजनैकबांधव हरी हस्तींद्र उल्हासला ॥ ५२ ॥

कर्णीं कांचन कुंडलें तळपती तेजें कपोलांकणीं
केयूरें भुज-पारिजात फुलले माजी क्वणत्किंकिणी
पायीं नूतन नूपुरें कलरवें भासे सवें बोलला
आला भक्तजनैक धांवत हरी हस्तींद्र उल्हासला ॥ ५३ ॥

पद ४५.

श्रीहरि धणिवरि देखिला ॥ मनिं रेखिला ॥ सखा लेखिला माझा भक्तिंकरसें केला अखिल राजि राखिला आजि यादव-राजा ॥ ध्रु० ॥

पुनवेचा चांद विराजतो ॥ तन्हि लाजतो मुखदर्पण तैसा कुंड-लमणिगणिं साजतो करुनि साज तो ॥ यदुराज तो ऐसा ॥ १ ॥

गीतगमकगति सुंदरि कंबुकंधरि त्रिवळि धरिताहे ॥ हार उरी सरसोदरीं शशिसोदरीं ॥ तीस आदरि पाहे ॥ २ ॥

सरळ भरि भुजालता ॥ सविशा लता फुलता तिनगानी कल्प-तरुसम शोभता ॥ करलाभता लोभतावरदानी ॥ ३ ॥

उदरीं जगत्रय थारलें नवल थोरलें ॥ त्रिवळीस्तव भासें ॥ नाभिसरोज विकासले ॥ ज्यातें पोसले विधिलें करूं हांसे ॥ ४ ॥

कास कसुनि सोनेसला बाप नेसला ॥ तेणें गुल्फ पावेतों मुधा मुनिजनि सेविला ॥ हृदयीं ठेविला पद झेंपावेतों ॥ ५ ॥

सुमसम कोंवळें पावलें ॥ भक्ता पावलें ज्याच्या निजनखचंद्रें ॥ संतचकोरभले ॥ भले सुख पावले ॥ रघुनाथ कवींद्रें ॥ ६ ॥

श्लोक.

तो पूजिला गजवरें वरि वारिजातें ॥
देवें करीं उचलिला करपारिजातें ॥
चक्रें करूनि खळनक्र विदारिजेला ॥
आत्मानुरक्त निजभक्त विमुक्त केला ॥ ५५ ॥

इंद्रद्युम्नाभिधान द्रविडकुलमणी पांड्यराजा हरीतें
ध्यातां मौनस्थ होतां तव घटज मुनी क्रुद्ध बोले तयातें
माझें आतिथ्य कैसें न करुनि धरिलें ध्यान हे काय मस्ती
यासाठीं शाप घेयीं विचरसिल वनीं मस्त होसील हस्ती ५६

राजेंद्रें नम्रभावें उपरि विनवितां बोलिजेतें ऋषीनें
हूहूगंधर्व कांहीं चुकत तव तया शापिलें देवलानें
तो झाला नक्र तोयीं धरिल तुज तदा मुक्ति दोघां तुह्मांतें
शौरी देयील ऐसे कलशभव वदे जाइ हो स्वस्थळातें ॥ ५७ ॥

तो हा श्री गजराज यासि दिधली देवें सरूपस्थिति
नक्रातें शिवतांच होय मग तो गंधर्व दिव्याकृती
स्वामीचे गुण गाय पाय नयनीं पाहे धरी अंतरी
पावे उत्तम लोक पाहुनि तया आश्चर्य केलें सुरीं ॥ ५८ ॥

तैं समुदाय सुमनाचे ॥
हरिवरि वरिसाव करि सुमनाचे ॥
भेरी रख कराया ॥
विलंब कैचा असेल नृपराया ॥ ५९ ॥

गजवर निजरूपें धन्य केला मुकुंदें ॥
स्ववसतिसहि नेला चित्सदानंदकंदें ॥
इतर गज पळाले साधिले काय तेहीं ॥
सुलभलभ तयांला श्रीहरी होत नाहीं ॥ ६० ॥

श्रीमद्भागवतांतरंग चतुराध्यायीं महाकौतुकें
राजेंद्रास गजेंद्र मोक्ष पहिलें जो बोलिजेला शुकें ॥
जो गातां अवधारितां सुखकरी ते मुक्ति नांदे करीं
तो शोभे रघुनाथ पंडित निजव्याहार काव्यांतरीं ॥ ६१ ॥

---

टीपः—१ ह्या परिशिष्टांतली माहिती 'ग्रंथमाला अंक १२८' यांतून घेतली आहे. २ फुली + केलेलीं पद्यें 'नलदमयंती स्वयंवराख्यानांत" हीं थोड्या फार फरकानें आलेलीं आहेत.